आपल्या कवीनें मोठा ग्रंथ आर्या छंदांत लिहिला आहे; तथापि त्यांणीं इतर श्लोकांच्या वृत्तांतहि लहान लहान बरेच ग्रंथ रचिले आहेत. यां मध्यें हा पुढला केकावलीचा लहानसा स्तोत्ररूप ग्रंथ पृथ्वी छंदांत रचिला आहे. या शिवाय त्यांचीं आणखी कवनेंहि आढळतात.

## पद.

वरअसाविभोदेकींवत्सागामल्लीला ॥ धृ० ॥
पदवीश्रीचीगोपीकांला ।
दिधलीवैकुंठींचीवल्लवपल्लीला ॥ वरअसा ॥ १ ॥
तुझ्याकीर्तिमात्रेंपुढें ।
नपुसेकोणीधन्वंतरिच्यारवल्लीला ॥ वरअसा ॥ २ ॥
भक्तमयूरघनाजावा ।
नसुरद्रुमयाचकनीचाच्यागल्लीला ॥ वरअसा ॥ ३ ॥

## पद.

सुखकरामुकुंदारामाकृष्णागोपाला ॥ धृ० ॥
केशवामाधवाहरे ।
नुरवींभोयाकामालोभाकोपाला ॥ सुख० ॥ १ ॥
जगदाकारातुलाभ्यालों ।
जोविंभुजगमानुनिकनकाच्यागोपाला ॥ सुख० ॥ २ ॥
भक्तमयूरसुखघना ।
हानतजनतवपदितुलसीचाहोपाला ॥ सुख० ॥ ३ ॥

## पद.

यशभुवनवनवसंताचें ॥ गावेंनवनवसंताचें ॥ धृ० ॥
द्रुहिणह्मणेतुजचक्रापासुनि रक्षायामींनशकें ।
सशकेंसिंहकसामारावा कींपक्षीश्वरमशकें ॥यश०॥ १ ॥
विष्णुह्मणेम्यांकायकरावें एथेंतापसराया ।

तापसरायादायेंकचि तुजमजतापसराया ॥यश०॥ ३ ॥
मृत्युंजयह्मिह्मणेवाराया दुर्बळमींयाअरिला ।
याहुनिअन्यावारिनतुझ्या कालाद्युग्राअरिला ॥ यश०॥ ४ ॥

* * *

## अंभग.

तोखपावेतोकथानें तोकथानेंपावती ॥

* * *

आपल्या कवीचें सरस व प्रौढ शब्द ठेवण्यांत आणि प्रास व यमकें साधण्यांत जें अपूर्व चातुर्य दिसतें, त्या विषयींचें वरील थोड्या उदाहरणा वरून स्थालीतंदुलन्यायेंकरून योग्य अनुमान वाचकांनीं केलें असतां व्हावया जोगें आहे.

सांमत प्रस्तुतग्रंथविषयक कांहीं अभिप्रेतार्थाचें कथन इष्ट जाणून करितों. आपल्या इष्ट देवतांचें अथवा पुण्यश्लोक देवांचें अथवा अवतारी पुरुषांचें स्तवन ज्यांत केलें असतें, त्या लहान ग्रंथास स्तोत्र ह्मणतात; हें बहुधा सर्वांस ठाऊक आहे. अशीं स्तोत्रें मोरोपंतानीं पुष्कळ केलीं आहेत, त्यांतील केकावलि हा एक ग्रंथ समजला पाहिजे. हा त्यांच्या स्तोत्ररूप ग्रंथा मध्यें मोठा विख्यात ग्रंथ होय. केकावलि शब्दाचा अर्थ असा होतो कीं, केका ह्मणजे संस्कृत भाषेंत मोराच्या शब्दास ह्मणतात, ह्मणजे ज्यास शुद्ध मराठींत मोराचा टाहो असें ह्मणतात, त्याची जी आवलि ह्मणजे पंक्ति, अर्थात् एकामागें एक मोराचे टाहो, त्यांस केकावलि ह्मणावें. आतां आपल्या कवीनें आपलें नाम सार्थक करून आपल्यास मयूरपक्षी कल्पून कृपाघन जो भगवान त्यास उद्देशून. आपले जे एकामागें एक प्रार्थनारूप श्लोक त्यांस

केकावलि

केकावलि ह्मटलें आहे; आणि हें अभिधान आपल्या कवीच्या सरस रुचीस अनुरूप आणि शुभदायक होय असें समजलें पाहिजे. यद्यपि मोरोपंत हे रामोपासक होते असें प्रसिद्ध आहे, तथापि त्यांच्या कृती वरून जी त्यांची अंतःकरणवृत्ति अनुमित होत्ये, तिज वरून मला तर स्पष्ट दिसतें कीं, जरीं त्यांचें उपास्य दैवत राम होतें, तरीं त्यांची सर्व देवां विषयीं पूज्यबुद्धि असून ते परम भाविक आणि श्रद्धालु पुरुष होते यांत मला किमपि संदेह वाटत नाहीं. नुसती देवतां विषयींच त्यांची पूज्य बुद्धि होती असें नाहीं; परंतु भाविक वारकऱ्यां सारिखी संत साधू विषयींहि त्यांची अत्यंत प्रेमळ बुद्धि होती, असें त्यांच्या सहाजिक वाणी वरूनहि दिसतें. परंतु हा आपला प्रेमळभाव त्यांणीं आपल्या सन्मणिमालेंत विशेषेंकरून प्रकट केला आहे. या देशांत विख्यात जे अलिकडचे साधु संत त्यांची त्या ग्रंथांत त्यांणीं नमनपूर्वक थोडक्यांत स्तुति केली आहे. तांत शिंपी, सोनार, वाणी, माळी, कुंभार, चाह्मार, म्हार, कसाई, आणि मुसलमान, इत्यादि ब्राह्मणांनीं नीच मानिलेल्या जातीच्या साधूंसहि त्यांणीं आपल्या नमस्कारानें ब्राह्मणाच्या पंक्तींत आणून बसविलें आहे असें स्पष्ट दिसतें; पहा हे- नामदेव, नरहरि, तुकाराम, सांवता, गोऱ्हा, रोहिदास, चोखामेळा, सजना, कबीर, आणि शेख महम्मद, यां साधूं विषयीं कसें बोलतात तें;-

भक्तिसुखंवाधिकमानुनि मुक्तिसुखकदापियाचिनाम्यातें ।
अत्यद्भुतआयकिलें सद्दृंदींनमुनियाचिनाम्यातें ॥

नरहरिनामापावे संतनसोनारदासमानकसा ।
तरलाकरुनिभवाचा अंतनसोनारदासमानकसा ॥
करजोडितोंसुदाया तनुरूपातापहेतुकारामीं ।
कींसतनुमुक्तझाला योगाचीसिद्धिहेतुकारामीं ॥
जेंसांवताकरुनिदे उदरश्रीमंदिराभवनमाळी ।
त्यातेंप्रेमेंवसवुनि मानीश्रीमंदिराभवनमाळी ॥
गोराज्याह्मणतीत्या स्मरुनिसुखीतूंमनाकुलालाहो ।
घेभक्तिचाजयाची मतिसंसारींअनाकुलालाहो ॥
बहुमानितीनकोणी जेरोहीदासचर्मकामानें ।
तेनपहावेपाहुनि तपनपहावाचिधर्मकामानें ॥
गावानचमानावा चोखामेळामहारसामान्य ।
जाच्याकरिसाधूंचा चोखामेळामहारसामान्य ॥
सजनानामजयाचें ज्यागातीसाधुजनकसायास ।
भगवान्पळहिनविसरे ज्यातेंविसरेनमींकसायास ॥
मायाहेसंसृतिची जाळुनिसशोकतोकबीरमला ।
रामपदाब्जींअलिसा बहुमतसुमुदोकतोकबीरमला ॥
तारितिनकीर्तिच्याजो नलवेत्याम्सुलमानवानावा ।
हर्षेशेखमहम्मद भगवज्जनमुसलमानवानावा ॥

या वरील उदाहरणा वरून हे आपले कवि परम साधु आणि अत्यंत प्रेमळ वृत्तीचे पुरुष होते असें स्पष्ट दिसतें, आ-णि प्रस्तुत ग्रंथा वरूनहि बुद्धिवान पुरुषांच्या लक्षांत असें आल्या वाचून राहणार नाहीं. या ग्रंथांत त्यांहीं विष्णूस उद्दे-शून स्तवन केलें आहे. पहिल्या तीन केकांत शिष्टसांप्रदायानु-सार आपल्या आराध्य दैवताच्या चरणांचें माहात्म्य वर्णून त्यांस अभिवंदन केलें आहे. हा सांप्रदाय परम स्तुत्य होय; कारण येणेंकरून वंदन करणाराचा अत्यंत नम्रीभाव प्रस्फुट

होतो

होतो. पुढें आपलें पातित्य आणि पतिताचें उद्धरण करण्याचें भगवंताचें शील यांचें वर्णन केलें आहे. प्रार्थना करण्याच्या ओघांत जसजसा बोलण्याचा प्रसंग येत गेला, तसतसें कोठे विनय, कोठे सलगी, कोठे रोष, आणि कोठे आपला लडिवाळपणा, अशा भिन्न भिन्न भावाचें प्रदर्शन करून ही सर्व ग्रंथरचना केली आहे; परंतु त्या रचनेंत कांहीं विशेष अनुक्रम धरून आपल्या अभीष्ट अर्थाचें निवेदन केलें आहे. असें मला दिसत नाहीं. यांत ग्रंथकाराचें मागणें इतकेंच दिसतें कि भगवंतानें आपल्या अपराधाची क्षमा करावी, आणि आपला अंगीकार करावा. ज्ञानी जनांस भगवंता पाशीं मागणें हेंच उचित होय.

आतां याचक जनांहीं कोणत्या भावानें वदान्या पाशीं प्रार्थना करावी;-त्यांत, अत्यंत अल्पज्ञ, पापमालिन्यानें अंतर्यामीं आपादमस्तक मलिन, आणि प्रतिक्षणीं अपराधी, अशा नरदेहधारी पामर जीवानें सर्वज्ञ, अत्यंत पवित्र, न्यायी, आणि षड्गुणैश्वर्यसंपन्न, अशा जगदीश्वरा पुढें आपल्या अपराधाची क्षमा भाकणें झाल्यास, इतर सर्व भाव एको कडेस टाकून शुद्ध विनयतेच्याच भावानें प्रार्थना करणें उचित. असें असतां आपल्या कवीनें तर या स्तोत्रांत आपल्या विनयतेच्या भावांत भावांतरांचें पुष्कळ विरजण घातलें आहे. तेव्हां ही यांची कृति अशा दृष्टीनें दोषप्रवण झटल्यानें आपणा कडेस धृष्टतेचा आरोप येणार नाहीं, असें बहुतेक सूज्ञ विचारी पुरुषांचें मत पडेल. या गोष्टींचा लक्षपूर्वक विचार केला असतां हें मत उपेक्षणीय

-क्षणीय आहे असें मला वाटत नाहीं; पूर्ण अंशीं नसलें त-थापि पुष्कळ अंशीं हें मत ग्रहणीय होय असें माझ्या विचारास येतें. ईश्वराचें महत्त्व आणि पवित्रता, आणि मनुष्याचें क्षुद्रत्व आणि पापमलिनता, यां विषयीं विचार केला असतां जें महदंतर दिसतें, त्या वरून पाहतां मनुष्यानें तर ईश्वरा पुढें धुळींतच पडून असावें; मान उचलून वर त्याज कडेस पाहण्याचीहि याची योग्यता नाहीं; असें असतां त्या ईश्व-राला उद्देशून केली जी प्रार्थना तींत प्रार्थकानें सलगी, अथवा लडिवाळपणा, अथवा रोष, यांतून कोणत्याहि भावा-चें प्रदर्शन करणें, हें तर त्यास केवळ अनुचित होय.

परंतु ज्या लोकां मध्यें जीवात्मा आणि परमात्मा यांच्या ऐक्यभावाचे प्रतिपादक आज पावेतों शतावधि आचार्य आणि उपदेशक होऊन गेले; आणि त्यांहीं लिहिलेले सहस्रावधि ग्रंथ चालून अद्वैत मताचा प्रचार फार होऊन गेला आहे; आणि ज्यां मध्यें ज्या श्रुतींच्या पाया वर अद्वैतमताचें मंदिर बांधलें होतें, त्या सर्व श्रुती मध्वाचार्यांनीं आपणा कडेस वळवून त्यांच्या योगानीं जीवात्मा आणि परमात्मा याचें तादात्म्य असंभवनीय असा आपला सिद्धांत प्रदर्शित करून, जीव सेवक, आणि परमात्मा सेव्य,-सलोकता समीपता; आणि सरूपता, या तीन काय त्या जीवांस मुक्ति; सायुज्यता अथवा कैवल्य मुक्ति जीवांस कदापि होणार नाहीं; असा आपला सिद्धांत स्थापून आपल्या द्वैतमतानें अद्वैत मताच्या खंडनार्थ प्रयत्न केला; आणि अद्यापि त्यांचे अनुयायी माध्व करितच आहेत;- पुढें त्या मोठ्या कलहांत

रामानुजांनीं

रामानुजांनीं दोघांची समजूत पाडण्या करितां मध्यें कावड करून विशिष्टाद्वैत मताची स्थापना केली; तथापि त्यां मध्यें अद्वैत मताची अबाधित सत्ता चालण्यांत कांहीं मोठा प्रतिबंध झाला असें नाहीं. परंतु जेव्हां अद्वैतवादी घरोघर चुली पर्यंत ब्रह्मज्ञान ऐकून आपणच कंटाळले, आणि पापपुण्याचा विचार लोकां मध्यें अत्यंत शिथिल झाल्यानें अनाचाराचा बाजार कडेलोट भरूं लागला, असें पाहून जेव्हां तेच भ्याले,- ही लोकांची स्थिति तुकोबानें खालीं सरस वर्णिली आहे;—

घरोघरींअवघेंझालेंब्रह्मज्ञान ॥ परीमेळवणबहूमाजी ॥ १ ॥
निरेकोणापासींहोयएकरज ॥ तरींग्यारेमजदुर्बळासीं ॥ २ ॥
आशातृष्णामनींकालवूनीदोनी ॥ दंभतोदूरूनीदीसतसे ॥ ३ ॥
कामक्रोधलोभशीणवीबहुत ॥ मेळवूनीआंतकाळकूट ॥ ४ ॥
तुकाह्मणेतेथेंकांहींहातानये ॥ आयुष्यतेंजायेवायांसर्व ॥ ५ ॥

या पेक्षां आणखी भयंकर;-

जीवतोचीदेवभोजनतेभक्ती ॥ मरणतेमुक्तीपाखंडयाची ॥ १ ॥
पिंडाच्यापोषणींनागवलेजन ॥ लटींकेपूराणकेलेवेद ॥ २ ॥
मनाआलातैसाकरीतीविचार ॥ ह्मणतीसंसारनाहींपुन्हा ॥ ३ ॥
आपूलेमनींचेंकरूनीपाखंड ॥ जनामध्येंभांडपोटभरी ॥ ४ ॥
तुकाह्मणेपाठीउठतीयमदंड ॥ पापपुण्यखंडनविचारिती ॥ ५ ॥

अशी लोकांची स्थिति पाहून जेव्हां अद्वैतवादी आपल्या मार्गाचें अतिक्रमण झाल्या मुळें आंपणच थकले; तेव्हां आज पावेतों विसरून गेलेल्या आपल्या भक्तिमावली पुढें त्यांहीं साष्टांगदंडवत घातला, आणि ह्मणूं लागले;-

नायकावेकानींतयाचेतेबोल ॥ भक्तीवीणफोलज्ञानसांगे ॥ १ ॥

वारवाणीअद्वैतभक्तीभावेंवीण ॥ दुःखपावेशीणश्रोतावक्ता ॥ २ ॥
अहंब्रह्मह्मणुनीपाळीतसेपिंडा ॥ बोलोंनयेभांडातयासवें ॥ ३ ॥
वेदबाह्यलंडबोलेजोपाखंड ॥ त्याचेंकाळेंतोंडसंतांमध्यें ॥ ४ ॥
तुकाह्मणेखंडीदेवभक्तपण ॥ वरिष्ठत्याहूनश्वपचतो ॥ ५ ॥

आणखी ह्मणूं लागले;-

गोडनावेंक्षीर ॥ परीसाखरेचाधीर ॥ १ ॥
तैसेंजाणब्रह्मज्ञान ॥ बापुडेंतेंभक्तीवीण ॥ २ ॥

आणि तिच्या पायांशीं नाक घासून, करुणा भाकूं लागले,- माते आह्मीं चुकलों; आज पावतों आह्मास असें वाटत होतें कि आमच्या अद्वैतब्रह्मज्ञानानें आह्मास मोठमोठे पांख फुटले आहेत, त्यांच्या योगानें आतां आह्मीं कैलास आणि वैकुंठ यां-च्याहि पलिकडेस वर चिदाकाशांत उडून जाऊं; त्वां आम-च्या चंचूंत चारा भरवून आमचें संगोपन करावें याचें आतां कांहीं अगत्य उरलें नाहीं; तुझ्या चोंचींतला चारा आह्मांस नको; आह्मीं स्वतंत्र उड्डाण करून या पेक्षां आपला चांगला चारा मिळवूं;- असा जो आह्मांस गर्व झाला होता तो आतां अगदीं उतरून गेला. आह्मीं तुझा विश्रांतीचा घरकुंडा सो-डतांच हे आमचे अद्वैतज्ञानाचे पांख आह्मास तोलत नाहींसे होऊन आह्मीं खालीं पडों लागलों; कित्येक जे गर्वानें का-हींसे वर उडाले त्यांस अधिक धक्का बसून त्यांचा चुराडा झाला. आतां आमच्या अनुभवास पक्कें आलें कि तुझ्या मुखांतल्या चाऱ्याच्या सेवना वांचून इतके मोठे पांख झेप-ण्याचें सामर्थ्य आह्मास कदापि येणार नाहीं; आणि जरीं त्या चाऱ्यांमें तसें उडण्याचें सामर्थ्य आलें, तथापि तुझें

कोटें

कोटें नसोडितां तूं जेथें आह्मास नेशील तेथें उडून तूं दाखविशील तोच चारा आह्मीं भक्षण करूं, यांतच आमचें सर्व कल्याण आहे; असें म्हणून अद्वैतवादी भक्तिमातेस शरण गेले. परंतु जरीं शरण गेले, तरीं उनाड मुलें जशीं इकडे तिकडे यथेच्छ उड्या मारुन भूक लागली म्हणजे आपल्या आई जवळ खाऊ मागायास जातात, तसे शरण गेले. अपराधी लोक न्यायाधिशा पुढें उभे राहून केवळ सभयतेनें आपला अपराध अंगीकृत करून, त्या कृत अपराधा विषयीं आपला पश्चात्ताप प्रकट करून मोठ्या विनयतेनें आणि दीनवाणी तोंडानें क्षमा मागायास जातात तसे गेले नाहींत. मुलें जशीं आपल्या आई बापा पाशीं काहीं वस्तु मागतानां आपला लडिवाळपणा, सलगी, रोष, इत्यादि भाव दाखवितात, तसे या देशांत भक्तजन आपल्या इष्ट देवते पुढें यथारुचि अनर्गलवाक्पाटवानें अनेक भाव दाखवून वर मागतात. त्यां मध्यें विनयभाव नसतो असें माझें ह्मणणें अगदीं नाहीं; हें तर माझ्या वरील लेखा वरून वाचकांच्या लक्षांत पूर्तपणीं आलेंच असेल; परंतु त्या भावाच्या विरजणांत भावांतराचें पुष्कळ मिश्रण असल्यानें त्या भावास बलहीनत्व येऊन प्रार्थनीय परमेश्वराचें महत्व आणि गौरव यास फार गौणत्व आल्या सारिखें दिसतें असें मला खचित वाटतें. कारण, परमेश्वर आईपेक्षांहि दयालु आहे हें खरें आहे, तथापि तो न्यायी आहे, म्हणून लाडानें आपल्या मुलांस बिघडविणाऱ्या भोळ्या आई सारिखी ती आई नाहीं; परंतु जीं मुलें आपल्या आज्ञेचें उल्लंघन करून उन्मार्गवर्ती होतात, त्यांस छडी

मारून

मारून सन्मार्गास लावून सुखी करणाऱ्या शहाण्या आ सारिखी ती आई आहे. किंबहुना परमेश्वराचें महत्त्व आ णि सर्वैश्वर्य जर मनांत आणिलें, तर आईच्या सामा उपमे पेक्षां त्याच्या महत्त्वास आणि ऐश्वर्यास दयालु आणि न्यायी अशा प्रभूची उपमा अधिक योग्य दिसती; म्हणू ज्यास स्वापराधाचें ज्ञान होऊन पश्चात्ताप झाला असे अशा क्षुद्र मानवानें परमेश्वरा पुढें शुद्ध विनयभावा -च प्रार्थना करावी, हेंच त्यास उचित होय असें मा मत होय. आणि या मतदृष्टीनें पाहिलें असतां हें ढलें आमच्या कवीचें काव्य दोषारोपणास पात्र होण्या योग्य आहे खरें, परंतु ज्या लोकां मध्यें लडिवाळपणा आणि सलगीनें ईश्वराची प्रार्थना आणि स्तुति करण्या संप्रदाय व्यासाच्या वेळे पासून पडला आहे, त्यां मध आपल्या कवीसच निवडून काढून या दोषाचा भार त्यांच मस्तका वर ठेवण्यास त्यांस पुढें करणें मला योग्य दिस नाहीं. सर्वांच्या पंक्तींत यथायोग्य त्या भाराचे विभ करून यांच्या वाटणीस जो यःकश्चित् विभाग येईल निराळा काढून ठेवण्याचें जर कोणाच्या मनांत येईल भलें येऊ.

आतां आणखी एक दोष प्रस्तुत काव्यांत आढळतो, पूर्वोक्त दोषापेक्षांहि अधिक शोचनीय होय असें विचारशी पुरुषांच्या बुद्धींत वागल्या वांचून राहणार नाहीं; आ वर जी म्यां दयालु आणि न्यायी अशा परमेश्वराच्या प्रा नेंत विनयातिक्रमणरूप दोषाची सूचना केली. त्याच दोष

हें परिपक्क फल होय, असें त्यांच्या ध्यानांत येऊन प्रकृत दोषप्रदर्शनांत पूर्वोक्त दोषकथनाचें समर्थनहि होईल. एकदां विनयभाव सुटला ह्मणजे सलगीस आरंभ होतो, आणि ती सलगी विनोदास पोंहचविते; या देशांत, त्यांत विशेषेंकरून संस्कृत काव्यांत, शृंगाररसाचें प्राधान्य असल्यानें त्या विनोदांतहा रस प्रचुर होऊन शेवटीं बीभत्स रसाचाहि प्रादुर्भाव होतो. असें असलें तरीं इतर लोकव्यवहारवर्णनपर काव्यांत समयविशेषीं समर्याद असल्यास शृंगार आणि बीभत्स हे रस सुसह्य आणि रुचिपरत्वें आल्हादजनकहि व्हायास शक्य आहेत; परंतु भगवत्स्तुतींत या रसाचें नुसत्या लवणा प्रमाणेंहि अल्प सेवन दुःसह, मग या रसाचे द्रोण भरभरून पिणें हें सहास कर्म भरतखंडनिवासी भक्तजनांनींच करावें; इतरांच्यानीं होणार नाहीं. पहा;-

हरिरिहमुग्धवधूनिकरें विलासिनिविलसतिकेलिपरे ॥ धृ० ॥
पीनपयोधरभारभरेणहरिंपरिरभ्यसरागं
गोपवधूरनुगायतिकाचिदुदंचितपंचमरागं ॥ हरिरिह० ॥

रासेहरिमिहविहितविलासं ॥ स्मरतिमनोममकृतपरिहासं ॥ धृ ॥
गोपकदंबनितंबवतीमुखचुंबनलंभितलोभं
बंधुजीवमधुराधरपल्लवमुल्लसितस्मितशोभं ॥ रासे० ॥

* * *

धीरसमीरेयमुनातीरेवसतिवनेवनमाली
गोपीपीनपयोधरमर्द्दनचंचलकरयुगशाली ॥ धृ० ॥
विगलितवसनंपरिहृतरशनंघटयजघनमपिधानं
किसलयशयनेपंकजनयनेनिधिमिवहर्षनिधानं ॥ धृ०॥

गीतगो०

यांत पहा हे या शृंगाररसानें कसे द्रोण भरले आहेत. या पेक्षांहि मौढरीतीनें शृंगाररसान्वित भक्तिप्रेम पहाणें असल्यास श्रीमद्भागवताचा मोठा ग्रंथ आहेच. आणखी या शिवाय पाहाण्याची इच्छा असल्यास ब्रह्मवैवर्तक पुराणांतील कृष्णजन्मखंड पहावें. परंतु वेणिसंहारनाटककारानें तर वैष्णवांसहि मळमळी सुटे असा रस आपल्या नांदीच्या एका श्लोकांत ओतला आहे. त्या श्लोकाचा एथें उपन्यास करण्यासहि मला लज्जेनें संकोच वाटतो. मग असा शृंगाररसान्वित भक्तिप्रेम प्रकट करण्याचा जेथें शिष्टसांप्रदाय प्राचीन कालापासून चालत आहे, तेथें आपल्या यःकश्चित् प्राकृत कवीनें पुढल्या स्तोत्रांत कोठें सात आठ श्लोकांत या रसाचें एकदोन थेंब ओतले असल्यास ( पहा- केका ७, १३, २४, ३५, ३६, ३७, ८३, १०२, ) हा त्यांज कडेस मोठा दोष नयेतां उलटें मला वाटतें कीं हें त्या रसाचें अत्यल्पत्व त्यांच्या सदभिरुचीचें ज्ञापक होतें. इतकें वादळ चालत असतां त्यांत त्यांणीं आपल्या होडीस तो वारा फारसा न लागूं देतां संभाळलें, हें याचें कृत्य मोठें स्तुत्य होय असें विचारी पुरुषांच्या ध्यानास येईल.

ज्या देशांत व ज्या लोकांत रसभरित ह्मणून प्रसिद्ध काव्यें असतात, त्यांच्या गुणांचें यथायोग्य परीक्षण करण्यास, आणि त्यांची रुचि घेण्यास, त्याच देशाचे डोळे आणि जीभ असली पाहिजे. इतर लोकांच्यानीं तसें यथान्याय परीक्षण होणें केवळ अशक्य असें माझें ह्मणणें नाहीं; कदाचित् ते विशाळ बुद्धीचें परीक्षक असल्यास योग्य परीक्षा करूं शकतील

कतील

-कतील; परंतु त्यांच्या रुचीनें जो तद्देशीय सूज्ञांस आनंद होईल, त्याच मानाचा आनंद अन्यदेशीय विद्वानांस होणार नाहीं. याचीं कारणें बहुत आणि सूक्ष्म आहेत. ज्या लोकांत वंशपरंपरेनें ज्यांचा सहवास असतो, त्यांचा पूर्वापर व्यवहार, रीति, भाती, विद्या, ज्ञान, आचार, या सर्व गोष्टी-च्या संघट्टनानें त्यांचीं मनें तशींच रंगलेलीं असतात; ह्मणून त्यांच्या काव्यानें जे हर्षशोकादि विकार त्यांच्या मनां वर होतील, तसे विकार अशा संघट्टनाच्या अभावा मुळें ज्यांची मनें तशीं रंगलीं नसतात त्यांज वर होणार नाहींत. अशा विचारानें पाहिलें असतां हें पुढील स्तोत्र प्रौढ आणि रसिक काव्यांत गणिलें पाहिजे. आणखी माझी अशी अटकळ होत्ये कीं, हें स्तोत्र पंतानीं आपल्या वयाच्या उत्तर अवस्थेंत रचिलें असावें; ही अटकळ या काव्याच्या प्रौढवाणी वरून, आणि यांत जो प्रतिपाद्य विषय आहे त्या वरून, कोणी के-ली असतां तिचा संभव आहेच, परंतु या स्तोत्रांतील ४६ व्या केके वरून तर त्या विषयीं कदाचित् संशय असला तर तोहि दूर होईल असें मला वाटतें.

आतां केकावलि हें प्राकृत काव्य असून या वर आ-णखी प्राकृत टीका करण्याचें प्रयोजन काय, ह्मणून इतरां-च्या तर नाहीं, परंतु कदाचित् पंडितजनांच्या मनांत प्रथमतः आशंका उत्पन्न होईल. त्यास हें प्राकृत काव्य खरें, परंतु वामन मोरोपंत या सारिख्या पंडितांचें काव्य जरीं प्राकृत आहे, तरीं तें पंडितांसच समजायास शक्य असें प्राकृत का-व्य आहे; त्यांत केकावली सारिखा ग्रंथ तर विशेषंकरून,

या

या माझ्या ह्मणण्यास तेहि रुकार देतील. आणखी लोकस्थि-
-ति पाहिली असतां ब्राह्मण जातीच्या खाणी शिवाय पंडित-
रत्नाची उत्पत्तिहि असंभवनीय; त्या खाणींतहि इतर पार्थिव
खाणी प्रमाणें गारगोटेच फार,कोट्यावधि गारगोट्यांत एकादें
रत्न सांपडलें तर नकळे. त्या पंडितांतहि स्वाधीनशास्त्रज्ञा-
-नाचा अभिमान एकीकडेस ठेऊन, प्राकृत कवितेंत कशी
चमत्कृति आहे अशी जिज्ञासा धरून, गीर्वाण वाणीच्या
अभ्यसनाच्या माडी वरून प्राकृत ग्रंथ पाहण्यास खालीं
उतरण्याचें लघुत्व आणि श्रम घेणारा शत पंडितां मध्यें
एकादा निघाला तर निघेल. तेव्हां या मानानें पाहिलें
असतां वामन, मोरोपंत यांचीं काव्यें पहाणारा दहा लक्षांत
एकादा ब्राह्मण सांपडेल; निदान, लक्षांत तरीं सांपडला तर
सांपडेल. या माझ्या ह्मणण्यांत जरीं अतिशयोक्ति असली
तरीं ती फार आहे असें, या विषयीं यथायोग्य विचार कर-
-णारे कोणी ह्मणणार नाहींत. मग ब्राह्मणव्यतिरिक्त जो फार
मोठा समाज राहिला त्याची तर गोष्टहि बोलायास नको.
केवळ या कवीच्या ग्रंथांच्या काठिन्या स्तवच यांच्या ग्रं-
-थांचें दुर्ज्ञयत्व आहे असें कोणी माझ्या या ह्मणण्या वरून
समजूं नये; परंतु त्या कारणा शिवाय आणखी बहुधा या
देशांतील लोक अनभ्यस्त असून नुसतें वाचण्या लिहिण्याचें
हि ज्ञान त्यां मध्यें फार कमी असतें या मुळें हे ग्रंथ इतके दुर्ज्ञे-
य झाले आहेत असें तर मला खचित वाटतें. त्यांत मोरोपंताचें
काव्य विशेषेंकरून इतकें दुर्बोध कां याचें कारण या उपो-
-द्घाताच्या आरंभीं सविस्तर कळविलेंच आहे. त्यांत आ-
णखी

णखी विचार केला पाहिजे कीं, वामन मोरोपंत यां सारिख्या महापंडितांनीं ( एथें यांस महापंडित ह्मटलें याची शास्त्री पंडित यांनीं मला क्षमा करावी ) संस्कृतभाषेंत आपले ग्रंथ रचण्याचें तात्कालिक श्लाघ्य कृत्य सोडून प्राकृत ग्रंथ रचण्यांत जे इतके परिश्रम केले, या वरून सद्यःप्राप्त यशा कडेस त्यांनीं लक्ष नदेतां इतर सर्व प्राकृत लोकांस ज्ञान व्हावें याच औपकारिक बुद्धीनें त्यांहीं हे ग्रंथ रचले असावे अशी माझी दृढ अटकळ होत्ये. ह्मणून हा त्यांचा परम स्तुत्य हेतु सिद्धीस नेण्याच्या मार्गांत ज्या ज्या अडचणी आढळतील, त्या त्या सर्व दूर करणें हा आतां आपला धर्म होय, असें मनांत आणून म्यां ही प्रकृत टीका करण्याचा उद्योग प्रथमतः हातीं धरिला. मोरोपंताच्या साद्यंत कृतीचा अभ्यास करून, त्यांच्या सर्व काव्या वर टीका लिहून; तें सुबोध करण्याच्या अतिमहत्कृत्यास अवकाशाच्या आणि सामर्थ्याच्या अल्पत्वा मुळें प्रथम माझें मन धजेना; ह्मणून आपल्या कवीच्या सर्व कृतींत अत्यंत प्रख्यात जीं काव्यें त्यां मध्यें प्रस्तुत केकावलि स्तोत्र हें एक लहानसें प्रख्यात काव्य जाणून म्यां या वर बानगी प्रमाणें पुढील टीका करण्यास आरंभ केला. त्यांतहि या लहानशा ग्रंथाचा विषय निवळ भगवत्स्तुतिपर असल्यानें माझें मन अधिक लोभावलें. त्यांत आणखी पंताच्या काव्यांत निष्णात ह्मणून वाखाणिलेल्या पुरुषां मध्यें- हि बहुत्येकांस केकावलि हा ग्रंथ साद्यंत लागत नाहीं, असाहि बोभाट माझ्या ऐकण्यांत होताच; या सर्व कारणा

वरून

वरून मोरोपंताच्या ग्रंथा वर टीका करण्यास हाच लहानसा ग्रंथ म्यां निवडून काढिला.

त्यांत ज्या विस्तार पद्धतीनें प्रथम ही टीका करण्यास म्यां आरंभ केला, त्या गोष्टीस आज पांच वर्षें झालीं. त्या विस्तारपद्धतीचा मुळारंभीं हेतु असा होता कीं माझी परम आवडती आणि सुशीला कन्या कावेरी बाई, जीस जगदीशानें आतां दोन वर्षें झालीं आपल्या सन्निद्ध नेलें, तिला ज्या रीतीनें हें काव्य सुबोध होई अशा रीतीनें पाल्हाळ करून म्यां याज वर टीका लिहिली. ती अशी कीं कोणताहि कठीण शब्द पर्याया वांचून आणि अर्था वांचून ठेविला नाहीं; महाराष्ट्र ग्रंथ भाषेच्या रूपांचींहि पर्यायरूपें लिहून ठेविलीं; मनांत कीं तिला या अशा पद्धतीच्या टीके वरून हा ग्रंथ लागला तर इतर बालांसहि सहज लागेल. ही टीका म्यां शके १७८१ च्या वर्षी ठाण्यांत सरकारी कामा वर असतां प्रातःकाळीं मला जो दोन तीन तास वेळ सांपडे, तो या कामा कडेस देऊन आरंभिली, आणि तेथे सुमारें सहा महिन्यांत अर्धा अधिक इतका ग्रंथ संपविला. पुढें सरकारी काम सोडून घरीं मुंबईस आलों, तेव्हां बाकी राहिलेला ग्रंथ लवकरच संपविला. त्या नंतर २३वी मे सन १८६३ इस्वीच्या रात्रीस त्या कन्येस जगदीशानें आपल्या जवळ नेलें. त्या तिच्या वियोगानें अत्यंत दुःखितांतःकरण होत्साता आपल्या मनींत विचार करूं लागलों कीं, तिचें स्मरण राहण्या करितां वापी, कूप, तडाग, अथवा धर्मशाळा, बांधून एकादें पूत कर्म करावें तर तितकें द्रव्यसामर्थ्य आपल्यास नाहीं; तेव्हां जिच्या अ-

-भ्यासा करितां जो ग्रंथ लिहिण्यास प्रथम लेखन हातीं धरिली तोच ग्रंथ आतां तिच्या स्मरणास अर्पण करून प्र-सिद्ध करावा, आणि त्या पासून आपल्या स्वदेशीय लोकांस कांहीं उपयोग घडला तर तसें तरी स्मरणीय पूर्त कर्म करावें, असा मनांत विचार करून ज्या रीतीनें आबालवृद्धांस हा ग्रंथ उपयोगी पडेल अशा रीतीनें पुनः याचें पूर्वापर शोधन करून छापण्या करितां सिद्ध केला.

मला एका गोष्टीची भीति वाटत्ये कीं प्रौढ बुद्धीच्या पुरु-षांस समजायास अगदीं अवघड नाहींत अशा शब्दांच्याहि पर्यायां वर पर्याय लिहून अर्थ विस्तारहि लांबवून या पुढील टीकेंत फारच पाल्हाळ केला आहे; या वरून कित्येक विद्व-ज्जन पुढील टीकेस दोष लावितील, त्याचा मीं मोठ्या विन-यतेनें स्वीकार करितों. परंतु वर जें म्यां कारण सांगितलें त्या वरून त्यांच्या ध्यानास येईल कि हें मोरोपंताचें लहा-नसें काव्य केवळ प्रौढ बुद्धीच्याच पुरुषांस सुबोध व्हावें म्हणून ही त्या वर पुढील टीका केली नाहीं; तर शाळांत पढणाऱ्या विद्यार्थ्यांस शब्दज्ञान व्हावें, शब्दांचा परस्प-रान्वय समजावा, आणि कोठे कोठे वाक्यांत अलंका-रांचेंहि ज्ञान व्हावें, असा जो माझा मुळचा हेतु होता तो तसाच अबाधित ठेवून, त्यास विद्वज्जनांच्याहि आदरास पात्रता यावी म्हणून उत्तरोत्तर अर्थाची दाढर्यता आणि अधिकाधिक अनुकूलता दाखविण्या करितां जे शब्दांचे पर्याय म्हणून अशी - खुण करून लिहिले आहेत, तेहि चढत्या पायरीनें प्रविष्ट केले आहेत; आणि वाक्याचे अर्थ आणि आशय

हि

हि त्यांच्या गांभीर्याच्या आणि गूढत्वाच्या प्रमाणानें वर-च्या घडी पासून आंतील * घड्या उकलून दाखविले आहेत; आणि आवश्यक स्थळीं त्यांचे इंगितार्थ आणि ध्वन्यर्थ हि सुचविले आहेत. मूळ शब्दाच्या अर्थाची परिपूर्तता दाखविण्या करितां जेथे शब्दांतराचें अथवा वाक्यांतराचें अंतर्निवेशन आवश्यक, तेथें ✓ अशा खुणेनें तो त्या खुणेच्या मागला अंतर्लेख दाखविला आहे. आणखी स्थळोस्थळीं अर्थाच्या समर्थना करितां आणि स्पष्टीकरणा करितां त्या त्या पृष्ठा खालीं बारीक अक्षरांनीं टीपा करून ग्रंथांतराचीं पुष्कळ संस्कृत आणि प्राकृत प्रमाणेंहि दिलीं आहेत. सारांश हा पुढील मोरोपंताचा लहान ग्रंथ सर्वांस सुबोधित करण्यांत त्यास जितका योग्य त्या पेक्षांहि कदाचित् अधिक श्रम घे-ण्यांत म्यां आपलें अंग चोरिलें नाहीं; म्हणून विद्वज्जन मज वर कृपाच करितील असा मला भरंवसा आहे. आणखी म-ला दुसरी अशी भीति वाटत्ये कि या माझ्या पुढल्या ग्रंथां-त प्रमादानें अथवा माझ्या अज्ञानानें अशुद्ध लेख पडले अ-सतील, आणि कोठे कोठे मूळ अर्थाचीहि सूक्ष्मता माझ्या लक्षांत आली नसेल, आणि कोठे विपरीत अर्थहि लिहिण्यांत आला असेल, तर शास्त्रीपंडितांनीं आपल्या उदार अंतःकरणां-नीं-सांप्रतच्या धर्मशास्त्रा प्रमाणें कलयुगांत शुद्ध क्षत्रिय आणि शुद्ध वैश्य हे वर्ण नाहींत, ह्मणून तेच सांगतात. तेव्हां अर्थात् ब्राह्मणाभावीं अवशिष्ट राहिलेल्या वेदोक्त मंत्रांनीं असंस्कृत अशा जातींतच माझा जन्म असल्यानें यथाशास्त्र मज कडून शास्त्राध्ययन अथवा काव्यव्युत्पत्ति घडणें दुर्घट, आणि वर्णा

प्रमाणें

प्रमाणें वाणिहि असंस्कृत, या कारणा कडेस आपली दृष्टि पोंहचविली असतां उक्त दोषां विषयीं त्यांची क्षमा मागण्यास मला मोठा अवकाश आहे. आतां ही पुढील टीका के-ल्यानें जर या आपल्या महत्कवीचा काव्यसमूह समज-ण्याच्या मार्गाचें मज कडून उद्घाटन होऊन तेणेंकरून स्वदेशविद्यांचें ज्ञान प्रसरणाच्या कार्यांत मज कडून काहीं तरीं सुदामाच्या पृथुकृतंदुलार्पणा प्रमाणें साहित्यार्पण झा-लेंच तर या माझ्या श्रमाचें साफल्य झालें असें मानून मीं समाधान पावेन.

या केकावलि ग्रंथा वर पुढील टीका लिहिण्यास आ-रंभ करायाच्या पूर्वीं म्यां या ग्रंथाच्या शुद्ध प्रती जितक्या मिळतील तितक्या मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यांत मा-झ्या ऐकण्यांत होतें कि मोरोपंतानें आपल्या सर्व कृतींतून बहुत्येक ग्रंथ स्वतः आपल्या हातानें लिहून ठेविला आहे, त्यांत ही केकावलिहि आहे. ती सारी त्यांची कृति त्यांचे नातू हालीं पंढरपुरीं सुखवस्ति करून राहतात, त्यांतून एका कुटुंबाच्या संग्रहीं आहे; त्यांच्या मुलांची म्हणजे पंताच्या पणतांची माझी गांठ पडली तेव्हां म्यां त्यांस त्यांच्या पूर्वजाच्या ग्रंथा वर टीका करून त्यांचें उज्वलन करून पंताची सेवा करण्याचा आपला मनाचा निर्धार सांगितला; आणि या कार्यांत त्यांणीं कृपा करून पंताच्या हातचा लि-हिलेला केकावलीचा ग्रंथ त्यांच्या संग्रहीं आहे तो शेवटीं दोन दिवस तरीं मला पहाण्यास द्यावा, म्हणजे संशयरहित शुद्ध ग्रंथा वर टीका होईल; इतकें साहित्य त्यांहीं आपल्या

वडिलांच्या कीर्तीच्या वृद्ध्यर्थ करावें म्हणून त्यां त्यांस फार विनवणी केली; परंतु ह्यावेळ पर्यंत तसें घडून माझी इच्छा सफल झाली नाहीं. शेवटीं केकावलीचें एक पुस्तक शिला-छापा वर छापिलें होतें त्याची एक प्रत माझ्या संग्रहीं होती, आणि पुण्याहून आमचे जुने मित्र राजश्री परशुरामपंत गडबोले यांणीं आपल्या हातानें केकावलीचें पुस्तक शुद्ध लिहिलें होतें तें त्यांज कडून कांहीं दिवस मागून आणविलें तें, अशा दोन प्रती वरून कोठें शुद्धाशुद्ध पाहून ही पुढील प्रत सिद्ध करून या ग्रंथा वर टीका केली आहे. पंताच्या हातचें लिहिलेलें पुस्तक जर या कार्यांत पहाण्यास मिळतें, तर फारच चांगलें होतें; परंतु मला असें वाटतें कीं या पंताच्या ग्रंथाचें फारसें पाठांतर झालें नसावें. कोठें मूळचा पाठ बदलला असला तर तो फारच थोडा असेल. शत पंडितां मध्यें एकादा पंडित प्राकृत ग्रंथाचें आस्थापूर्वक अव-लोकन करणारा सांपडेल, ह्मणून जें त्यां वर सांगितलें, त्याच विरळ कोटींत परशुरामपंत यांची गणना केली पाहिजे; त्यांणीं पंताच्या काव्या वर फार लक्ष दिलें आहे, आणि त्यां-हीं आपले हातचें लिहिलेलें केकावलीचें मूळ पुस्तक उपयोगी पडण्या करितां माझ्या स्वाधीन केलें, ही त्यांची मज वर मोठी स्मरणीय उपकृति आहे असें मीं समजतों.

जगत्पिता परमेश्वर-यास प्रथम दंडवत् प्रणिपात करून, नंतर ज्यांच्या उदरीं त्या जगदीशानें मला जन्म दिला त्या परम वंद्य आणि प्रेमास्पद मातापित्यांचें नामयुग्मानें या माझ्या टीकेस अभिधान देऊन, यश देणारें मातृनाम यशोदा, आणि

त्या

त्या यशाची निर्मलता दर्शविणारें पितृनाम पांडुरंग, अशा नामयुग्मास वंदन करून या उपोद्घाता सहित आतां मीं आपला ग्रंथ संपवितों.

दा० पां०

निवासस्थान मुंबापुरी
चैत्रशु ॥ १० शके १७८७ क्रोधननामसंवत्सरे.
मु ॥ ५ वी माहे एप्रिल सन १८६५ इस्वी.

श्री

## यशोदापांडुरंगी या नावाच्या टीके सहित

# केकावलि

सदाश्रितपदासदाशिवमनोविनोदास्पदा ॥
स्वदासवशमानसाकलिमलांतकाकामदा ॥
वदान्यजनसद्गुरोप्रशमितामितासन्मदा ॥
गदारिदरनंदकांबुजधरानमस्तेसदा ॥ १ ॥

### प्रस्ताव

या प्रथम श्लोकांत सारीं नामें भगवद्गुणविशिष्टविशेषणात्मक व संबोधनात्मक आहेत, अतएव शिष्टकविसंप्रदायानुरूप ही केका केवल मंगलाचरणात्मिका अशी जाणिली पाहिजे. हा मूलग्रंथ मुख्यत्वें कृष्णस्तुतिपर असल्यानें ही वैष्णवी स्तुति मानिली असतां बाध येणार नाहीं. त्यांत प्रथमतः भगवंताचे भक्तवात्सल्यशरणागतदुरितनिवारकत्वादि जे भक्तजनांस अत्यंत इष्ट गुण तेच उद्देशून मोरोपंत कवि स्तुतीस आरंभ करितात. त्यांत ते प्रथमतः या पहिल्या केकेंत प्रार्थनापूर्वक नमस्कार समर्पितात. परंतु कोणाची हि प्रार्थना कर्तव्य असतां ज्याची प्रार्थना करायाची, त्याचें अव्यवहित अवधान प्रार्थकानें आपल्या कडेस लावून घेणें हें प्रथम कार्य असें जाणून मोरोपंत या केंकेंत भगवंतास संबुद्धीनें ह्मणजे हाक मारून अत्यंत विनयतेनें नमस्कार करितात.

## टीका.

**पदान्वय—** सदाश्रितपदा, सदाशिवमनोविनोदास्पदा, स्वदासवशमानसा, कलिमलांतका, कामदा, वदान्यजनसद्गुरो, प्रशमितामितासन्मदा, गदारिदरनंदकांबुजधरा, ते सदा नमः.

**सदाश्रितपदा,—** हे सदाश्रितपदा, - सत् ह्मणजे साधु नारदादि, त्यांनीं आश्रित आहेत पद ह्मणजे पाय ज्याचे असा तूं; - तुझ्या पायां वांचून दुसरें शरण्य अथवा समाधानस्थान नाहीं, त्यांच्या आश्रयणा वांचून दुसरा कोणताहि तरणोपाय नाहीं, असा पूर्ण निश्चय करून नारदकपिलव्यासवाल्मीकादि जे महा ज्ञानी झाले त्यांनीं हि त्यांचाच आश्रय केला; - येणेंकरून भगवद्भक्ति हाच काय तो ज्ञानाचा परिपाक, हेंच काय तें ज्ञानाचें मुख्य आश्रयस्थान, पुष्कळ बुद्धिमान पुरुषांची बुद्धि अस्थिर होत्साती सैरावैरा धांवती, परंतु शेवटीं ती भगवद्भक्तींतच विश्राम पावती, पुष्कळांचे ज्ञानतरंग या भवसागरीं नानारूपांनीं प्रकटित होतात, परंतु ते अनेक घोटाळे खाऊन शेवटीं तुझ्या भक्ती शिवाय दुसरें तीर नसल्यानें तेथेंच लीन होणें त्यांस प्राप्त होतें, असा एथील गूढार्थ जाणावा[1]; हाच अर्थ पुढल्या विशेषणांनीं

---

1 महात्मानस्तुमांपार्थदैवींप्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसोज्ञात्वाभूतादिमव्ययम् ॥
भ० गीता, अ० ९, श्लो० १३.

सततंकीर्तयंतोमांयतंतश्चदृढव्रताः ।
नमस्यंतश्चमांभक्त्यानित्ययुक्ताउपासते ॥
——— श्लो० १४.

आलोड्य

विशेषणांनीं स्पष्ट करून दाखविला आहे. कदाचित् आपण पुसाल कि माझ्या भक्तीच्या प्रेमांत असा कोण निमग्न आहे? त्यास, मानवांची तर कथा काय सांगावी, परंतु सर्व देवगणांत श्रेष्ठ, जो आपल्या त्रयींतला, असा महेश, त्या-च्याहि आनंदाचें स्थान आपणच अहां, अशी आशंका निवारित होत्साते कवि पुढलें विशेषण देऊन ह्मणतात,— **सदाशिवमनोविनोदास्पदा,**— हे सदाशिवमनोविनोदा-स्पदा,— सदाशिव - महादेव, त्याचा जो मनोविनोद- मनाचा हर्ष, त्या हर्षाचें आस्पद- स्थान- कारण- आ-द्यमूल, तूं आहेस; तुझाच महिमा मनांत आणून हर्षयुक्त होत्साता शिव तांडव करितो. अथवा, सदाशिव- तमो-गुणोद्भव जगत्संहारकर्त्री कालात्मक कालभैरवरूप जी व्यक्ति, तिचा मनोविनोद- मनोविलास- जगत्संहरण-रूप मनोव्यापार इ०, त्याचें आस्पद- स्थान- कारण- मूलप्रेरणा, एतद्रूप असा तूं; अर्थात् त्वां प्रेरणा केली आ-हे, त्वां अधिकार दिला आहे, ह्मणूनच कालभैरव या जगताचें संहरण करितो, त्या प्रेरणे वांचून इतकें महत्कार्य

करण्यास

---

आलोड्यसर्वशास्त्राणिविचार्यचपुनःपुनः ।
इदमेकंसुनिष्पन्नंध्येयोनारायणःसदा ॥

महाभारतेव्यासोक्तिः

तुकाह्मणेसार दृढपायधरावे तुकाराम.
बोलणेंचिनाहीं आतांत्यावीणकाहीं ॥
एकसरेंकेलानेम देवादिल्हेंक्रोधकाम ॥
पाहेनतेपाय जोंवरिहेदृष्टिधाय ॥
तुकाह्मणेमनें हेचिसंकल्पवहाणें ॥ ——

करण्यास तो केवळ असमर्थ असा ध्वन्यर्थ जाणावा.[1] अथवा, या विशेषणांत **सदा**- निरंतर, हें पद निराळें काढून, **शिवमनोविनोदास्पदा** असें एकपद केलें तथापि सां-गितल्या सर्व अर्थांची योजना तशीच राहून अर्थापत्तिहि तशीच होत्ये, ह्मणून इष्ट असल्यास तशी योजना करावी. कदाचित् आपण ह्मणाल किं सदाशिव तर आमच्याच त्रयीं-तला, माझीच मूर्ति आहे, तेव्हां त्याच्या मनोविनोदाचें कारण मीच आहें यांत कांहीं आश्चर्य नाहीं; परंतु त्याहून इतरांस मी वश होतों किं काय या आशंकेचें निवारण करित होत्साते कवि पुढलें विशेषण देतात.— **स्वदासवशमा-नसा,**— हे स्वदासवशमानसा, **स्वदास**- आपले सेवक- भक्त प्रल्हादअजामिलादि, त्यांस- **वश**- अनुकूल- आधीन, आहे- **मानस**- अंतःकरण, ज्याचें असा तूं; जे अनन्य-भावेंकरून तुला शरण येतात, या भवसागरांतून पार उतरविण्यास तुज वांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं असें

समजून

---

१ भागवतांत भीष्मानें कालमाहात्म्य सांगितलें आहे;—

सर्वकालकृतंमन्येभवतांचयदप्रियं ।
सपालोयद्वशेलोकोवायोरिवघनावलिः ॥

स्कं० १, अ० ९, श्लो० १४.

भागवतांत कपिलमुनीनें देवहूतीस भक्तियोग सांगितला आहे त्यांत कालमाहात्म्य वर्णिलें आहे;—

रूपभेदास्पदंदिव्यंकालइत्यभिधीयते ।
भूतानांमहदादीनांयतोभिन्नदृशांभयम् ॥

————श्लो० २९.

योऽतःप्रविश्यभूतानिभूतैरत्त्यखिलाश्रयः ।
सविष्ण्वाख्योऽधियज्ञोऽसौकालःकलयतांप्रभुः ॥

स्कं० ३, अ० २९, श्लोक ३८.

समजून जे तुझीच कास धरून तुझ्या भजनीं लागतात, त्यांसच तूं वश होतोस, आणि त्यांचे मनोरथ पूर्ण करितोस, अशीं तुझींच वचनें प्रमाण आहेत.[१] कदाचित् आपण ह्मणाल कीं पापा पासून अलिप्त असून शुद्धांतःकरण होत्साते जे मला शरण येतात, त्यांसच मीं वश होतों, तुज सारिखे जे पापग्रस्त आहेत त्यांज वर मी कदापि अनुग्रह करित नाहीं; त्यास, हें सत्य आहे, तथापि पापीजनांचें पाप दूर करण्याचेंहि सामर्थ्य आपलेंच आहे; आपणा वांचून इतकें महत्कार्य करण्यास इतर कोणी समर्थ नाहीं; पापपराजित जे आह्मीं केवळ अशक्त जीव, त्या आह्मांस इतक्या महच्छत्रूच्या हातांतून सोडवून मग अनुग्रह करणारे आपणच, या प्रमाणें आशंका निवारित होत्सातें कवि पुढलीं दोन विशेषणें देऊन ह्मणतात.— **कलिमलांतका, कामदा,**— हे कलिमलांतका, हे कामदा, कलिमल- पाप, त्याचा **अंतक**- अंतकरणारा- नाशकरणारा, असा तूं; एथें **अंतक** या शब्दानें पापाचें शत्रुत्व ध्वनित होतें, पापरूप जो आमचा महान् शत्रु त्याचा नाश करणारा तूंच आहेस; आणि असा त्याचा नाश केल्यावर मग **कामदा, काम**- मनो-

रथ

---

१ मय्यर्पितमनोबुद्धिर्योमद्भक्तःसमेप्रियः ॥

भ० गीता, अ० १२, श्लो० १४.

अनन्येनैवयोगेनमांध्यायन्तउपासते ।
तेषामहंसमुद्धर्तामृत्युसंसारसागरात् ॥

——. श्लो० ६, ७.

नाऽहंवसामिवैकुंठेयोगीनांहृदयेरवौ ।
मद्भक्तायत्रगायंतितत्रतिष्ठामिनारद ॥

-रथ- इच्छा, यातें देणारा, असा तूंच; निर्मलांतःकरण जे तुझे शरणागत भक्त त्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण करणारा तूंच आहेस, ह्मणूनच तुला भक्तकामकल्पद्रुम असें ह्मणतात. परंतु एथें 'काम' ह्मणजे ऐहिकराज्यादिभोगेच्छा असा अर्थ कोणी मनांत आणील, अथवा आपले सेवक किंवा याचक यांचे मनोरथ पूर्ण करणारे कर्णादि दाते पुराणप्रसिद्ध आहे-तच, मग 'कामद' या विशेषणानें विशेषार्थापत्ति ती कोणती अशी आशंका घेईल, तर तसें नव्हावें या हेतूस्तव, अथवा आपल्या अभिप्रेतार्थास दार्ढ्य यावें या हेतूस्तव, कवि पुढलें विशेषण देऊन ह्मणतात.- **वदान्यजनसद्गुरो,**— हे वदा-न्यजनसद्गुरो, वदान्यजन- उदारजन [१]- कर्णप्रभृति जे महान विख्यात दातेजन, त्यांचा 'सद्गुरु- स्वामी- आचार्य, असा तूं; त्या सर्वांस औदार्या विषयीं उपदेश तुझा आहे, तुझ्या प्रेरणे वांचून उदार जनांची औदार्यकर्मा विषयीं प्रवृत्ति असं-भवनीय, ह्मणून सर्व दातेजनांचा तूं आचार्य आहेस; अत-एव त्या सर्वांत तूं अत्यंत श्रेष्ठ होस, तुज परता दुसरा वदान्य कोणी नाहीं असा अर्थ. ( एथें जें 'सद्गुरो' ह्मणोन संबो-धनाचें रूप आहे, तें संस्कृत व्याकरणाच्या नियमा प्रमाणें ). [पूर्वपक्ष] जर मी अशा सर्व वदान्य जनांत श्रेष्ठ आहें, आणि मज परता दुसरा कोणी दाता नाहीं, तर मग लोक मला शरण येऊन माझा अनुग्रह संपादण्या करितां कां धजत नाहींत ? असें कदाचित् आपण पुसाल तर, यांत महाराज आपल्या

वदान्यत्वास

१ स्युर्वदान्यस्थूललक्ष्यदानशौंडाबहुप्रदे

इत्यमरः

वदान्यत्वास किमपि बाध नयेतां उलटें यांत अशा लोकांचेंच दौर्भाग्य तर काय सांगावें, परंतु अहंकारजन्य पातित्यहि उपलब्ध होतें. तथापि याहि पातित्या पासून उद्धार करून त्यांज वरहि अनुग्रह करणार आपणच, अशा अर्थाची विवक्षा करित होत्साते कवि पुढलें विशेषण देतात.— **प्रश-मिताभितासन्मदा,**—हे प्रशमितामितासन्मदा, **प्रशमित**- अत्यंत शमविले आहेत, **अमित**- पुष्कळ, असे जे **अ-सत्**-दुष्ट, त्यांचे **मद**- गर्व- अहंकार इ०, ज्याणें असा तूं. ( अथवा एथें **अमित** हें **असत्** या एका शब्दाचें विशेषण नकरितां **असन्मद** या संयुक्त शब्दाचें विशेषण करून कर्मधारय समास केला तरीं चालेल; अथवा, **असन्मद** एथें षष्ठीतत्पुरुष नकरितां कर्मधारय केला तरीं चालेल; परंतु उभयपक्षीं अर्थास किंचित् गौणत्व येतें म्हणून वरचा पक्ष विशेषार्थवान् जाणून घेतला आहे ). सर्व वदान्य जनांत श्रेष्ठ, अतएव अत्यंत कारुणिक जो तूं त्या तुला शरण नजा-तां हिरण्यकशिपुरावणकंसचाणूरादि जे जे आपल्या गर्वांत राहिले, त्या त्या असंख्य मदोन्मत्त जनांचा तो गर्व त्वांच उतरविला; अर्थात् त्यांच्या दांतीं तृण देऊन शरणागत करून त्यांस आपलें दयापात्र त्वांच केलें. या शेवटल्या पदानें तर मोरोपंतानें भगवंताचा पतितपावनत्व म्हणून जो अत्यंतकारुण्यरूप गुण, त्याचें वर्णन करून दाखविलें असें समजावें. [ पूर्वपक्ष ]- बरें जसें त्वां आतां माझें वर्णन केलें तसा जर मीं आहें, तर मग ते ते गुण दाख-विणारीं चिन्हें माझ्या अंगीं कोठे आहेत? अशी आशंका

कवि

कवि ह्मणतात कदाचित् आपण ध्याल, तर महाराज तीं चिन्हें कोठे आहेत ह्मणून काय पुसतां, तीं तर आपण आयुधरूपेंकरून निरंतर धारण करितां[1], या प्रकारें आशं-केचें निवारण करित होत्साते कवि शेवटलें विशेषण देऊन नमस्कार करितात.-**गदारिदरनंदकांबुजधरा,**— हे गदा-रिदरनंदकांबुजधरा, **गदा**- प्रसिद्ध, अथवा शुद्ध मराठी पर्या-य ह्मटला ह्मणजे सोटगा, **अरि**- चक्र, **दर**- शंख, आणि **नंदक**- आनंदकरणारें, असें जें **अंबुज**- कमल, यांतें **धरा**- धारण करणारा, असा तूं त्याचें संबोधन. विष्णूच्या खड्गाचें नावहि **नंदक** असें आहे[2], त्यातें धारण करणारा, अशा अर्थाचीहि प्रसिद्धि असेल, परंतु तसा अर्थ केला असतां प्रसिद्ध जी शंखचक्रगदापद्मधारी चतुर्भुजात्मक वि-ष्णुमूर्ति,[3] तिच्या हस्तसंख्येहून ही आयुधसंख्या एकाधिक होऊन त्या अवशिष्ट राहिलेल्या आयुधास निराधारत्व येऊं पाहतें, ह्मणून एथें **नंदक** हें पुढल्या **अंबुज** शब्दाचें विशे-षण मानावें ह्मणजे या आशंकेचें निवारण होईल असें मला वाटतें. वरकड सर्वशक्तिमान् अशा भगवंताच्या हस्ताद्य-

वयवांची

---

१ शंखभृन्नंदकीचक्रीशार्ङ्गधन्वागदाधरः ।
रथांगपाणिरक्षोभ्यःसर्वप्रहरणायुधः ॥
वि० स० नाम, श्लोक० १०७.

२ कौमोदकीगदाखड्गोनंदकःकौस्तुभोमणिः
अमर.

३ चतुरात्माचतुर्व्यूहश्चतुर्दंष्ट्रश्चतुर्भुजः ।
चतुर्मूर्तिश्चतुर्बाहुश्चतुर्व्यूहश्चतुर्गतिः ॥
वि० स० नाम, श्लो० ८२.

-वयवांची नियमितसंख्याक कल्पना करून तेथें बुद्धीस अट-
-कवून ठेवणें हा अज्ञानमूलक मनोव्यापार होय; कारण,
परमेश्वर अनंतहस्त, अनंतपाद, अनंतनेत्र, असा आहे[१]; ह्मणून
आपल्या भक्तजनांचें संकट निवारण्या करितां, अथवा आ-
-पला प्रभाव व गौरव प्रगट करण्या करितां, अथवा सद्धर्म
संस्थापण्या करितां, जेव्हां जेव्हां हीं पंचायुधें धरण्याचा
त्यास प्रसंग येतो, तेव्हां तेव्हां पांच हात प्रकट करून त्यांनीं
तीं धारण करणार नाहीं असेंहि संभवत नाहीं; अशी
कल्पना केल्या वर मग नंदक हें विशेषण नकरितां त्याचा
अर्थ खड्ग सुखानें मानावा. अथवा, पंचायुधें धरण्याचा
एककालिक प्रसंग मनांत नआणितां कार्यपरत्वें एका एका
आयुधाचें

---

१ विश्वतोबाहुरितिश्रुतेः
नमोस्त्वनंतायसहस्रमूर्तयेसहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे
वि०स०नाम, श्लो० १३२

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रंपश्यामित्वांसर्वतोऽनंतरूपं
भ० गी०, अ० ११, श्लो० १६.

क्रोधहाक्रोधकृत्कर्त्ताविश्वबाहुर्महीधरः
वि० स० नाम, श्लो० ३४.

हरिंसहस्रशिरसंसहस्रचरणेक्षणम् ।
सहस्रबाहुमुकुटंसहस्रवदनोज्वलम् ॥
भी० स्तवराज, श्लो० २५.

पश्यंत्यदोरूपमदभ्रचक्षुषा सहस्रपादोरुभुजाननाद्भुतं ।
सहस्रमूर्धश्रवणाक्षिनासिकं सहस्रमौल्यंबरकुंडलोल्लसत् ॥
भागव०, प्र० स्कं०; अ० ३, श्लो० ४.

तुकोबानेंहि ह्मटलें आहे.
रूपदाविकारेआतां सहस्रभूजांच्यामंडिता.

आयुधाचें धारण तत्तत्प्रसंगीं विवक्षित मानिलें, व असें मान
-ण्यास कांहीं बाध येतो असेंहि नाहीं, तर मग पंचहस्तांचीहि
कल्पना करण्यास अवकाश न देतां चतुर्भुजांतून एकानें पां
-चव्या खड्गाचेंहि धारण सुकर होतें. अथवा, एथें कम
-लाचें अधिष्ठान हस्त न मानितां जर विष्णूची नाभि मानिली
तर मग पूर्वोक्त आशंकेस अवकाश न राहतां विष्णूचें चतुर्ह-
-स्तांनीं नंदकादि चतुरायुधांचें धारकत्वहि अबाधित राहतें;
आणि असें मानण्यास विष्णूचें पद्मनाभ ह्मणून जें प्रसिद्ध
नाम आहे तेंच प्रमाण.[१] एथें आणखी सूक्ष्म विचारानें
पाहिलें असतां असें दिसतें कीं गदादि पंचायुधांचें जें एथें
कवीनें विधान केलें आहे, तेंहि यथासंख्य परंतु व्युत्क्रमानें,
ह्मणजे पूर्वोक्त **प्रशमितामितासन्मदा**दि अव्यवहित एका
मागें एक अशा पांच विशेषणांनीं सूचित जीं भगवद्गुणोल्ल-
-सितकार्यें त्यांच्या साधनास अनुकूल असें आहे. पहा-
अमित असन्मदातें प्रशमित करणारी अशी **गदा** होय,
कारण, मद ह्मणजे अहंकारमूलक मनोविकार, याच्या ठायीं
निरंतर उन्नतीची भावना असत्ये, ह्मणूनच मदोन्मत्त पुरुषांची
मान निरंतर वर राहत्ये, त्याचें प्रशमन ह्मणजे अधःपा-
-तन करण्यास, ह्मणजे त्यास खालीं पाडण्यास योग्य साधन
ह्मटलें

---

१ नमोऽस्तुपद्मनाभाय
ग० मोक्ष०, श्लो० ६५.
नाभिप्रजातकमलासनसंस्तुताय ——— श्लो ७०
अजस्यनाभ्यांसंभूतंयस्मिन्विश्वंप्रतिष्ठितं ।
पुष्करंपुष्कराक्षस्यतस्मैपद्मात्मनेनमः ॥
भी० स्तवराज, श्लो० ६१.

झटलें ह्मणजे गदा होय; द्रव्य, कुल, ज्ञान, वैभव, इत्या-
-दिकांचा अभिमान धरून कोणी उन्मत्त झाले कि त्याच्या मस्तका वर भगवंताची गदा पडून तिणें त्यास खालीं पाडिलेंच असें समजावें. **वदान्यजनसद्गुरु** या विशेषणानें भगवं-
-ताच्या सद्बुद्धिप्रेरकत्वगुणाचा अथवा भक्तसंकटनिवारकत्वगु-
-णाचा अथवा भक्तवरदत्वगुणाचा बोध होतो, तेव्हां तत्कार्य-
-साधनास योग्य **अरि** ह्मणजे चक्र होय, अर्थात् त्याचें सुदर्शन होय.[१] तसेंच तिसरा **कामदत्वरूप** ह्मणजे भक्त-
-मनोरथपरिपूरकत्वरूप जो भगवद्गुण तत्प्रसित्ध्यर्थ **दर** ह्मण-
-जे शंख हें दीर्घ आणि गंभीर असा घोष करणारें आयुध असल्यानें योग्य साधन होय; परमकारुणिक भगवान् विष्णु या

---

१ गजेंद्रमोक्षांत विष्णुस्तुतींत भगवंतास ' भक्तिप्रियायवरदीप्तिसु-
-दर्शनाय ' असें ह्मटलें आहे. एथें वरदीप्ति हें सुदर्शनाचें विशेषण यो जिलें आहे, वर ह्मणजे भक्तांस इष्ट जी सद्बुद्धिप्रेरणरूप क्रिया, तदुत्पन्न जी दीप्ति ह्मणजे अंतःप्रकाश, तद्रूप असें आहे सुदर्शन ज्याचें.

तसेंच भक्त गजेंद्र जेव्हां भगवंतानें मकरा पासून मुक्त केला, तेव्हां त्याचें संकटनिवारणरूप कार्य, तेंहि भगवंतानें आपल्या चक्रानेंच केलें-

जलस्थंदारयामासग्राहंचक्रेणमाधवः ।
मोचयामासनागेंद्रंपाशेभ्यःशरणागतम् ॥

गजेंद्रमो०, श्लो० ९७

भीष्मपर्वांत भगवंतास ह्मटलें आहे—

एह्येहिदेवेशजगन्निवासनमोस्तुतेशार्ङ्गगदासिपाणे ।
प्रसह्यमांपातयलोकनाथरथादुदग्राद्भुतशौर्यसंख्ये ॥

तुकारामानेंहि ह्मटलें आहे—

पडतांजडभारी दासींआठवावाहरी ॥
मगतोहोऊंनेदीशीण आडघाली सुदर्शन ॥

या आयुधानें सर्व जनांस कळवितो कीं, जे अनन्यभावेंक-रून मला शरण येतात, त्यांचे सन्मनोरथ परिपूर्ण करण्यास मी समर्थ आहें; अथवा माझ्या भक्तांस जे छळितात त्या दुष्टांचा नाश करून त्यां भक्तांस आश्रय देणारा मीच आहें; हें प्रस्फुट करण्या स्तव त्याचें पांचजन्यधारकत्व समजावें. ज्या काळीं भीष्मकृपाचार्यां सारिखे प्रचंड योद्धे आपले अ-धिपति असल्यानें सगर्व झालेली अशी कौरवांची महत्सेना पांडवांनीं पाहिली, आणि तिच्या दर्शनेंकरून जेव्हां अर्जुन भ्याला, त्या काळीं कृष्ण त्याचा सारथि असतां त्याणें आ-पला पांचजन्य फुंकला; असें करण्याचा हेतु हाच दिसतो किं एथे पांडवांस अभय द्यावें, आणि तेथे दुर्योधनादि उन्म-त्त वीरांस सुचवावें, कीं यद्यपि पांडव दुर्बल आहेत, तथापि यांचा रक्षिता मी भगवान् कृष्ण आहें, अतएव इष्ट जी विजयलक्ष्मी ती मीं आपल्या आश्रितांसच देणार, हें तुह्मी सारे पक्केपणीं समजा. **कलिमलांतक** या विशेषणें-करून पापाचें शत्रुत्व दर्शविलें आहे ह्मणून पूर्वींच सां-गितलें, तेव्हां शत्रुवधार्थ **नंदक** नामें खड्ग ह्मणजे तलवार हेंच आयुध योग्य होय. तसेंच **स्वदासवशमानस** या विशेषणानें असें इंगित होतें कीं भक्तीनेंच भगवदंतःकर-णाची प्रसन्नता होत्ये, ह्मणून ती प्रसन्नता दाखविण्या करितां **अंबुज** ह्मणजे कमल याचें धारण प्रशस्त होय; कारण, अंतःकरणाची प्रसन्नता आणि कमलाची प्रफुल्लता यांचें विकाशनधर्मत्वेंकरून साधर्म्य उपलभ्यमान होतें. तेव्हां

अशा विशेषणांनीं विशिष्ट जो तूं त्या' **ते सदा नमः**— ते[1]- तुला, **सदा**- निरंतर, **नमः**— नमस्कार, असो. या प्रमाणें कवि शेवटीं या गीर्वाणपदेंकरून भगवंतास नमस्कार करितात.

ही पहिली केका मंगलाचरणात्मिका असल्यानें महामायोपाधिकहरिहरादि[2]भगवदवतारपर न लावितां केवळ तदुपाधिरहित सच्चिदानंदरूपपरब्रह्मपर लाविली असतांहि लागाया जोगी आहे, असें माझ्या बुद्धीस वागतें. ती अशी कीं,— **सदाश्रितपदा**—एथें सच्छब्देंकरून सच्चिदानंदरूप परब्रह्मांतर्गत सत्पदार्थवाचक जें या विश्वाचें मूळ अधिष्ठान, तेणेंकरून **आश्रित** आहे **पद** ह्मणजे अस्तित्वरूप स्थान ज्याचें, असें जें सद्रूप परब्रह्म तें; अथवा, **सत्** ह्मणजे शुद्ध अ- -स्तित्व, तेणेंकरून' **आश्रित**— युक्त, आहे' **पद**—सच्चिदानंद- -रूप

---

१ हें युष्मत् शब्दाचें चतुर्थीचें रूप.

२ हरिहरादि या सृष्टीचे पाळनोपसंहरादिकांचें कर्त्ते ह्मणून मुख्य देव मानिले आहेत, तेहि या परब्रह्माच्या अलिकडले तदंशेंकरून वर्णिले आहेत;—

ब्रह्माविष्णुमहेश्वरू॥हेहिशिणतीकरितांसृष्ट्यादिव्यापारू॥
मगसेवितीविश्राममंदिरू॥ परब्रह्मतें ॥ १५ ॥

झालाजरींसर्वेश्वरू॥ धरिलाजरींजाणिवेचाअहंकारू ॥
तरीतोहिनेणेपारू॥ त्यास्वरूपाचा ॥ १७ ॥

चि० सिं०, पू० प्र० २.

-रूप पदत्रय-अर्थात् सच्चिदानंदरूप[3] परब्रह्म, तें; अथवा, सत् ह्मणजे सत्पदेंकरून विलसित जें हें विश्व[2], त्याणें आश्रित ह्मणजे आधृत, आहे पद ह्मणजे अधिष्ठान, ज्याचें तें, अर्थात् या सर्व विश्वाचें अधिष्ठानरूप जें परब्रह्म तें; त्याचें संबोधन.

**सदाशिवमनोविनोदास्पदा**— सदाशिव जो महायोगी[3], त्याचा

---

१ सत्‌शब्दें बोलिजे अस्तित्वता ॥ कालत्रयीं अबाधिता ॥
मायादेवीसीं तत्वता ॥ तें अघटमान ॥ १२ ॥

वि० सिं०, उ० प्र० ६.

सत्‌ह्मणिजे शाश्वत ॥ तेंचि ज्ञानपण ह्मणूनि चित् ॥
तेंचि स्वरूप यालागीं ह्मणिजेत ॥ आनंद ऐसें ॥ ६ ॥
ऐकें प्रकारांतरें निरूपण ॥ अस्ति भाति प्रियपण ॥
हें पदत्रय मिळून ॥ एकलें ब्रह्म ॥ ७ ॥
अस्ति ह्मणिजे आहे ॥ भाति ह्मणिजे प्रकाशरूप होय ॥
आणि आपण प्रिय ॥ अद्वयत्वें ॥ ८ ॥
यदस्ति तद्भाति ॥ ऐशी असे वेदश्रुति ॥
जें आहे तेंचि प्रकाशरूप ह्मणति ॥ तेंचि प्रिय ॥ ९ ॥

——— प्र० १०.

२ जगदिदमीश्वरलीलाविलसितमितिश्रुतेः

ज्याच्या सत्पदीं विश्व असे ॥ ज्याच्या चित्पदीं विश्व दिसे ॥
आनंदपदीं विश्व उल्लसे ॥ तो तूं श्रीगुरु सच्चिदानंद ॥

निगमसार वामनकृत.

३ योग हा प्रथम शिवापासून उत्पन्न झाला, ह्मणून पुराणप्रसिद्ध इतिहास आहे;—

त्याचा ´मनोविनोद ह्मणजे महायोग - निर्विकल्पसमाधिरूप, त्याचें ´आस्पद- गुरुरूपस्थान -अंतःप्रकाशक[१]; अथवा, सदा - निरंतर, शिव - कल्याण - परमानंदरूप, तोच अथवा

---

ह्मणूनिशिवादिगुरुपर्यंत ॥ जाणावेजेअवधूत ॥
तेमूर्तनाअमूर्तवत ॥ परब्रह्म ॥ ३२ ॥

वि० सिं०, उ० प्र० ११.

१ गुरुर्ब्रह्मागुरुर्विष्णुर्गुरुर्देवोमहेश्वरः ।
गुरुरेकःपरब्रह्मतस्मैश्रीगुरुवेनमः ॥

मुकुंदराज सद्गुरूच्या वर्णनांत ह्मणतात;—

ऐसीप्रतिज्ञाकरूनी ॥ शिष्यासंन्मुखबैसुनी ॥
आज्ञासमावेशकरूनी ॥ गुरुसंप्रदायक्रमें ॥ ९७ ॥
तेथज्ञानशक्तीचाप्रकाश ॥ अज्ञानशक्तीचानिरास ॥
बोधउठलास्वयंप्रकाश ॥ शिष्यचैतन्यीं ॥ ९८ ॥

शिवराम स्वामीनें एका पदांत ह्मटलें आहे;—

गपकरअंधारहोतातेथेखपकरउजेडलें नयनिंदाखवीलें ॥
चंद्रसूर्यनसतांतेथेतेजप्रकाशलें गुंगमल्लाकेलें ॥ धृ ॥

या गुरुदत्त प्रकाशाविषयीं मध्वनाथ ह्मणतात;—

अद्वैतकेलेंगुरून दाविलीहिऱ्याचीखाण प्रकाशकेलागहन संसारआतांकाहीं बोलणेंतंवउरलेंनाहीं ॥ मीविडीगझालेंबाई माणुसपणउरलेंनाहीं ॥ धृ ॥

मानपुरीप्रभु ह्मणतात;—

नज़रनआवेआतमजोती ॥ धृ ॥ तेलनबातीबुझनहीजाती नहीदिवसनहीराती ॥ १ ॥ जोतीप्रकाशेदशदिशाझमके जैसानिरमलमोती ॥ २ ॥

अथवा तदात्मक जो ' **मनोविनोद** - मनोविलास, तेंच आहे ' **आस्पद**- स्थान, ज्याचें-तें, अर्थात् आनंदरूप पर-ब्रह्म; अथवा, **सदा**- निरंतर, **शिव**-कल्याण- कैवल्यरूप, तत्पूर्वक जो ' **मनोविनोद**- मनाचा विनोद- मनाचें अव-स्थांतर भवन- अर्थात् मनाचें उन्मीलन- उन्मन्यवस्था, त्याचें ' **आस्पद**- अधिष्ठान, अर्थात् जेथें मनाचें उन्मीलन होतें तें कैवल्यस्थान; अथवा, **सदा**- निरंतर, **शिव**- रुद्र-येणेंकरून उपलक्षित जो काल, त्याचा ' **मनोविनोद**- गु-णसाम्याच्या ठायीं जें आद्य स्फुरण- अर्थात् तेणेंकरून महदादिप्रपंचहेतुक मूलतत्त्वांची आविर्भूति - अर्थात् स-र्वजगदाविर्भूति त्या सर्वांस- **आस्पद**- मूलाधिष्ठान- सच्चि-दात्मक परब्रह्म, त्याचें संबोधन. **स्वदासवशमानसा**- स्वदास - आपले दास- निरंतर शुद्धांतःकरणानें आणि भ-क्तिप्रेमरसानें आपलें सेवन करणारे जे भक्तराज नारदादि, त्यांसच'

---

१ भगवान् कपिलानें देवहूतीस तत्वनिर्णय सांगितला आहे, त्यांतहि सांख्यमता प्रमाणें गुणसाम्यरूपा* जी मूलप्रकृति तितें क्षुब्ध करणारा कालात्मक भगवान् ह्मणून वर्णिला आहे;—

प्रकृतेर्गुणसाम्यस्य निर्विशेषस्यमानवि ।
चेष्टायतःसभगवान् कालइत्युपलक्षितः ॥ १७ ॥
अंतःपुरुषरूपेण कालरूपेणयोबहिः ।
समन्वेत्येषसत्वानां भगवानात्ममायया ॥ १८ ॥

भाग०, स्कं० ३, अ० २६.

---

* सत्वरजस्तमसांसाम्यावस्थाप्रकृतिः— असें सांख्यसूत्र आहे.

त्यांसच ' वश - मोक्षपद देण्या करितां प्रसन्न, आहे ' मानस- अंतःकरण - चिद्वृत्ति, ज्यांची ' असो, त्याचें संबोधन. क- -लिमलांतका — कलि - कलियुग, तत्संबंधी जो ' मल-

अज्ञानरूप

---

१ येणेंकरून अनन्यभक्तीनेंच ब्रह्मप्राप्ति असा एथें कवीनें सर्वमतसिद्धांत सुचविला आहे असें समजावें.

श्वेताश्वतर उपनिषदांतहि एतत्सिद्धांतपूर्वकच मंगलाचरण केलें आहे;—

योब्रह्माणंविदधातिपूर्वंयोवैवेदांश्चप्रहिणोतितस्मै ।
तंहदेवमात्मबुद्धिप्रकाशंमुमुक्षुर्वैशरणमहंप्रपद्ये ॥

भगवान् कृष्णानेंहि गीतेंत हेंच सांगितलें आहे;—

मांचयोऽव्यभिचारेणभक्तियोगेनसेवते ।
सगुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयायकल्पते ॥

अ० १४, श्लो० २६.

येभजंतितुमांभक्त्यामयितेतेषुचाप्यहम् ।

अ० ९, श्लो० २९.

आणखी हीच भगवद्भक्ति मुख्य पुरुषार्थ ह्मणोन भक्तजन तीच वारंवार प्रार्थितात;—

नाथयोनिसहस्रेषुयेषुयेषुव्रजाम्यहम् ।
तेषुतेष्वचलाभक्तिरच्युतास्तुसदात्वयि ॥

विष्णुपु०

भक्त तोच महायोगी ह्मणून गीतेंत सांगितलें आहे;—

योगिनामपिसर्वेषांमद्गतेनांतरात्मना ।
श्रद्धावान्भजतेयोमांसमेयुक्ततमोमतः ॥

भ० गी०, अ० ६, श्लो० ४७.

ज्ञानदेव

अज्ञानरूप- मायाऽविद्यात्मक, त्याचा - अंतक - नाशक- समूल-

---

ज्ञानदेव ह्मणतात;—

भावेवीणभक्तीभक्तीवीणमुक्ती । बळेंवीणशक्तीबोलोंनये ॥
केसेनिर्दैवतमसन्नत्वरीत । उगाराहेनिवांतशिणशीवायां ॥
सायासेंकरीशीप्रपंचदिननिशीं। हरीशींनभजशीकवण्यागुणें॥
ज्ञानदेवह्मणेहरिनामजपणें । तुटतीबंधनेंप्रपंचाचीं ॥ ॥

तीर्थव्रतनेमभावेवीणसिद्धी । वायांचीउपाधीकरीशिल ॥
भावबळेंआकळेयेऱ्हवींनाकळे । करतळींआंवळेंतैसाहरी ॥
पारदाचारवाघेतांभुमीवरी । यत्नपरोपरीतैसींसाधनें ॥
ज्ञानदेवह्मणेनिवृत्तिनिर्गुण । दिधलेंसंपूर्णमाझेहातीं ॥ ॥

तुकारामानेंहि ज्ञाना पेक्षां भक्तींचें माहात्म्य अधिक ह्मणोन वर्णिलें आहे;—

जाणेभक्तिचाजिव्हाळा । तोचिदेवाचापूतळा ॥

नायकावेकानींतयाचेतेबोल । भक्तीवीणखोलज्ञानसांगे ॥
वाखाणीअद्वैतभक्तीभावेवीण । दुःखपावेशीणश्रोतावक्ता ॥
अहंब्रह्मह्मणुनीपाळीतसेपिंडा । बोलोंनयेभांडातयासवें ॥
वेदबाह्यलंडबोलेजोपाखंड । त्याचेंकाळेंतोंडसंतांमध्यें ॥
तुकाह्मणेखंडीदेवभक्तपण । वरिष्ठत्याहोनश्वपचतो ॥ ॥

भक्तीचेंहेंसुखभक्तचीजाणती । दुर्लभयागतीआणीकाशीं ॥
अभेदूनिभेदराखीयेलाअंगीं । वाढावयाजगींप्रेमसुख ॥
जाणोनीनेणतेजालेतयासुखें । नबोलोनिमुखेंबोलताती ॥
टाळघोळकथाप्रेमाचासुकाळ । मूढलोकपाळतरावया ॥
तुकाह्मणेआहेतयाशींचठावें । जिहींएकभावेंसाधियेलें ॥ ॥

वृक्षनेदीफळ । कायकरींवसंतकाळ ॥
तुकाह्मणेभक्तीवीण । फळनाहींनाहींजाण ॥ ॥

समूल नष्टकरणारा जो ब्रह्मसाक्षात्कार, तद्रूपे[1], त्याचें संबोधन. **कामदा — काम** - मुमुक्षुता - मोक्षमामीच्छा. तिनें देणा-रा - मोक्षप्रद - अंतर्ज्ञानप्रकाशक[2]- ब्रह्मानंददेणारा, त्याचें संबोधन. **वदान्यजनसद्गुरो — वदान्य**- उदारांतःकरण, असा जो ⁄जन - लोक-महात्मा - आस्तंभब्रह्मांडव्यापके-श्वरमहत्वातें आत्मज्ञानेंकरून अनुभवून महात्मता ज्यांस प्राप्त झाली आहे असे[3], त्यांचा ⁄ सद्गुरु - ती महात्मता

देण्यास

---

या आपल्या कवीनें आणखी एके ठिकाणीं भक्तीचें वर्णन एके आर्येंत असें केलें आहे कीं;—

भक्तिविनावशनोहे वीण्यानेंवामृदंगनादानें ।
कन्यादानफलातें पावतिकींतिमृदंगनादानें ॥

१ गीतेंत ह्मटलें आहे—

दैवीह्येषागुणमयीममायादुरत्यया ।
मामेवयेप्रपद्यंतेमायामेतांतरंतिते ॥

अ० ७, श्लो० १४.

श्वेताश्वतर उपनिषदांत ह्मटलें आहे—

मायांतुप्रकृतिंविद्यान्मायिनंतुमहेश्वरम्

२ भक्तिमीमांसेंत भगवंताच्या मोक्षप्रदत्वरूप गुणाचें लक्षण केलें आहे तें असें;—

भगवानेवात्मभक्तेस्त्रिगुणात्मकांतःकरणलयपूर्वकब्रह्मा-नंदावाप्तिलक्षणमुक्तिहेतुः

३ अशा माहात्म्याचें लक्षण आचार्यांनीं मनीषापंचकांत सांगितलें आहे.

जागृत्स्वप्न-

देण्यास परम समर्थ, त्याचें संबोधन. **प्रशमितामितास-न्मदा** — प्रशमित - अत्यंततेनें शमविलें आहे - अर्थात् नष्ट केलें आहे, **अमित** - अपार, **असन्मद** - मिथ्यामद-अहंकारजन्यप्रपंचमिथ्याज्ञान - मूलाऽविद्यात्मक - ज्याणें; त्याचें संबोधन. **गदारिदरनंदकांबुजधरा** — गदा-अहंकृतिजन्यप्रपंचमिथ्याज्ञानसद्बुद्धीतें जागृत करणारी जी भगवच्चिच्छक्ति तिचें उपलक्षण, **अरि** - चक्र - सत्ज्ञानरूप जो अंतःप्रकाश त्याचें उपलक्षण, **दर** - शंख - नादमूलक जो प्रणव - ओंकार, त्याचें प्रतिरूपक, **नंदक** - विष्णूचें खड्ग

---

जागृत्स्वप्नसुषुप्तिषुस्फुटतरायासंविदुज्जृंभते ।
याब्रह्मादिपिपीलिकान्ततनुषुप्रोताजगत्साक्षिणी ॥
सैवाहंनतुदृश्यवस्त्वितिदृढप्रज्ञापियस्यास्तिचेत् ।
चांडालोपिसतुद्विजोऽस्तुगुरुरित्येषामनीषामम ॥

तुकोबाहि ह्मणतात;—

अणुरेणुथोकडा तुकाआकाशाएवढा

विष्णुसहस्रनामभाष्यांत ह्मटलें आहे;—

मनस्तत्वात्मकंचक्रंबुद्धितत्वात्मिकांगदां ।
जगद्रक्षार्थंधरतीतिशंखचक्रगदाधरः ॥

ओंकार हा मूलनादब्रह्मात्मक शब्द केवळ ब्रह्मस्वरूपवाचक होय ह्मणून श्रुतिस्मृतींत याचें गौरव वर्णिलें आहे;—

**ओमित्येकाक्षरंब्रह्म** — अशी श्रुति आहे.

वायुपुराणांत सर्व मंत्रांत हा शब्द नायक होय ह्मणून शिवानें भवानीस सांगितलें आहे;—

ओंकारः

खड्ग - अज्ञानरूप अथवा संशयरूप जी ऱ्हदयग्रंथि तिचें छेदक जें आत्मज्ञान[1] त्याचें प्रतिरूपक, अंबुज - कमल - संसारदुःखेंकरून पीडित जो जन त्याच्या म्लान आणि आकुं-
·चित

---

ओंकारःप्रणवोब्रह्म सर्वमंत्रेषुनायकः ।
आदौसर्वत्रयुंजीतमंत्राणांचशुभानने ॥

गीतेंतहि कृष्णानें अर्जुनास या शब्दाचें माहात्म्य सांगितलें आहे;—

ओंमित्येकाक्षरंब्रह्मव्याहरन्मामनुस्मरन् ।
यःप्रयातित्यजन्देहंसयातिपरमांगतिम् ॥

अ० ८, श्लो० १३.

याजवर ज्ञानेश्वर ह्मणतात;—

तैसेंओंहेंस्मरोंसरे ॥ आणितेथेंचिप्राणपुरे ॥
मगप्रणवातीतउरे ॥ पूर्णघनजें ॥ १७ ॥
ह्मणोनिप्रणवैकनाम ॥ हेंएकाक्षरब्रह्म ॥
जोमाझेंस्वरूपपरम ॥ स्मरतसाता ॥ १८ ॥

विवेकसिंधूच्या पूर्वार्धांतील सहाव्या प्रकरणांत या प्रणवाचें स्वरूप, व त्याच्या अवयवाचें वर्णन, विस्तारपूर्वक आणि अत्यंत गांभीर्यानें मुकुंदराजानें केलें आहे, तें इष्ट असल्यास पहावें.

१ भिद्यतेऱ्हदयग्रंथिश्छिद्यंतेसर्वसंशयाः ।
क्षीयंतेचास्यकर्माणितस्मिन्दृष्टेपरावरे * ॥

इतिश्रुतिः

आत्मारामाश्चमुनयोनिर्ग्रंथाअप्युरुक्रमे ।
कुर्वंत्यहैतुकींभक्तिमित्थंभूतगुणोहरिः ॥

भाग०, स्कं० १, अ० ७, श्लो० १०.

---

* ही श्रुति श्लोकरूपानें भागवतांतहि कांहीं पाठभेदेंकरून आढळत्ये.

-चित अंतःकरणाचें भगवद्भक्तिजन्यप्रेमानंदानें जें विकाशन[1], त्याचें निदर्शन; या सर्व चिन्हांतें धारण करणारा, अर्थात् या सर्व उपलक्षणांनीं उपलक्षित परब्रह्मरूप जो भगवान् त्याचें संबोधन. असा सच्चिदानंदरूप जो तूं त्या ' **ते सदा नमः** — **ते** - तुला, ' **सदा** - निरंतर - अव्यवहितभक्तिप्रेमपुरःसर, **नमः**- नमस्कार - एकाग्रचित्तेंकरून अंतःकरणाची अत्यंत लीनता, असो.

---

१ या प्रमाणें भगवद्भक्तीनें मनाची प्रसन्नता भागवतांत सांगितली आहे;-

अतोवैकवयोनित्यंभक्तिपरमयामुदा
वासुदेवेभगवतिकुर्वन्त्यात्मप्रसादनीं

—स्कं० १, अ० २, श्लो० २२.

एवंप्रसन्नमनसोभगवद्भक्तियोगतः
भगवत्तत्त्वविज्ञानंमुक्तसंगस्यजायते ——— श्लो०२१.

पदाब्जरजजेंतुझेंसकलपावनाधारतें ॥
अघाचळहितारिलेबहुतुवांचिराधारतें ॥
अजामिळअघासुरव्रजवधूबकीपिंगळा ॥
अशांगतिदिलीउरेनतृणभेटतांविंगळा ॥ २ ॥

पहिल्या केकेंत कवींनीं प्रथमतः भगवंताच्या चरणकमलाचें ध्यान करून स्तुतीस आरंभ केला, ह्मणून आतां त्याच चरण-कमलाचें माहात्म्य वर्णित होत्साते कवि पुढल्या दोन केकांस आरंभ करितात. या प्रमाणें आपलें अतिदैन्य, अथवा अत्यंत नम्रीभाव, अथवा तद्भावपूर्वक विज्ञप्ति, प्रकट कर्तव्य असतां थोरां समोर साक्षात् अभिवाद नकरितां त्यांच्या चरण स्पर्शनाची अथवा चरणा प्रत स्वमनोगतार्थ निवेदन करण्याची जनरूढि आहे, कारण तसा साक्षात् अभिवाद केल्यानें अभिवादकाचें किंचित् औद्धत्य इंगित होतें. आपल्या चरणा जवळ माझी हीच विनंति आहे, अशा प्रकारें नम्रतापूर्वक बोलण्याचा लोकव्यवहार प्रसिद्ध आहे. यास्तव कवि या आणि पुढल्या केकेंत भगवंताच्या चरणाचा स्तव करित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय**– तुझें जें पदाब्जरज तें सकलपावनाधार, राधारतें तुवांचि बहु अघाचळहि तारिले, अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा, अशां गति दिली, विंगळा भेटतां तृण न उरे.

मागल्या केकेंत आरंभींचें ' सदाश्रितपदा ' या संबोधनानें जें भगवच्चरणाचें माहात्म्य सुचविलें, त्याचा उपन्यास

करून

करून, कवि तेंच भगवच्चरणाचें माहात्म्य वर्णन करण्यास आरंभ करितात. कवि भगवंतास ह्मणतात, - तुझ्या पदाचें तर माहात्म्य थोर आहेच, परंतु ‘ **तुझें जें पदाब्जरज तें सकलपावनाधार** — तुझें जें, पदाब्जरज- चरणकमलसं- -बंधी रज - धुलि[1], तें, सकलपावनाधार - सकलांस, पा- -वन - पावन करणारीं - पवित्रकरणारीं-लोकप्रसिद्ध गंगा- -दि पवित्र तीर्थें - अथवा यज्ञदानादि पवित्र कर्में, त्यांस’ आधार - आधारभूत होय. गंगा विष्णुपदापासून निर्माण झाली आहे ह्मणून, अर्थात् तुझ्या चरणरजाचा आश्रय तिणें केला आहे ह्मणून, ती पावनकर्त्री; नाहीं तर तिच्याच अंगीं त्या आश्रया वांचून पावन करण्याचें सामर्थ्य नाहीं; अतएव तुझी चरणधूलिच सकल पापी जनांस पवित्र करण्यास सम- -र्थ होय; मग साक्षात् चरणमहिमा काय वर्णावा; असा एथें काव्यार्थापत्ति अलंकार जाणावा.[2] त्वां इतकें माझ्या चर- णरजाचें

---

१ रजशब्द संस्कृतांत नपुंसक होय.

२ याच प्रमाणें शंकराचार्यांनींहि सौंदर्यलहरींत भगवतीच्या चरणकमला- -च्या रजाचें माहात्म्य वर्णिलें आहे;—

तनीयांसंपांसुंतवचरणपंकेरुहभवं ।
विरिंचिःसंचिन्वन्विरचयतिलोकानविकलं ।
वहत्येनंशौरिःकथमपिसहस्रेणशिरसा ।
हरःसंक्षुभ्यैनंभजतिभसितोद्धूलनविधिं ॥ २ ॥

भागवतांतहि भगवच्चरणरजाचा महिमा वर्णिला आहे;—

यत्पादपांसुर्बहुजन्मकृच्छ्रतो ।
धृतात्मभिर्योगिभिरप्यगम्यः ।

स्कं० १०, पू०, अ० १२, श्लो० १२.

गरजाचें माहात्म्य वर्णिलें, तर असें त्यां कोणतें पावनकृत्य केलें, या आशंकेचें निवारण करित होत्साते कवि ह्मणतात,- **राधारतें तुवांचि बहु अघाचळहि तारिले,—** **राधारतें,** - **राधा** - हरिवंशांत वर्णिलेली प्रसिद्ध कृष्णासक्तमना गोपिका, तिच्या ठायीं ‹ **रत** - रममाण - सप्रेमांतःकरण, जो तूं कृष्ण त्या, ‹ **तुवांचि** - त्वांच, ( एथे 'चि' या अव्ययानें इतरांची व्यावृत्ति जाणावी, ह्मणजे पुराणांत पापीजनांचा उद्धार करणारे विष्णु शिव वर्णिले आहेत ते तूंच असा एथे ध्वनितार्थ उत्पन्न होतो. ) **बहु**, असे ‹ **अघाचळ**,- **अघ** - पाप, त्याचे ‹ **अचळ** - पर्वत - ह्मणजे पापाचे पर्वत - पर्वततुल्य पापराशी - अर्थात् मोठे प्रचंड पापी, असतां ‹ **हि**, **तारिले** - उद्धरिले - पावन केले; एथें रूपक अलंकार जाणावा. पर्वता सारिख्या पापाच्या ज्यांच्या राशी असे महत्पापी असतांहि तारिले, मग क्षुद्र पापी तारिले हें काय सांगावें; असा 'हि' शब्दानें एथें ध्वनितार्थ होतो. ते महान् पापी कोणकोण ह्मणून पुसाल तर ऐका ‹ **अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा, अशां गति दिली,—अजामिळ, अघासुर**,-पुराणप्रसिद्ध पापी, **व्रजवधू** - व्रजसंबंधी **वधू** - नारी- अर्थात् पतिसेवास्वार्भकपालनादि स्वधर्मोचित संसारकृत्यें टाकून यथेच्छ विहार करणाऱ्या ह्मणून पापी अशा गोपांगना, **बकी** - पूतना,[1] पिंगळा

---

१ बकी हें पूतनेचें नांव भागवतांत प्रसिद्ध आहे;—

अहोबकीयंस्तनकालकूटं जिघांसयापाययदप्यसाध्वी ।
लेभेगतिंधात्र्युचितांशरण्यं कंवादयालुंशरणंव्रजेम ॥

भाग०, स्कं० ३, अ० २, श्लो० २३.

पिंगळा - पुराणप्रसिद्ध वेश्या, **अशां गति दिली**, - **अशां**- - पूर्वोक्त जे असे अघाचळ त्यांना, **गति** - सलोकतारूप अथवा सरूपतारूप जी सद्गति ह्मणजे मुक्ति, ती **दिली.** असे महान् पापाचे पर्वत असतांहि भगवंतानें तारिले, असा विस्मय कवि आपल्या मनांत करित होत्साते पुनः ईश्वरसा- -मर्थ्यावर दृष्टि देऊन पुढील दृष्टांतवाक्यैकरून त्या विस्म- -याचें दूरीकरण करितात.- **विंगळा भेटतां तृण न उरे,**- **विंगळा भेटतां** - अग्नीच्या इंगळाला भेटलें असतां - ह्मणजे प्रज्वलित अग्नीशीं गांठ पडली असतां, **तृण** - गवत, **न उरे**- उरत नाहीं. अथवा, एथें 'उरे' या ठिकाणीं काक्वर्थ क- रून 'न' हें त्याचें उत्तर मानिलें असतांहि गोड; ह्मणजे विंगळाला तृण भेटलें असतां तें तृण उरे काय? तर 'न,' अर्थात् उरत नाहीं, असा पदान्वय करून अर्थ घ्यावा. एथें अजा- -मिळादिकांचें उद्धरण विशेष अर्थानें सांगून अग्निसान्निध्यानें तृणनाश होतो, अशा सामान्य अर्थानें त्याचें समर्थन केलें आहे, ह्मणून हा अर्थांतरन्यास अलंकार होय.

या केकेंत **अघाचळ,अजामिळ,पिंगळा,** हे शब्द शुद्ध व्याकरणरीत्या पाहिले असतां लकारान्त असावे; परंतु पुढील **विंगळ** शब्द शुद्ध महाराष्ट्र ळ- कारान्त असल्यानें त्याशीं वर्णैक्य यांच शब्दांचें होतें, ह्मणून शब्दालंकार- -दृष्ट्या हाच ळकारान्त शब्दांचा पाठ प्रशस्त दिसतो. याच दृष्टीनें **सकल** एथें **सकळ** असावें खरें, परंतु तो शब्द समासांत आहे ह्मणून त्यांत लकार विशेष ग्राह्य.

तुझाबहुतशोधिलेअघनिधीपदाचारजें ॥
नतेंअनृतवर्णितीबुधजनींसदाचारजें ॥
असेसततऐकतेसँततबोलतेमीचते ॥
प्रमाणनह्मणोंजरींउचितमाझियानीचते ॥ ३ ॥

त्याच पदरजाचा महिमा पुनः विशेषेंकरून वर्णूं इच्छि-त असतां कवि आणखी ह्मणतात.

**पदान्वय** — तुझा पदाचा रजें बहुत अघनिधी शो-धिले, बुधजनीं सदाचार जें वर्णिती तें अनृत न, असे सतत ऐकते सतत बोलते ते मीच जरीं प्रमाण न ह्मणों, माझिया नीचते उचित.

तुझ्या पदाच्या रजानें अजामिलादि महान् पापी तारिले असें जें त्यां मागल्या केकेंत ह्मटलें, तें केवळ माझेंच ह्मणणें नाहीं, तर त्यास पुरातन सद्वाक्याचें प्रमाणहि आहे, असें दर्शवित होत्साते कवि त्याच पदरजाचें विवरण करितात.—

**तुझा पदाचा[1] रजें बहुत अघनिधी शोधिले,**— तुझ्या, पदाच्या

असे शत न एकते — असेंहि पाठांतर आढळतें.

१ त्यां जो आपल्या महाराष्ट्र व्याकरणांत नियम सांगितला आहे (पहा० आवृत्ति ३री, नियम २६८, पृष्ठ.१०६.) कीं, **च ज झ स** एतद्वर्णान्त जे शब्द त्यांस विभक्तिप्रकारानुरूप यकाराचा योग केला असतां, या वर्णाचा हा आगंतुक दंततालव्योच्चार जाऊन मूळचा जो शुद्ध तालव्योचार तोच परावर्तन पावतो, त्यास ही केका चांगलें साहाय्य करित्ये. ह्या पहिल्या चरणां-तलीं

पदाच्या, रजें - रजानें, बहुत - पुष्कळ - असंख्य, असे ‘ अघनिधी - पापाच्या खाणी - अर्थात् अजामिलादि महान् पापी, शोधिले - शुद्ध केले[1] - पावन केले - अर्थात् उद्धरिले; असें ‘ बुधजनीं सदाचार जें वर्णिती तें अनृत न, - बुध- -जनीं - पंडित जनांत - ज्ञानवान् लोकां मध्यें, जे ‘ सदाचार, - सत् - चांगला, आहे ‘ आचार - आचरण, ज्यांचें असे - सदाचरणसंपन्न - अर्थात् नुसते वाचाल पंडित नव्हत, तर त्या- -मध्येंहि भक्तिरूप सदाचरणानें जे संपन्न ते, जें वर्णिती - जें वर्णितात, - अर्थात् तुझ्या पदरजाचें माहात्म्य, तें अनृत न, - तें, अनृत - खोटें, न - नाहीं. कदाचित् आपण पुसाल किं असें कोणी ह्मटलें, कोणीं ऐकिलें, तर ‘ असे[2] सतत ऐक- ते

---

-तलीं शेवटलीं पदें पदाचारजें, आणि दुसऱ्या चरणांतलीं शेवटलीं पदें सदाचारजें, यांची प्रासनियमा प्रमाणें वर्णैकता आवश्यक असल्यानें पदाचा एथे पदाच्या असें षष्ठ्यंत सामान्यरूप केलें असतां वर्णव्यत्यय- -रूप दोष येतो; ह्मणोन एथें पदाच्या याचें पदाचा असेंच षष्ठ्यंत सामा- -न्यरूप लिहिलें पाहिजे:

१ एथें शोधणें ह्मणजे शुद्धकरणें. मूळ संस्कृत शुध - शौचे, या धातूच्या अर्था प्रमाणें एथे या क्रियापदाचा अर्थ जाणावा.

२. तिसऱ्या चरणांत जो प्रथम शब्द असे ह्मणून लिहिला आहे, त्या ठिकाणीं असें ह्मणण्याचाहि बहुत पाठ असेल असें मला वाटतें; परंतु एथें ‘असे’ हें बोलते आणि ऐकते या धातुसाधित नामांचें विशेषण करावें हा पक्ष मला चांगला दिसतो. असें हें क्रियाविशेषण केलें असतां या धातुसाधित नामांचा जो क्रियांश त्याचें विशेषण मानावें लागेल; हा कांहीं मोठा दोष आहे असें नाहीं; कारण, हें जरीं त्या क्रियांशाचें विशेषण न मा- निलें

**ते सतत बोलते ते मीच जरीं प्रमाण न ह्मणों,**—**असे** - जे या प्रकारचे, **सतत** - निरंतर, ऐकते-ऐकणारे, **बोलते** - बोलणारे, ( ऐकता, बोलता, या ताप्रत्ययान्त धातुसाधित नामाचें अनेकवचन )- जे कोणी सूतशौनकादि पुराणप्रसिद्ध ज्ञाते, **ते मीच जरीं प्रमाण न ह्मणों** - मीच ते जर, **प्रमाण** - प्रमाणीभूत, **न ह्मणों** - न ह्मणावे, तर हीं जी माझी धिट्टाई ती **माझिया नीचते उचित, माझिया** - माझ्या, **नीचते** - नीचतेस-अर्थात् लघुत्वास, **उचित** - योग्य, होय.

---

निलें, तथापि पुढलें **सतत** हें शुद्ध क्रियाविशेषण असल्यानें त्याच क्रियांशांचें विशेषण मानिल्या शिवाय गत्यंतर नाहीं. परंतु **असे** हें प्रकारार्थक विशेषण असल्यानें **बोलते, ऐकते,** या साऱ्या धातुसाधित नामांचें विशेषण मानावें हें व्याकरणदृष्ट्या त्या पेक्षां प्रशस्ततर दिसतें. आणखी, - 'असें दाता आज कोण ऐकतो ', 'तसें कर्ता कोणी लिहित नाहीं,' - अशीं ताप्रत्ययान्त धातुसाधित नामाच्या मागें क्रियाविशेषणाची योजना भाषारूढीस अनुकूल नसतां, - ' असा दाता आज कोण ऐकतो, ' ' तसा कर्ता कोणी लिहित नाहीं,' अशा प्रकारार्थक विशेषणाचीच योजना भाषारूढीस अनुकूल दिसत्ये; या प्रमाणा वरून एथें **असे** हा पाठ मला प्रशस्त दिसतो. अथवा, **असें** हें क्रियाविशेषण नमानितां दर्शक सर्वनाम जरीं मानिलें, तरीं **ऐकते, बोलते,** यांतील क्रियांशांचेंच कर्म त्यास मानिलें पाहिजे; तेव्हां सर्वनाम मानिल्यानेंहि पूर्ववत् दोष येतो, ह्मणून **असे** हें **ऐकते, बोलते,** यांचें प्रकारार्थक विशेषण करावें हाच पक्ष उत्तम दिसतो.

तसाचिउरलोंकसापतितमींनसेंकायकीं ॥
कृपाचिसरलीअसेंहिनघडेजगन्नायकीं ॥
नसेनदिसलोंकसानयनसर्वसाक्षीरवी ॥
विषादधरिलाह्मणोंनसुरभीविषक्षीरवी ॥ ४ ॥

मागल्या दोन केकांत भगवंतानें इतर महान् पापीजनाचें उद्धरण केलें ह्मणून कवीनीं सांगितलें, आतां स्वपातित्य मनांत आणून कवि आपणा विषयीं ह्मणतात.—

**पदान्वय—** तसाचि कसा उरलों, मी काय पतित नसें कीं, जगन्नायकीं कृपाचि सरली असें हि नघडे, दिसलों नसेन सर्वसाक्षी रवी नयन कसा, विषाद धरिला ह्मणों, सुरभी विषक्षीर नवी.

**तसाचि कसा उरलों,—** इतर अजामिलादि महान् पापी तुह्मीं उद्धरिले, आणि मींच तसाचि - तसाच-उद्धरल्या शिवाय पापी तसा पापीच, **कसा उरलों** - कसा अवशिष्ट राहिलों; अशी आपल्या मनांत आशंका घेऊन कवि पुढें तिचें समाधान करित होत्साते त्या समाधानाचें दुर्घटत्व पुढें करून तद्वारा स्वपातित्य प्रकट करित असतां ह्मणतात. **मी काय पतित नसें कीं,**- मी काय मुळीं पतित ह्मणजे पापी नाहींच; ह्मणून तसाच उद्धरल्या शिवाय उरलों, असा अन्वय; एथे **'कीं'** या अव्ययाचा निश्चयार्थ जाणावा; तर हें असंभवित, कारण उद्धरल्या शिवाय उरलों ह्मणून मी पतित नाहीं असें ह्मणतां येत नाहीं; अथवा,

' **कीं** ' याचा निश्चयार्थ नकरितां **कीं** ह्मणजे ' किंवा' असा पक्षांतरबोधक अर्थ करून पुढल्या वाक्याशीं त्या अव्ययाचा अन्वय लाविला असतांहि प्रशस्त. बरें आणखी ' **जग-न्नायकीं कृपाचि सरली असें हि नघडे,— जगन्ना-यकीं, - जगत्** - ह्मणजे भ्रमण करणारें जें हें सारें भवचक्र, त्याचा ' **नायकं** - नियंता - चालविणारा, जो तूं ' अर्था-त् विश्वचालक - सर्व विश्वाचा नियंता - जो तूं त्या तु-झ्या ठायीं, **कृपाचि सरली**—ह्मणजे कृपेचें भांडवल होतें तें संपलें, **असें हि नघडे** — असेंहि घडत नाहीं- असेंहि सु-तराम् संभवत नाहीं-अर्थात् कृपेची न्यूनता संभवत नाहीं, मग तिचा समूळ अभाव तर केवळ अघटित; असा एथें ' चि ' या अव्ययानें ध्वनितार्थ होतो. तर हें कारणहि असंभवित. एथे **जगन्नायक** हें हेतुगर्भ पद होय; कारण, जर तूं जगन्नायक आहेस तर तुझ्या ठायीं कृपेचा अभाव संभवत नाहीं. कदाचित् एथे कोणी आशंका घेईल कीं, भगवंताचें जगन्नायकत्व, आणि त्याचे कृपेची सत्ता, या दोन गोष्टीचें साहाचर्य जें एथे स्वीकृत केलें तें प्रमाणापेक्ष आहे. तर त्याणें असें समजावें कीं, ज्या पेक्षां आनंदोत्पत्ति हें भवचक्रचालनव्यापाराचें फल गम्यमान आहे, आणि या विषयीं — ' आनंदाद्ध्येवखल्विमानिभूतानिजायंतेआनंदेन जातानिजीवंति' इत्यादि श्रुतीचें प्रमाणहि प्रसिद्ध आहे, आणि जगज्जननपालनादि व्यापारांस भगवंताच्या सदयतेची अपेक्षा आहे, त्या पेक्षां त्या आनंदाचा मूळजनक अथवा आनंदरू-पच जो भगवान त्याच्या ठायीं सदयता सांसिद्धिक आहे हें सिद्ध; ह्मणून ती सदयता असल्या वांचून त्या आनंदाची प्राप्ति

जीवांस

जीवांस अशक्य, अतएव, '**जगन्नायक**' हें एथे स्पष्ट हेतुगर्भ पद होय. अर्थात् कवि भगवंतास ह्मणतात कीं, ज्या पेक्षां तूं जगन्नायक आहेस, त्या पेक्षां तूं कृपावंतहि आहेस, ह्मणून तुझी 'कृपा सरली' असें ह्मणतां येत नाहीं. आणखी कदाचित् तूं ह्मणशील कीं कोट्यावधि जीवां मध्यें तूं मला दिसला नसशील, तर कवि ह्मणतात मीं '**दिसलों नसेन सर्वसाक्षी रवी नयन कसा,— दिसलों नसेन**- तुझ्या दृष्टीस पडलों नसेन, अथवा त्वां मला पाहिलें नसशील, असें जर ह्मणावें तर हेंहि संभवत नाहीं, कारण मग '**सर्वसाक्षी रवी नयन कसा,-सर्वसाक्षी,-सर्व**-मेरूपासून अणुरेणु त्रसरेणू पर्यंत स्थूल सूक्ष्म पदार्थ, त्यांचा '**साक्षी**-ह्मणजे पहाणारा, जो '**रवी**[1]- सूर्य, तो '**नयन** - अर्थात् तुझा **नयन** - नेत्र - डोळा, **कसा** - कसा ह्मणावा; अर्थात् जर मला

---

1 कदाचित् एथें कोणी बारीक शंका घेईल कीं मोरोपंत महान् पंडित असून त्यांचें काव्य महाराष्ट्र व्याकरणनियमास सोडून क्वचित् आढळतें, असें असतां त्यांहीं '**रवी**' हा शब्द ऱ्हस्वस्वरान्त असतां एथें दीर्घस्वरांत कसा लिहिला? त्यास, एक तर या प्राकृत भाषेंत संस्कृता प्रमाणें ऱ्हस्व-दीर्घत्वाचा नियम सर्वत्र घट्ट राहूं शकत नाहीं; दुसरें, चरणाच्या शेवटला वर्ण तर पुढील किंवा मागील चरणाच्या प्रासाच्या अनुरोधानें निरंतर दीर्घच असतो. या वरूनहि या आशंकेचें पूर्णपणें समाधान झालें असें कोणास न वाटेल, तर अशा सूक्ष्म पहाणाराचें समाधान करण्या करितां मला आणखी थोडा यत्न केला पाहिजे; तो असा कीं,-मोरोपंतानीं एथे भगवंताच्या एकाच नेत्राचें रवित्व उद्देशिलें नसून दोन्हीं नेत्राचें रवित्व पृथक् पृथक् प्रदर्शित केलें आहे, ह्मणून दोन रवींचें ग्रहण झाल्यानें संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें एथें रवी हा द्विवचनान्त शब्द जाणावा. आतां अशा सूक्ष्म पहाणारांनीं '**नसेनदिसलोंकसेनयनसर्वसाक्षीरवी**' असा पाठ ह्मणून आपलें समाधान करून घ्यावें.

मला पाहत नाहीं तर श्रुतिस्मृतींत सूर्य तुझा नेत्र ह्मणून सां-
गितला आहे[1] तो कसा[2] ? अर्थात् कवि भगवंतास ह्मणतात,
सूर्य

सूर्य, चंद्र, हे भगवंताचे नेत्र ह्मणून श्रुतिस्मृतींत पुष्कळ ठिकाणीं
र्णन आढळतें.—

अग्निर्मूर्द्धाचक्षुषीचंद्रसूर्यौ ——श्रुति

चंद्रमामनसोजातश्चक्षोःसूर्योअजायत पुरुषसूक्त.

यस्यभासासर्वमिदंविभाति ——श्रुति

यदादित्यगतंतेजोजगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसियच्चाग्नौतत्तेजोविद्धिमामकम् ॥

भ० गी०, अ० १५, श्लो० १२.

अनादिमध्यान्तमनंतवीर्यं । अनंतबाहुंशशिसूर्यनेत्रं ।
पश्यामित्वांदीप्तहुताशवक्त्रं । स्वतेजसाविश्वमिदंतपंतं ॥

—— अ० ११, श्लो० १९.

ऋद्धःस्पष्टाक्षरोमंत्रश्चंद्रांशुर्भास्करद्युतिः

वि० स० ना०, श्लो० ३०.

उदीर्णःसर्वतश्चक्षुरनीशःशाश्वतःस्थिरः

———श्लो० ६७.

रविर्विरोचनःसूर्यःसवितारविलोचनः

———श्लो० ९४.

यस्याग्निरास्यंद्यौर्मूर्द्धाखंनाभिश्चरणौक्षितिः
सूर्यश्चक्षुर्दिशःश्रोत्रंतस्मैलोकात्मनेनमः ॥

भी० स्त०, श्लो० ७०.

दिशोभुजारविश्चक्षुर्वीर्यंशुक्रःप्रजापतिः

———श्लो० ९९.

कोठें— नसेन दिसलों कसें असाहि पाठ आढळतो, परंतु तो
मला

सूर्य तुझा नेत्र असल्या वर मग मीं तुला दिसलों न
हेंहि संभवत नाहीं. (पुनः पूर्वपक्ष) बरें जर ' ।
·षाद धरिला ह्मणों, — विषाद - खेद - उपेक्षा -
-र्थात् मज विषयीं त्वां आपल्या मनांत उपेक्षा केली असें
कवि ह्मणतात आह्मी ' ह्मणों - ह्मणावें; तर हेंहि असंभवि
कारण ' सुरभी विषक्षीर नवी, — सुरभी - कामधे
विषक्षीर - विषरूप अथवा विषमय जें क्षीर[2]-दूध, तें ' न
—वित नाहीं; कामधेनूच्या मनांत जरीं विषाद आला, त
त

---

मला प्रशस्त दिसत नाहीं; कारण, कसें या शब्दाचा नसेन दिसलों पदांशीं जरीं अन्वय केला, तरी तो जवळचा संबंध असल्यानें हें क्रियावि शेषण भाषापद्धती प्रमाणें कर्त्याच्या लिंगवचनाच्या अनुरोधानें असावें; ' म दिसलों नसेन कसें' असें ह्मणण्या पेक्षां 'मीं दिसलों नसेन कसा' ही बोलण्याची रूढि अधिक व्यापक दिसत्ये. ' मीं उभा राहिलों,' ' ती बे कशी,' 'ते आंधळे कसे ह्मणावे,' अशीच बहुधा महाराष्ट्र भाषेंत बोलण्याच रीती आढळत्ये. (पहा माझें महाराष्ट्र व्याकरण, आवृत्ति तिसरी, नि ५२१, पृ० २५२). आणखी, कसा हा शब्द त्या पदांपासून निराळा काढून जर तें 'रवि' या शब्दाचें विशेषण केलें, आणि असें करणें फार गोड आणि प्रशस्त दिसतें, तर मग 'कसा' असेंच त्याचें विशेषण असलें पाहिजे. कदा-चित् कोणी ह्मणेल कि 'नसेन दिसलों' या उत्प्रेक्षेचें दुर्घटत्व दाखविण्या-करितां 'कसें' हें निराळेंच प्रश्नार्थक अव्यय मानावें; त्यास, असें मानि-ल्यें असतां एक तर सर्व पदें त्रुटित होऊन-' हें कसें होईल ' इत्यादि पदां-चा वाक्यपूरणार्थ अध्याहार करावा लागेल, तितकें करूनाहि पुढल्या पदाशीं त्याचा संबंध नीट राहत नाहीं, ह्मणून मला वाटतें 'कसा' हाच पाठ अधिक प्रशस्त होय.

१ सुरभिर्गविचस्त्रियाम् ——अमर.
२ दुग्धंक्षीरंपयःसमम् ——

ती विषाचें दूध देत नाहीं.[1] अर्थात् भक्तांचे मनोरथ पूर्ण क-रण्या विषयीं तूं कामधेनु आहेस, तेव्हां विषाद जरीं मनांत धरिला तथापि विषाचें दूध देणार नाहींस, ह्मणजे दयेच्या ठिकाणीं निर्दयतेचा अवलंब करणार नाहींस. यद्यपि ' सुरभी ' शब्द सामान्यधेनुवाचक आढळतो, तथापि विशेषें-करून एथें कामधेनुवाचकच घेतला पाहिजे; कारण, पाहि-जे

---

१ एथे दूध देण्याच्या अर्थसंबंधानें जरीं विणें या क्रियेचा प्रयोग भाषारूढीस प्रशस्त दिसत नाहीं, तो प्रयोग सांप्रत पशुजनना विषयींच प्रसिद्ध आहे, तरीं ' विणें ' ह्मणजे प्रसवणें - शारीर धर्मानें उत्पन्न करणें, अशा मूळच्या सामान्य अर्था वर दृष्टि दिली असतां सांप्रतच्या प्रयोगास बाध येतो असें मला वाटत नाहीं. तुकोबानें या क्रियेचा प्रयोग एके ठिकाणीं मनुष्य-जननाच्या अर्थी केला आहे;—

कोडपुरविनाबाळाची—
मगतेकाशाचीमाऊली । जाणकाशासाठींव्याली ॥

तसेंच लोकांत पुरुषा विषयींहि अशाच अर्थानें ह्मणण्याची रूढि आढळत्ये,- ' असा जर तो निष्ठुर होता तर मग पोरें कशाला व्याला. ' तसेंच आणखी ' विणें ' या धातूचा शुद्ध ' उत्पन्न करणें ' अशा अर्थीहि प्रयोग आढळतो.

ऐसेंप्रेमाचेंनिधावें ॥ ध्यानचिध्यानातेंप्रसवे ॥
ज्ञाने०, अ० १३, ओ० ९६.

तामसअहंकारगगनातें ॥ गगनव्यालेंपवनातें ॥
तोपवनदहनातें ॥ प्रसवताझाला ॥
वि० सिं०, प्र० ३, ओ० ७३.

दहन

-जे तसें विकृत दुग्ध देण्याचें सामर्थ्य तिच्याच ठायीं सं
इतर धेनूच्या ठायीं तें सामर्थ्य नसल्यानें तद्व्यतिरिक्त धे
ग्रहण उपमेस योग्य होणार नाहीं. इतर गाईस अ
विषाद आला तथापि विषाचें दूध देऊं ह्मटल्यासहि तिच
देववत नाहीं; कामधेनु तसें दूध देण्यास समर्थ असतांहि
स्वकारुण्या स्तव तें ती देत नाहीं, तसें तदुपम करुण
भगवानहि शरणागतां वर आपलें नैर्घृण्य प्रकट करित न
ह्मणून एथे कामधेनूच्या उपमेनें भगवंताचें भक्तवात्सल्य
-शेषेंकरून प्रस्फुट होतें. अथवा,-**विषाद धरिला ह्मणे**
असा पदच्छेद करून, **विषक्षीर वी** ? असा पुढला का
करावा; ह्मणजे सुरभीनें मनांत विषाद धरिला, ह्मणून ती
-य विषक्षीर वी ? अर्थात् 'नवी'. अथवा,- 'न' या अव्य
-चा ' वी ' या क्रियापदाशीं अन्वय नकरितां, तें ' वि
धरिला ह्मणों ' या उत्प्रेक्षेच्या समाधानार्थी उत्तर समजा
आणि, 'सुरभी विषक्षीर वी ?' हा पुढला वाक्यांश काक्वर्थ
करून तो त्या समाधानाच्या हेत्वर्थी मानावा.

सारांश, या केकेंत कवीनें प्रथम चरणांत स्वपातित्य, दु
-ऱ्यांत भगवंताचें कृपालुत्व, तिसऱ्यांत त्याचें सर्वसाक्षित्व
आणि चवथ्यांत त्याची सदयता, हीं अन्वयव्यतिरेकरूपा
वर्णिलीं आहेत असें समजावें.

---

दहनउदकातें ॥ उदकव्यालेंपृथ्वीतें ॥
यापरीपंचमहाभूतें ॥ जनितीझालीं ॥

चि० सि०, प्र० ३, ओ० ७४

व्रजावनकरावया व्रसविलनखाग्रींधरा ॥
सलीलतैंमंदराख्यहिनगस्वपृष्ठींधरा ॥
वराहतनुघेउनीउचलिलीरदाग्रेंधरा ॥
सुदुर्धरतुह्मांकसापतितहानकांउद्धरा ॥ ५ ॥

मागल्या केकेंत कवीनें स्वपातित्य प्रकट करून शेवटीं भगवंताची सदयता वर्णिली; आतां या व पुढल्या केकेंत उ--दाहरणांनीं त्याच सदयतेचें समर्थन करितात.

**पदान्वय** — व्रजावन करावया नखाग्रीं धरा बसवि--लें, मंदराख्य नगहि तैं सलील स्वपृष्ठीं धरा, वराहतनु घेउनी रदाग्रें धरा उचलिली, हा पतित तुह्मां सुदुर्धर कसा, कां न उद्धरा ?

**व्रजावन करावया नखाग्रीं धरा बसविलें,** — व्र--जावन, - व्रज ह्मणजे गोकुल[1]- अथवा व्रजभूमि- अर्थात् उपादान लक्षणेनें[2] तत्रस्थ गोधनगोपजना सहित व्रज, त्याचें

---

1 गोमान्गोमीगोकुलंतुगोधनंस्याद्गवांव्रजः
अमर.

2 या उपादान लक्षणेचें स्वरूप विश्वनाथ कविराजानें साहित्यद--र्पणांत असें केलें आहे कीं;—

मुख्यार्थस्येतराक्षेपोवाक्यार्थेऽन्वयसिद्धये ।
स्यादात्मनोऽप्युपादानादेषोपादानलक्षणा ॥

आणि

त्याचें ' अवन - रक्षण, तें गोकुलाचें रक्षण करावया करितां, नखाग्रीं - नखाच्या अग्रभागाच्या ठायीं, धरा,- धर - पर्वत[1] - अर्थसंदर्भानें उपलक्षित जो व्रजदेशीं प्रख्यात गोवर्धन पर्वत, त्यातें, बसविलें - ठेविलें;-अर्थात् ज्या काळीं इंद्रानें अतिवृष्टि करून गोकुल बुडविण्या- -चें भय प्रदर्शित केलें, आणि जेव्हां त्या भयानें सर्व व्रजवा- -सी लोक तुला शरण आले, त्या काळीं दयार्द्रांतःकरण हो- -त्सातां त्वां गोवर्धन पर्वत आपल्या कनिष्ठिकेच्या अग्रभागीं छत्रा प्रमाणें धरून त्याच्या अधोभागीं त्यांचें त्वां रक्षण केलें; आणि तेव्हां पासून तूं गोवर्धनधारी असें प्रसिद्ध नाम पावला आहेस. कदाचित् तूं, ह्मणशील कि इतक्या व्रजाचें रक्षण करण्या करितां अलिकडेस एक लहानशी टेंकडी म्यां उचलि- -ली, यांत कांहीं मोठासा पराक्रम केला असें नाहीं; त्यास आणखी ऐक ' मंदराख्य नगाहि तें सलील स्वपृष्ठीं धरा,—मंदराख्य- मंदर, आहे' आख्या-नांव, ज्याचें तो- मंदराख्य, ( बहुव्रीहि समास )-पुराणप्रसिद्ध मंदराचल, नग- पर्वत, हि, स्वपृष्ठीं- आपल्या पृष्ठीं-ह्मणजे पृष्ठभागाच्या ठा- यीं-

---

आणि या लक्षणेच्या व्याख्यानांत - ' श्वेतो धावति ' ह्मणजे पांढरा धांवतो, अर्थात् पांढऱ्या रंगाचा जो घोडा तो धांवतो; तसेंच ' कुंताः प्रवि- शन्ति' ह्मणजे भाले शिरतात, अर्थात् भाले घेऊनं शिपाई शिरतात, तसेंच एथे 'व्रजाचें रक्षण' ह्मणजे व्रजसहित व्रजस्थ जे गोपादि त्यांचें रक्षण. या ल- क्षणेस अजहत्स्वार्था अशीहि लक्षणा ह्मणतात.

१ महीध्रेशिखरीक्ष्माभृदहार्य्यधरपर्वताः

अमर.

र्थी-अर्थात् कच्छपरूप होऊन आपल्या पाठी वर, सलील-लीलासहित होत्साता - अथवा सहज लीलेनें, ( हें क्रिया-विशेषण अव्यय[1] ) धरा - धारण करा, ( प्राचीन ग्रंथभाषेंत हा भूत काळ जाणावा ). एथे 'हि' या शब्देंकरून गोवर्धना पेक्षां मंदराचल अति मोठा पर्वत असतांहि सहज लीलेनें त्वां तो पाठीवर धरिला, असें पराक्रमातिशयवर्णन ध्वनित होतें. कदाचित् तूं यांत आणखी ह्मणशील किं मंदराचल गोवर्धना पेक्षां मोठा पर्वत होता खरा, परंतु तो उचलायास मला अंगुलीच्या ठिकाणीं आपल्या पाठीचा नेटावा द्यावा लागला; तेव्हां यांत कांहीं अधिक पराक्रमाचें वर्णन झालें असें नाहीं; त्यास आणखी ऐका ' **वराहतनु घेउनी रदाग्रें धरा उचलिली,**—वराहतनु,-वराह- डुकर- अर्थात् यज्ञशूकर, त्याची ' तनु- देह- शरीर, घेउनी-घेऊन- अर्थात् वाराह अवतारीं यज्ञशूकरतनु धारण करून, आपल्या' रदाग्रें,- रद- दांत,[2] त्याचें ' अग्र- अग्रभाग- टोंक,

---

[1] आपल्या कवीनें ज्या प्रमाणें एथें ' सलील ' या शब्दाचा क्रिया-विशेषणा प्रमाणें प्रयोग केला आहे, तसाच मला वाटतें वामन पंडितानीं पल्या श्लोकांत ' अतिविकळ ' या पदाचा प्रयोग केला आहे.

वदे भामा कोपें अतिविकळ घाऊनि अधरा ।
धरा पृष्ठीं नाहीं ठक तुज असा अंबुजधरा ॥

भामाविलास.

[2] रदमादशनादंतारदास्तालुतुकाकुदं

अमर.

त्याचें ' अवन - रक्षण, तें गोकुळाचें रक्षण करावया करितां, **नखाग्रीं** - नखाच्या अग्रभागाच्या ठायीं, **धरा,**-धर - पर्वत[1] - अर्थसंदर्भानें उपलक्षित जो व्रजदेशीं प्रख्यात गोवर्धन पर्वत, त्यातें, **बसविलें** - ठेविलें;-अर्थात् ज्या काळीं इंद्रानें अतिवृष्टि करून गोकुल बुडविण्या-चें भय प्रदर्शित केलें, आणि जेव्हां त्या भयानें सर्व व्रजवा-सी लोक तुला शरण आले, त्या काळीं दयार्द्रांतःकरण हो-त्सातां त्वां गोवर्धन पर्वत आपल्या कनिष्ठिकेच्या अग्रभागीं छत्रा प्रमाणें धरून त्याच्या अधोभागीं त्यांचें त्वां रक्षण केलें; आणि तेव्हां पासून तूं गोवर्धनधारी असें प्रसिद्ध नाम पावला आहेस. कदाचित् तूं म्हणशील कि इतक्या व्रजाचें रक्षण करण्या करितां अलिकडेस एक लहानशी टेंकडी म्यां उचलि-ली, यांत कांहीं मोठासा पराक्रम केला असें नाहीं; त्यास आणखी ऐक ' **मंदराख्य नगहि तें सलील स्वपृष्ठीं धरा,**—**मंदराख्य**- मंदर, आहे' आख्या-नांव, ज्याचें तो-मंदराख्य, ( बहुव्रीहि समास )-पुराणप्रसिद्ध मंदराचल, **नग**-पर्वत, हि, **स्वपृष्ठीं**-आपल्या पृष्ठीं-म्हणजे पृष्ठभागाच्या ठा-यीं-

आणि या लक्षणेच्या व्याख्यानांत - ' श्वेतो धावति ' म्हणजे पांढरा धांवतो, अर्थात् पांढऱ्या रंगाचा जो घोडा तो धांवतो; तसेंच ' कुंताः प्रवि-शन्ति' म्हणजे भाले शिरतात, अर्थात् भाले घेऊन शिपाई शिरतात. तसेंच एथे 'व्रजाचें रक्षण' म्हणजे व्रजसहित व्रजस्थ जे गोपादि त्यांचें रक्षण. या ल-क्षणेस अजहत्स्वार्था अशीहि लक्षणा म्हणतात.

1 महीध्रेशिखरीक्ष्माभृदहार्य्यधरपर्वताः

अमर.

-यीं-अर्थात् कच्छपरूप होऊन आपल्या पाठी वर, सलील-लीलासहित होत्साता - अथवा सहज लीलेनें, ( हें क्रिया-विशेषण अव्यय[1] ) धरा - धारण करा, ( प्राचीन ग्रंथभा-षेंत हा भूत काळ जाणावा ). एथे 'हि' या शब्देंकरून गो-वर्धना पेक्षां मंदराचल अति मोठा पर्वत असतांहि सहज लीलेनें त्वां तो पाठीवर धरिला, असें पराक्रमातिशयवर्णन ध्वनित होतें. कदाचित् तूं यांत आणखी ह्मणशील किं मं-दराचल गोवर्धना पेक्षां मोठा पर्वत होता खरा, परंतु तो उ-चलायास मला अंगुलीच्या ठिकाणीं आपल्या पाठीचा ने-टावा द्यावा लागला; तेव्हां यांत कांहीं अधिक पराक्रमाचें वर्णन झालें असें नाहीं; त्यास आणखी ऐका ' **वराहतनु घेउनी रदाग्रें धरा उचलिली**,—वराहतनु,-वराह- डुक-र- अर्थात् यज्ञशूकर, त्याची ' तनु- देह- शरीर, **घेउनी**- घेऊन- अर्थात् वाराह अवतारीं यज्ञशूकरतनु धारण करून, आपल्या' **रदाग्रें**,- **रद**- दांत,[2] त्याचें ' **अग्र**- अग्रभाग- टोंक,

---

१ आपल्या कवींनें ज्या प्रमाणें एथें ' सलील ' या शब्दाचा क्रिया-विशेषणा प्रमाणें प्रयोग केला आहे, तसाच मला वाटतें वामन पंडितानीं पुढल्या श्लोकांत ' अतिविकळ ' या पदाचा प्रयोग केला आहे.

वदेभामाकोपेंअतिविकळघाऊनिअधरा ।
धरापृष्ठींनाहींठकतुजअसाअंबुजधरा ॥

भामाविलास.

२ रदमादशनादंतारदास्तालुतुकाकुदं

अमर.

टोंक, त्याणेंकरून, धरा- पृथ्वी,[1] उचलिली- उचलली- उद्धरली; अर्थात् ही एका पेक्षां एकाधिक अशा मोठ्या पर्वताची गोष्ट तर राहूं द्या, परंतु भूचरां सह साऱ्या पर्वतांस धारण करणारी जी पृथ्वी ती नुसत्या आपल्या दाढेच्या अग्रभागानें उचलून धरिली, इतकें शरणागतांच्या रक्षणा करितां त्वां साहस केलें; असें असतां मग ^**हा पतित तुह्मां सुदुर्धर कसा,**—हा जो मीं, ( एथें कवि आपल्यास दाखवून ह्मणतात ) **पतित**- अधःपातोन्मुख- अर्थात् पापी, तो ^**तुह्मां**- तुह्मांस, **सुदुर्धर**- धरायास अत्यंत कठीण - अर्थात् अत्यंत अनंगीकार्य- अंगीकार करावयास अत्यंत अयोग्य, **कसा**- कोणत्या कारणानें. ( '**कसा**' हें एथें विस्मयान्वितप्रश्नार्थक सर्वनाम जाणावें; उदाहरण-'मी मूर्ख कसा तें सांग, ' ह्मणजे कोणत्या करणानें-कोणत्या हेतू स्तव-मीं मूर्ख तें सांग, असा अर्थ. अशाच अर्थी एथें ' कसा ' या सर्वनामाचा प्रयोग जाणावा ). ज्या त्वां पीडितशरणागतजनाच्या रक्षणार्थ इतके महान उद्योग केले, त्या त्वां माझें रक्षण करूं नये असा कांहीं महत्पापी मीं नसेन, अशी आशंका कवि आपल्या मनांत आणून पुढें प्रश्न करितात; तर मग मला ^**कां न उद्धरा,**— उद्धरित नाहीं ?-अर्थात् उद्धराच उद्धरा; असा आवश्यकयार्थ एथें ध्वनित होतो.

या केकेंत पहिल्या तीन चरणांत गोवर्धनधारणादि उत्तरोत्तर पराक्रमाधिक्यवर्णनानें हा सार अलंकार जाणावा.

---

१ क्षमाशांतिःक्षमाधरा

विश्व.

**नतावनधृतव्रतज्वलनतूंचिबाधावनीं ॥**
**पदप्रणतसंकटींप्रजवतूंचिबाधावनीं ॥**
**दयाप्रकटदाखवींकवणसांगत्यावारणीं ॥**
**सतीव्यसनवारणींजयजयार्थत्यावारणीं ॥ ६ ॥**

मागील केकेंत कवीनीं गोवर्धनधारणादि कृत्यें उदाहर-णार्थ सांगितलीं, ईंत तशींच आणखी सदयतेचीं कृत्यें विशे-षोपमावर्णनपूर्वक सांगतात.

**पदान्वय**— बाधावनीं नतावनधृतव्रतज्वलन तूंचि, पद-प्रणतसंकटीं धावनीं प्रजव तूंचि बा, त्या वारणीं, सतीव्यस-नवारणीं, वा जयजयार्थ त्या रणीं, प्रकट दया कवण दाख-वीं सांग.

कदाचित् तूं ह्मणशील कि साऱ्या जगास अथवा बहुत जनांस जेव्हां संकट पडतें, तेव्हांच त्यांच्या रक्षणार्थ गोवर्ध-नधारणादि महत्कृत्यें मला करावीं लागतात, तुज सा-रिखा कोणी एकादा दुकादा पीडित होऊन मला शरण आला, तथापि या विश्वचालनाच्या मोठ्या व्यापारांत माझें लक्ष त्याज कडेस पोंहचत नाहीं; अशी आशंका घेऊन तिचें निवारण करित होत्साते कवि ह्मणतात ' **बाधा-वनीं नतावनधृतव्रतज्वलन तूंचि,— बाधावनीं,- बा-**धा- पीडा - संकट इ०, हेंच कोणी ' वन- रान, त्याच्या ठायीं - अर्थात् त्या विषयीं, [ कर्मधारय समास, आणि

हीं

ही विषयसप्तमी. ] **नतावनधृतव्रतज्वलन, — नत- नम्र -** अर्थात् शरणागत, त्याचें जें ⁄ अवन - रक्षण, तेंच ⁄ धृत- धारण केलें आहे, **व्रत**- नियम, ज्याणें ( बहुव्रीहि ) असा⁄ ज्वलन - अग्नि,[1] ( कर्मधारय ) **तूंचि** - तूंच; अर्थात् कोणीहि पीडित तुला शरण आला असतां त्याचें संकटवन जाळण्या विषयीं, ह्मणजे तें संकट अगदीं नाहींसें करण्या विषयीं, वणवा तूंच आहेस;आणि⁄**पदप्रणतसंकटीं धावनीं प्रजव तूंचि बा,—पदप्रणतसंकटीं,-पद**-पाय-अर्थात्- तुझे पाय, त्यांच्या ठायीं जो⁄**प्रणत**-अत्यंत नम्र, तो पदप्रण- -त - अर्थात् शरणागत, त्याच्या ⁄ **संकटीं** - त्यास संकट पडलें असतां, ( ही संस्कृता प्रमाणें सतिसप्तमी मानिली अस- -तां अर्थास अधिक अनुकूलता दिसत्ये, ) **धावनीं,- धावन**- ह्म० धावणें-धांव, तींत, **प्रजव**-मोठा वेग, **तूंचि बा,**-तूंच बा- -पा; अर्थात् तुझा शरणागत भक्त संकटांत पडला असतां त्या- -च्या संकटाच्या निवारणार्थ तूं, अथवा तुझ्या प्रेरणेनें दुसरा कोणी, जी धांव घेतो, तींत वेगरूप तूंच असतोस; ह्मणजे त्यास त्या संकटांतून त्वरित मुक्त करण्या विषयीं तुझेंच औ- -त्सुक्य असतें. कदाचित् तूं ह्मणशील कि कोणाच्या संक- -टीं मीं असा त्वरित धांवलों ? तर ऐक ⁄ **त्या वारणीं, सतीव्यसनवारणीं, वा जयजयार्थ त्या रणीं, प्रकट द- -र्या कवण दाखवी सांग, — त्या** - तो जो तुह्मीं न-

क्राच्या

---

1 अग्निर्वैश्वानरोवन्हिर्वीतिहोत्रोधनंजयः ।
कृपीटयोनिर्ज्वलनोजातवेदास्तनूनपात् ॥ अमर

-ऋाच्या दांतमिठींतून सोडविला त्या, **वारणीं**, वारण - हत्ती - अर्थसंदर्भानें गजेंद्र, त्याच्या ठायीं, आणखी ⸍ **सती-** -**व्यसनवारणीं**, - सती - साध्वी - पतिव्रता - अर्थसंदर्भानें उपलक्षित द्रौपदी, तिचें जें ⸍ **व्यसन** - दुःख[१] - संकट, त्याच्या ⸍ **वारणीं** - निवारणीं -निवारण करण्यांत, अर्थात् वस्त्रहरणाच्या संकटसमयीं द्रौपदीचें दुःख निवारण करण्यां- -त, ह्मणजे तीस क्षणांत सहस्रावधि वस्त्रें पुरविण्यांत, अथवा, अज्ञातवासीं ऋषिमंडळ भोजनास आलें असतां आपल्या संग्रहीं अन्नसामग्री नसल्या मुळें जेंव्हां तीस परम संकट पड- -लें तेंव्हां त्या मंडळास यथेच्छ भोजन घालून तिचें तें संकट दूर करण्यांत, **वा**—अथवा, **जयजयार्थ**, - जय -युधिष्ठिर- धर्मराजा[२], त्याचा ⸍ **जय**- जीत- विजय, त्या कारणें, **त्या-** तें प्रसिद्ध जें भारत त्या, **रणीं**- रणाच्या ठायीं -अर्थात् आ- -पला भक्त जो धर्मराज त्यास जय मिळावा ह्मणून भारत यु- -द्धांत, **प्रकट** - स्पष्ट - उघडी, अशी ⸍ **दया**- कृपा - उप- -कार, **कवण** - कोण, **दाखवी** - दाखवित असे - दाखवि- -ली, ( ग्रंथभाषेंत भूतकाळ, ) हें सारें ⸍ **सांग** - तूंच कथन कर;

---

१ मूल्येपूजाविधावर्घोंहोदुःखंव्यसनेष्वघं

अमर.

२ जयोजयंतोविजयोजयत्सेनोजयद्बलः ।
इतिगुह्यानिनामानिचक्रेतेषांयुधिष्ठिरः ॥

श्रीभारत०, वि० प०, अ० ५.

कर; अर्थात् त्वांच हीं सर्व सदयतेचीं कृत्यें केलीं. अथवा, एथे ' प्रकट ' हें दयेचें विशेषण नकरितां, **दाखवी** या पुढील क्रियापदाचें क्रियाविशेषण करावें; ह्मणजे ' अशी द-‍
-या उघडरीतीनें कोणी दाखविली तें सांग. या शेव-‍
-टल्या दोन चरणांत जीं कवीनें तीन उदाहरणें सांगितलीं, तींहींकरून पहिल्या दोन चरणांत दृष्टांतेंकरून कथित जें शरणागताच्या संकटाचें समूळ निवारण, आणि तें करण्यांत जी भगवंताची उत्सुकता, यांचें उपपादन होतें असें एथें स-‍
-मजलें पाहिजे.

सुपात्रनरमाहियद्रतिसुखासदारापरी ॥
असाप्रभुहिसेवकांभजसिखासदारापरी ॥
प्रियाकुचतटींजिहींनबहुवारपत्रावळी ॥
तिहींअमितकाढिल्यानृपमखांतपत्रावळी ॥ ७ ॥

या केकेंत विष्णुरूप भगवंताच्या सुखोपभोगाद्यैश्वर्याचें वर्णन करित होत्साते कवि त्याच भगवंताचा स्वभक्तकार्या विषयीं औत्सुक्यातिशय वर्णितात.

**पदान्वय**—यद्रतिसुखास दारा परी रमा हि सुपात्र न, असा प्रभु हि सेवकां खासदारा परी भजसि; जिहीं प्रियाकु-चतटीं पत्रावळी बहुवार न, तिहीं नृपमखांत अमित पत्राव-ळी काढिल्या.

**यद्रतिसुखास दारा परी रमा हि सुपात्र न,** यद्रतिसुखास, — यत् - जें, रतिसुख, - रति - प्रिया ह्म-णजे स्वभार्या तिज सह जें रमण ह्मणजे क्रीडा ती, तत्संबंधी जें सुख - आनंद, ( षष्ठीतत्पुरुष ) त्यास, - ज्याच्या र-तिसुखा कारणें, दारा - स्वभार्या - आपली स्त्री, तिच्या परी - सारिखी, रमा - लक्ष्मी-हि - देखील, - सर्वसौंदर्य वती लक्ष्मीहि, सुपात्र.- योग्य पात्र, न - नाहीं; अर्था-त् लक्ष्मी सारिखी परम लावण्यवती स्त्री असतांहि ज्याच्या रतिक्रीडेस अर्थात् प्रेमास योग्य नाहीं; **असा प्रभु हि सेवकां खासदारा परीं भजसि;**-असा-अर्थात् इतक्या लक्ष्म्यो-

पभोक्तृत्वरूप

टोंक, त्याणेंकरून, धरा- पृथ्वी, [१] उचलिली- उचलली- उद्धरली; अर्थात् ही एका पेक्षां एकाधिक अशा मोठ्या पर्वताची गोष्ट तर राहूं द्या, परंतु भूचरां सह साऱ्या पर्वतांस धारण करणारी जी पृथ्वी ती नुसत्या आपल्या दाढेच्या अग्रभागानें उचलून धरिली, इतकें शरणागतांच्या रक्षणा करितां त्वां साहस केलें; असें असतां मग '**हा पतित तुह्मां सुदुर्धर कसा,**—हा जो मीं, ( एथें कवि आपल्यास दाखवून ह्मणतात ) **पतित**- अधःपातोन्मुख- अर्थात् पापी, तो '**तुह्मां**- तुह्मांस, **सुदुर्धर**- धरायास अत्यंत कठीण - अर्थात् अत्यंत अनंगीकार्य- अंगीकार करावयास अत्यंत अयोग्य, **कसा**- कोणत्या कारणानें. ( '**कसा**' हें एथें विस्मयान्वितप्रश्नार्थक सर्वनाम जाणावें; उदाहरण-'मी मूर्ख कसा तें सांग, ' ह्मणजे कोणत्या करणानें-कोणत्या हेतू स्तव-मीं मूर्ख तें सांग, असा अर्थ. अशाच अर्थी एथें ' कसा ' या सर्वनामाचा प्रयोग जाणावा ). ज्या त्वां पीडितशरणागतजनाच्या रक्षणार्थ इतके महान उद्योग केले, त्या त्वां माझें रक्षण करूं नये असा कांहीं महत्पापी मीं नसेन, अशी आशंका कवि आपल्या मनांत आणून पुढें प्रश्न करितात; तर मग मला '**कां न उद्धरा,**— उद्धरित नाहीं ?-अर्थात् उद्धराच उद्धरा; असा आवश्यकार्थ एथें ध्वनित होतो.

' या केकेंत पहिल्या तीन चरणांत गोवर्धनधारणादि उत्तरोत्तर पराक्रमाधिक्यवर्णनानें हा सार अलंकार जाणावा.

---

१ क्षमाशांतिःक्षमाधिरा

विश्व.

नतावनधृतव्रतज्वलनतूंचिबाधावनीं ॥
पदप्रणतसंकटींप्रजवतूंचिबाधावनीं ॥
दयाप्रकटदाखवीकवणसांगत्यावारणीं ॥
सतीव्यसनवारणींजयजयार्थत्यावारणीं ॥ ६ ॥

मागील केकेंत कवीनीं गोवर्धनधारणादि कृत्यें उदाहरणार्थ सांगितलीं, ईंत तशींच आणखी सदयतेचीं कृत्यें विशेषोपमावर्णनपूर्वक सांगतात.

**पदान्वय—** बाधावनीं नतावनधृतव्रतज्वलन तूंचि, पदप्रणतसंकटीं धावनीं प्रजव तूंचि बा, त्या वारणीं, सतीव्यसनवारणीं, वा जयजयार्थ त्या रणीं, प्रकट दया कवण दाखवी सांग.

कदाचित् तूं ह्मणशील किं साऱ्या जगास अथवा बहुत जनांस जेव्हां संकट पडतें, तेव्हांच त्यांच्या रक्षणार्थ गोवर्धनधारणादि महत्कृत्यें मला करावीं लागतात, तुज सारिखा कोणी एकादा दुकादा पीडित होऊन मला शरण आला, तथापि या विश्वचालनाच्या मोठ्या व्यापारांत माझें लक्ष त्याज कडेस पोंहचत नाहीं; अशी आशंका घेऊन तिचें निवारण करित होत्साते कवि ह्मणतात, **बाधावनीं नतावनधृतव्रतज्वलन तूंचि,—** बाधावनीं,- बाधा- पीडा - संकट इ०, हेंच कोणी, वन- रान, त्याच्या ठायीं - अर्थात् त्या विषयीं, [ कर्मधारय समास, आणि

ही

ही विषयसप्तमी. ] **नतावनधृतव्रतज्वलन, — नत- नम्र -** अर्थात् शरणागत, त्याचें जें ⁄ **अवन** - रक्षण, तेंच ⁄ **धृत**-धारण केलें आहे, **व्रत**- नियम, ज्याणें ( बहुव्रीहि ) असा⁄ ज्वलन - अग्नि,[1] ( कर्मधारय ) **तूंचि** - तूंच; अर्थात् कोणीहि पीडित तुला शरण आला असतां त्याचें संकटवन जाळण्या विषयीं, ह्मणजे तें संकट अगदीं नाहींसें करण्या विषयीं, वणवा तूंच आहेस;आणि⁄ **पदप्रणतसंकटीं धावनीं प्रजव तूंचि बा,**—पदप्रणतसंकटीं,-**पद**-पाय-अर्थात्-तुझे पाय, त्यांच्या ठायीं जो⁄**प्रणत**-अत्यंत नम्र, तो पदप्रण-त - अर्थात् शरणागत, त्याच्या ⁄ **संकटीं** - त्यास संकट पडलें असतां, ( ही संस्कृता प्रमाणें सतिसप्तमी मानिली अस-तां अर्थास अधिक अनुकूलता दिसत्ये, ) **धावनीं**,- **धावन**- ह्म० धावणें-धांव, तींत, **प्रजव**-मोठा वेग, **तूंचि बा,**-तूंच बा-पा; अर्थात् तुझा शरणागत भक्त संकटांत पडला असतां त्या-च्या संकटाच्या निवारणार्थ तूं, अथवा तुझ्या प्रेरणेनें दुसरा कोणी, जी धांव घेतो, तींत वेगरूप तूंच असतोस; ह्मणजे त्यास त्या संकटांतून त्वरित मुक्त करण्या विषयीं तुझेंच औ-त्सुक्य असतें. कदाचित् तूं ह्मणशील कि कोणाच्या संक-टीं मीं असा त्वरित धांवलों ? तर एक ⁄ **त्या वारणीं, सतीव्यसनवारणीं, वा जयजयार्थ त्या रणीं, प्रकट द-या कवण दाखवी सांग, — त्या** - तो जो तुह्मीं न-

क्राच्या

---

1 अग्निर्वैश्वानरोवन्हिर्वीतिहोत्रोधनंजयः ।
कृपीटयोनिर्ज्वलनोजातवेदास्तनूनपात् ॥ अमर

-काच्या दांतमिठींतून सोडविला त्या, **वारणीं**, वारण - हत्ती - अर्थसंदर्भानें गजेंद्र, त्याच्या ठायीं, आणखी **सती-व्यसनवारणीं**, - **सती** - साध्वी - पतिव्रता - अर्थसंदर्भानें उपलक्षित द्रौपदी, तिचें जें **व्यसन** - दुःख[1] - संकट, त्याच्या **वारणीं** - निवारणीं -निवारण करण्यांत, अर्थात् वस्त्रहरणाच्या संकटसमयीं द्रौपदीचें दुःख निवारण करण्यां-त, ह्मणजे तीस क्षणांत सहस्रावधि वस्त्रें पुरविण्यांत, अथवा, अज्ञातवासीं ऋषिमंडळ भोजनास आलें असतां आपल्या संग्रहीं अन्नसामग्री नसल्या मुळें जेव्हां तीस परम संकट पड-लें तेव्हां त्या मंडळास यथेच्छ भोजन घालून तिचें तें संकट दूर करण्यांत, **वा**—अथवा, **जयजयार्थ**, - **जय** -युधिष्ठिर-धर्मराजा[2], त्याचा **जय**- जीत- विजय, त्या कारणें, **त्या-तें** प्रसिद्ध जें भारत त्या, **रणीं**- रणाच्या ठायीं -अर्थात् आ-पला भक्त जो धर्मराज त्यास जय मिळावा ह्मणून भारत यु-द्धांत, **प्रकट** - स्पष्ट - उघडी, अशी **दया**- कृपा - उप-कार, **कवण** - कोण, **दाखवी** - दाखवित असे - दाखवि-ली, ( ग्रंथभाषेंत भूतकाळ, ) हें सारें **सांग** - तूंच कथन कर;

---

१ मूल्येपूजाविधावर्घोंहोदुःखंव्यसनेष्वघं

अमर.

२ जयोजयंतोविजयोजयत्सेनोजयद्बलः ।
इतिगुह्यानिनामानिचक्रेतेषांयुधिष्ठिरः ॥

श्रीभारत०, वि० प०, अ० ५.

कर; अर्थात् त्वांच हीं सर्व सदयतेचीं कृत्यें केलीं. अथवा, एथे ' **प्रकट** ' हें दयेचें विशेषण नकरितां, **दाखवी** या पुढील क्रियापदाचें क्रियाविशेषण करावें; ह्मणजे ' अशी द-या उघडरीतीनें कोणी दाखविली तें सांग. या शेव-टल्या दोन चरणांत जीं कवीनें तीन उदाहरणें सांगितलीं, तींहींकरून पहिल्या दोन चरणांत दृष्टांतेंकरून कथित जें शरणागताच्या संकटाचें समूल निवारण, आणि तें करण्यांत जी भगवंताची उत्सुकता, यांचें उपपादन होतें असें एथें स-मजलें पाहिजे.

सुपात्रनरमाहियद्रतिसुखासदारापरी ॥
असाप्रभुहिसेवकांभजसिखासदारापरी ॥
प्रियाकुचतटींजिहींनबहुवारपत्रावळी ॥
तिहींअमितकाढिल्यानृपमखांतपत्रावळी ॥ ७ ॥

या केकेंत विष्णुरूप भगवंताच्या सुखोपभोगाद्यैश्वर्याचें वर्णन करित होत्साते कवि त्याच भगवंताचा स्वभक्तकार्याविषयीं औत्सुक्यातिशय वर्णितात.

**पदान्वय**—यद्रतिसुखास दारा परी रमा हि सुपात्र न, असा प्रभु हि सेवकां खासदारा परी भजसि; जिहीं प्रियाकु-चतटीं पत्रावळी बहुवार न, तिहीं नृपमखांत अमित पत्राव-ळी काढिल्या.

**यद्रतिसुखास दारा परी रमा हि सुपात्र न,** यद्रतिसुखास, — यत् - जें, रतिसुख, - रति - प्रिया ह्मणजे स्वभार्या तिज सह जें रमण ह्मणजे क्रीडा ती, तत्संबंधी जें सुख - आनंद, ( षष्ठीतत्पुरुष ) त्यास, - ज्याच्या रतिसुखा कारणें, दारा - स्वभार्या - आपली स्त्री, तिच्या परी - सारिखी, रमा - लक्ष्मी-हि - देखील, - सर्वसौंदर्यवती लक्ष्मीहि, सुपात्र - योग्य पात्र, न - नाहीं; अर्थात् लक्ष्मी सारिखी परम लावण्यवती स्त्री असतांहि ज्याच्या रतिक्रीडेस अथात् प्रेमास योग्य नाहीं; **असा प्रभु हि सेवकां खासदारा परी भजसि;**-असा-अर्थात् इतक्या लक्ष्म्यो-

पभोक्तृत्वरूप

-पभोक्तृत्वरूप ऐश्वर्याचा उपभोक्ता, **प्रभु** - धणी, असतां **हि** - देखील, **सेवकां** - दासांस - अर्थात् स्वभक्तांस, **खा-सदारा परी**, - **खासदार** - मोतद्दार - घोड्यावरील चा-कर, त्या ‹ **परी** - प्रमाणें, **भजसि** - भजतोस; अर्थात् मोतद्दारा प्रमाणें तूं त्यांची सेवा करितोस; ह्मणजे त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करितोस. या प्रमाणें भगवान् विष्णूनें कृष्णावतारीं स्वभक्त जो अर्जुन त्याचा सारथीपणा केला, ही पुराणप्रसिद्ध कथा आहेच[१]. आणखी पहा ‹ **जिहीं, प्रियाकुचतटीं पत्रावळी बहुवार न**, **जिहीं** - ज्यां-नीं- अर्थात् ज्या भगवान् विष्णूच्या हातांनीं, ( एथें **जिहीं**, तिहीं, हीं ग्रंथभाषेंत **जो तो** या सर्वनामाचीं तृतीयेचीं अ-नेकवचनाचीं रूपें होत, ह्मणून अर्थसंदर्भानें एथें हस्तग्रहण अवश्यक, ) **प्रियाकुचतटीं**, - **प्रिया** - वल्लभा - आवडती स्त्री - अर्थात् लक्ष्मी, तिचे जे ‹ **कुच** - स्तन, त्यांचे जे ‹ **तट** - प्रांतभाग[२], त्यांच्या ठायीं - अर्थात् त्यांज वर; **पत्रा-वळी**

---

१ मोरोपंतानें आणखी एका स्थळीं आर्येंत ही कृष्णाची मोतद्दारी वर्णिली आहे; —

अर्जुनतुरंगमातें जोस्वकरानेंकरीखराराजी ।
श्रीकृष्णकायबहुधा निजपददासासिजोखराराजी ॥

आणखी एका कवीनें ह्मटलें आहे;—

अर्जुनाच्यारथीं झालासेसारथी ह्मणेधर्मामहाराज भावजी ॥ पाहुंयातोपांडुरंगरावजी ॥ धृ ॥

२ शरीराच्या मोठ्या अवयवाच्या कोणत्याहि भागास तट ह्मणण्याचा काव्यांत

-वल्ली - पत्राकार पंक्ति - शृंगारी पुरुष स्वहस्तानें कुंकुम-केशरादि सुगंध द्रव्यांनीं आपल्या प्रियांच्या स्तनगल्ला--द्यवयवां वर मकरपत्राकार वेलबुट्टी काढितात त्यां, बहुवार पुष्कळ

काव्यांत प्रचार पुष्कळ आढळतो; वामन ह्मणतात,—

वंशीनादनटीतिलाकटितटींखोवोनिपोटींपटीं.

नायकांनीं आपल्या प्रियांच्या स्तनाद्यवयवां वर केशरादि सुगंधद्रव्यांनीं लेखन करण्याचा व्यापार शृंगाररसप्रधान काव्यांत वर्णायाचा सांप्रदाय प्रसिद्ध आहे;—

चत्वारःप्रथयंतुविद्रुमलतारक्तांगुलिश्रेणयः ।
श्रेयःशोणसरोजकोरकरुचस्तेशार्ङ्गिणःपाणयः ।
भालेष्वब्जभुवोलिखंतियुगपद्येपुण्यवर्णावलीः ।
कस्तुरीमकरीःपयोधरयुगेगल्लद्वयेचश्रियः ॥

नांदीश्लोक—अनर्घराघव.

तसेंच वासवदत्ता ह्मणून प्रसिद्ध काव्य आहे, त्यांत सुबंधु कवीनें मलयवायूस शृंगारी कल्पून त्याच्या वर्णनांत ह्मटलें आहे;—

कामकलाकलापकुशलचारुकर्णाटकसुंदरीस्तनकलशघुसृणधूलिपरिमलामोदवाही

सेंच आणखी —

नवयौवनरागतरलकेरलीकपोलपालिपत्रावलीपरिचयचतुरः

तसेंच अमरूशतकांत आचार्यांनीं वायूच्या वर्णनांत ह्मटलें आहे;—

नीत्वोच्चैर्विक्षिपंतःकृततुहिनकणासारसंगान्परागान् ।
कौंदानानंदितालीन्नतितरसुरभीन्भूरिशोदिग्मुखेषु ।
एतेतेकुंकुमाक्तस्तनकलशभरास्फालनादुच्छलंतः ।
पीत्वाशीत्कारिवक्त्रंशिशुहरिणदृशांहैमनावांतिवाताः ॥ ५४ ॥

पुष्कळ वेळां, **न** – नाहीं; **न** याचा अन्वय पुढल्या चरणां-
-तील ‘ **काढिल्या**’ या क्रियापदाशीं समजला पाहिजे;
काढिल्या – लिहिल्या – चितरल्या, नाहींत; अर्थात्
ज्याच्या हस्तांनीं लक्ष्मीच्याहि स्तना वर अशा पत्रा-
-वळी एकदोनदां चितरल्या असल्यास न जाणों; **तिहीं**
**नृपमखांत अमित पत्रावळी काढिल्या, — तिहीं** –
त्यांणीं – अर्थात् कृष्णावतारीं त्या विष्णूच्या हातांनीं, **नृ-**
**पमखांत,** — **नृप**–राजा – अर्थसंदर्भानें धर्मराजा, त्याचा
**मख** – यज्ञ – अर्थात् त्याणें केला जो प्रसिद्ध राजसूय य-
-ज्ञ ( मध्यमपदलोपी, अ० षष्ठीतत्पुरुष समास ) त्यांत, **अमि-**
**-त**–असंख्य – ज्यांची गणना होत नाहीं इतक्या, **पत्रावळी**-
-भोजनार्थ पर्णपात्रें – अर्थात् त्या यज्ञसमारंभांत आले-
-ल्या ऋष्यादिकांच्या एका मागें एक जेवलेल्या पंक्तींनीं टा-
-किलेलीं उष्टीं पानें, **काढिल्या** – काढून टाकिल्या.

यांतील शेवटल्या दोन चरणांत कवींनीं पदलाघवानें अर्थगौरव दर्शविलें आहे; ज्या विष्णूच्या हस्तांनीं प्रिया-कुचतटीं बहुवार पत्रावळी न काढिल्या ह्मणजे लिहिल्या, ( चित्र, वेलबुट्टी, रांगोळी, इ० काढणें–ह्मणजे लिहिणें – रखणें.[1] ) त्या विष्णूच्या हस्तानीं कृष्णावतारीं धर्मराजाच्या राजसूय यज्ञाच्या समारंभांत अमित पत्रावळी काढिल्या ह्मणजे काढून टाकिल्या. ( पत्रावळी, खरकटीं, उष्टीं, काढणें ह्मणजे

काढून

---

१ ‘चित्रें लिहिणें’ अशी बोलण्याची रूढि अद्यापि देशा वर प्रसिद्ध आहे, व काव्यांत तर असा प्रयोग निरंतर आढळतो;—

मोहती

काढून दूर टाकून देणें, ) एथें '**काढिल्या**' या एकाच क्रियापदाचा द्व्यर्थवाचक '**पत्रावळी**' शब्दाच्या द्विरुक्ती-शीं त्या त्या अर्थीं उभयान्वय केला आहे तो यथार्थ असून सरसहि आहे.

या केकेंत लक्ष्मीस संतुष्ट करण्याचें प्रिय कार्य असतां त्याची उपेक्षा करून, स्वभक्तसंतोषार्थ वस्तुतः अत्यंत नीच कार्य असतांहि त्याची भगवान विष्णूनें स्वीकृति केली, असें कवीनें सांगितलें; येणेंकरून लक्ष्मीपेक्षांहि स्वभक्ता-च्या ठायीं भगवंताचें अत्यंत प्रेमाधिक्य दर्शविलें. एथें स्वभक्ताच्या ठायीं भगवंताचा जो प्रेमातिशय त्याचें वर्णन इष्ट असून, त्या विशेषाची प्रतिपत्ति व्हावी, ह्मणून लक्ष्मीच्या स्तना वर पत्रावळी काढण्याचा जो व्यापार त्याच्या न्यूनत्वाभिमुख्यें-करून निषेधाभास दर्शविला आहे; यास्तव हा मला वाटतें

आक्षेप

---

मोहतीव्रजपशूमृगगाई । आमुचेंनवलकायअगाई ।
स्तब्धहोतिलिखितेंजशिचित्रें।वेणुच्याध्वनिरसेंचिविचित्रें ॥
वामन.

मुक्तेश्वरानीं एका मंदिराच्या वर्णनांत '**काढणें**' या धातूचा प्रयोग अशाच अर्थीं केला आहे;—

इंद्रचंद्रवरुणकुबेर ॥ यमवायुवन्हिभास्कर ॥
गणगंधर्वयक्षकिन्नर ॥ मनोहरकाढिले ॥ ४६ ॥
सभा० प०, अ० २

आक्षेप अलंकाराचाच भेद होय.[१] या अलंकाराचे मुख्य--त्वें तीन भेद दंडीनें आपल्या काव्यादर्शांत सांगून या भेदाचें आनंत्यहि दर्शविलें आहे, त्यांतून हा वृत्ताक्षेप अथवा इष्ट असल्यास धर्माक्षेप मानावा.[२]

या केकेच्या शेवटल्या दोन चरणांत पदलाघवा मुळें कवीचा त्द्द्गत अ--र्थ असा दिसतो कीं,- 'ज्या विष्णूनें लक्ष्मीच्या कुचा वर देखील बहुवार पत्रावळी काढिल्या नाहींत, त्याणें धर्मराजाच्या यज्ञसमारंभांत अमित उष्ट्या पत्रावळी किं हो काढिल्या.' यांत **पत्रावळी** हें स्वारस ह्मणजे सावधारण पद होय; कारण, **अमित** हें त्याच पदाचें विशेषण होय असें मला वाटतें.

जर

---

१ विश्वनाथ कविराजाच्या साहित्यदर्पणांत या अलंकाराचें लक्षण केलें आहे तें असें,—

वस्तुनोवक्तुमिष्टस्य विशेषप्रतिपत्तये ।
निषेधाभासआक्षेपो वक्ष्यमाणोक्तगोद्विधा ॥

आणि या अलंकाराचा चौथा प्रकार दाखविण्या करितां खालीं सांगितलें उदाहरण दिलें आहे,—

विरहेतवतन्वंगी कथंक्षपयतुक्षपां ।
दारुणव्यवसायस्य पुरस्तेभणितेनकिम् ॥

यांत विरहिणीचा विरहदुःखातिशय दाखविण्याचा विशेष असतां, त्या--च्या प्रतिपत्ती करितां दूतीनें आपल्या बोलण्याचाच निषेधाभास दाखविला आहे. वस्तुतः, प्रीयेच्या स्तना वर बहुवार पत्रावळी न काढण्या प्रमाणें एथेंहि दूतीच्या बोलण्याचा काहीं खराच निषेध आहे असें नाहीं; परंतु स--खीच्या विरहाचा दुःखातिशय कथन करणें हें, या केकेंत भगवंताचा स्वभ--क्ताच्या ठायीं जो प्रेमातिशय त्याच्या कथना प्रमाणें कवीस इष्ट कार्य असून, त्याचें वर्णन निषेधाच्या निमित्तानें केलें आहे; ह्मणून मला वाटतें वरील केकेंतील शेवटल्या दोन चरणांत आक्षेप अलंकार मानिला असतां मीं सा--हित्यशास्त्रज्ञांच्या दोषारोपास पात्र होणार नाहीं, असा मला भरवसा आहे.

विश्वनाथ कविराजानें आपल्या साहित्यदर्पणांत या अलंकाराचे संज्ञा-

पूर्वक

जर कदाचित् कोणी रसिक ह्मणतील किं 'पत्रावळी' हें एथे सावधारण पद मानिता, त्या पेक्षां 'बहुवार' हें पद कां तसें मानित नाहीं ? त्यास, बहुवार हें जर सावधारण पद मानिलें, तर अमित हें पद त्याचें प्राति-पक्षिक होऊं लागेल; ह्मणजे 'ज्याणें प्रियाकुचतटीं बहुवार देखील पत्राव-ळी न काढिल्या, त्याणें नृपमखांत अमितवार पत्रावळी काढिल्या,' असा अर्थान्वय करावा लागेल. अशा पदान्वयानें अर्थ तर प्रशस्त दिसतो ख-रा, परंतु येणेंकरून भाषेच्या नियमाचा जो भंग होतो, तो वैय्याकरण चिकित्सकांस अधिक दुःसह होइल याची मला भीति वाटत्ये; तो असा कीं,- असें केल्यानें बहुवार हें जें पद क्रियाविशेषण आहे, त्यांतील बहु हें पद जसें वार या अवयवाचें विशेषण असून तें सारें पद काढिल्या या क्रियापदा-शीं अन्वित होतें; तसें पुढलें अमित हें पद वार या शब्दाचें विशेषण करून त्याशीं अन्वित करावें लागेल; आणि अमितवार या क्रियाविशेषणांतील वार या अवयवाचा अध्याहार करावा लागेल; परंतु असा सामासिक शब्दांतील एका अवयवाचा अध्याहार मानण्यास भाषानियमाचा आधार कोठेहि प्रशस्त रीतीनें आढळत नाहीं. यद्यपि बहु आणि अमित हीं एका पक्षीं स्पष्ट, आणि दुसऱ्या पक्षीं अध्याहृत, अशा वार शब्दाचीं विशेषणें होऊं शकतात, तथापि बहुवार आणि अमितवार या उभय पदांचा संबंध काढिल्या या क्रियापदाशीं स्पष्ट असल्या मुळें तीं संयुक्तपदें

होऊन

---

पूर्वक भेद दाखविले नाहींत; परंतु दंडीनें आपल्या काव्यादर्शांत लक्षण-पूर्वक आणि संज्ञापूर्वक हे भेद दाखविले आहेत. यांणीं आरंभींच या आक्षेप अलंकाराचें लक्षण असें केलें आहे कीं,—

प्रतिषेधोक्तिराक्षेपस्त्रैकाल्यापेक्षयात्रिधा॥
अथास्यपुनराक्षेप्यभेदानंत्यादनंतता ॥ १२० ॥

यांत भूत, वर्तमान, आणि भविष्य, अशा त्रिकालांच्या अपेक्षेनें या अलंकाराचे तीन मुख्य भेद दाखवून पुढें त्यांची अनंतताहि प्रदर्शित केली आहे. ते मुख्य तीन भेद दाखविण्या करितां तीन उदाहरणें लिहिलीं आ-हेत. त्यांतून—

अनंगः

होऊन क्रियाविशेषणें होतात; तेव्हां अशा संयुक्त क्रियाविशेषण शब्दांतून एका अवयवाचा अध्याहार करितां येत नाहीं. ह्मणून **अमित** हें माझ्या मतें **पत्रावळी** शब्दाचेंच विशेषण केलें पाहिजे; **वार** या अध्याहृत शब्दाचें तें विशेषण होऊं शकत नाहीं; कारण, **वार** या अवयवाचा भाषानियमा प्रमाणें मुळीं अध्याहारच होत नाहीं. त्यांत आणखी कुंकुमाच्या पत्रावळी बहुवार

---

अनंगःपंचभिःपुष्पैर्विश्वंव्यजयतेषुभिः ॥
इत्यसंभाव्यमथवाविचित्रावस्तुशक्तयः ॥ १२१ ॥

यांत, 'व्यजयत - जिंकिता झाला,' या भूत कालानें सूचित जी अनं--गाच्या विजयाची असंभाव्यतारूप वस्तु, तिचा 'अथवा विचित्रा वस्तुशक्तयः' येणेंकरून प्रतिषेध केला आहे, ह्मणून हा वृत्ताक्षेप जाणावा. तसेंच या के--केंत 'नृपमखांत अमित पत्रावळी काढिल्या,' या भूतकालिक वृत्तांतानें सूचित जो भगवंताचा स्वभक्ताचा ठायीं प्रेमातिशय, तो, 'प्रियाकुचतटीं बहुवार पत्रावळी न काढिल्या', या प्रतिषेधानें दर्शविला आहे, ह्मणून एथें वृत्ताक्षेप हा या अलंकाराचा भेद मानिला असतां चालेल. अथवा—

तवतन्वंगिमिथ्यैवरूढमंगेषुमार्द्दवं ॥
यदिसत्यंमृदुन्येवकिमकांडेरुजंतिमाम् ॥ १२७ ॥

यांत प्रीयेच्या अंगाचें मृदुत्व ह्मणून जो - अमित पत्रावळी काढल्यानें सूचित भगवंताचा स्वभक्ताच्या ठायीं प्रेमातिशया प्रमाणें विशेष, त्याचें साध-न 'माम् रुजंति - मला ( तीं मृदु अंगें ) दुखवितात,' अशा 'प्रियाकुच--तटीं बहुवार पत्रावळी न काढिल्या,' या तद्विपरित कथनरूप प्रतिषेधानें, केलें आहे; ह्मणून हा धर्माक्षेप या अलंकाराचा भेद मानिला आसतांही प्रशस्त. अथवा—

गच्छेतिवक्तुमिच्छामित्वत्प्रियंमत्प्रियैषिणी ।
निर्गच्छतिमुखाद्वाणीमागाइतिकरोमिकिम् ॥

यांत 'गच्छ - जा' असें आपल्या प्रियास ह्मणणें ही जी अनिष्ट गोष्ट, तिच्या साधना विषयीं बोलण्याचा यत्न करित असतां 'मागाः- जाऊं नको' ह्मणून प्रियेच्या मुखांतून वाणीचें निःसरणरूप विपरीत कार्याची

जी

बहुबार नकाढिल्यानें त्यांचें अल्पसंख्याकत्व, आणि नृपमखांत अमित पत्रावळी काढून टाकिल्यानें त्यांचें बहुसंख्याकत्व, यांचा जो विपर्यास एथे इंगित होतो, तेणेंकरूनहि **पत्रावळी** या शब्दा वरच कवीचें स्वारस्य अ-सल्याचें आणखी स्पष्ट दिसतें.

---

जी उत्पत्ति, तिज वरून अनर्थाच्या दर्शनानें स्वाभिप्रेतार्थाचें विशेष रीत्या जसें सांगणें, तसें या केंकत् यज्ञसमारंभांत अमित उच्छिष्ट पत्रावळी काढणें ही जी अनिष्ट गोष्ट, तिच्या साधना विषयीं विष्णूनें यत्न केल्याचें सांगत असतां, लक्ष्मीच्या स्तना वर थोड्या पत्रावळी काढण्यानें उपलभ्यमान जी तद्विपरीत कार्योत्पत्ति, तिज वरून लक्ष्मीच्या ठायीं जें प्रेमाल्पत्व त्याच्या दर्शनानें स्व--भक्ताच्या ठायीं जो भगवंताचा प्रेमातिशय तद्वर्णनरूप अभिप्रेतार्थाचें विशेष रीत्या सांगणें होय, ह्मणून हा यत्नाक्षेप मानावा. हा भेद मला अधिक प्र--शस्त दिसतो. परंतु साहित्यशास्त्रज्ञांस जे रुचेल तो वर सांगितल्या भेदांतून कोणताहि एक घ्यावा.

नपावसिह्मणोनिमींह्मणतसेंतुलाआळसी ॥
बरीनअसदुक्तिहेरविसखोत्थिताआळसी ॥
असंख्यजनतर्पिलेक्षुधितएकलाजेमनीं ॥
चुकेलतरित्यासदेपरिवदान्यलाजेमनीं ॥ ८ ॥

मागील केकेंत स्वभक्तकार्या विषयीं भगवंताचा औत्सु-क्यातिशय वर्णिला; ईत कवि आपणा विषयीं त्याचें औदा-सिन्य कथित होत्साते त्याचेंहि दृष्टांतेंकरून निवारण क-रितात.

**पदान्वय** — न पावसि, ह्मणोनि मीं तुला आळसी ह्मणतसें, हे असदुक्ति बरी न, रविसखोत्थिता आळसी, जेम-नीं असंख्य जन तर्पिले, क्षुधित एकला चुकेल, तरि वदा-न्य त्यास दे, परि मनीं लाजे.

कवि ह्मणतात, इतकें प्रार्थित असतां अद्यापि तूं मला ´ **न पावसि**, — पावत नाहींस – दर्शन देऊन माझा उद्धार करित नाहींस; **ह्मणोनि मीं तुला आळसी ह्मणतसें**,— यास्तव मी तुला आळसी ह्मणतों; – अर्थात् पूर्वीं बहुत भ-क्तांस पावल्या मुळें तूं थकून गेला असशील ह्मणून मज विषयीं आतां तुला आळस आला असेल, असें मीं अनुमान कीरतों; परंतु पुनः कवि विचार करून या आपल्या ह्मण-ण्यास दोष लावून ह्मणतात ´ **हे असदुक्ति, बरी न**, — त्या तुला आळसी ह्मटलें ´ **हे** – ही, माझी ´ **असदुक्ति**,- **असत्**- मिथ्या – व्यर्थ – निराधार, अशी ´ **उक्ति** – भाषण,

भाषणें होय, कारण विश्वचक्रचालक भगवंताच्या ठायीं आ-ळस मुळींच संभवत नाहीं; ह्मणून ही माझी मिथ्या उक्ति बरी कशी ह्मणावी ? ह्मणून ‘ बरी न, – बरी नाहीं. अथवा, तूं मला पावत नाहींस ह्मणून मीं तुला आळसी ह्मणतों, ही जी माझी असदुक्ति ती बरी नाहीं, असा अन्वय लावावा. अर्थात् दुसऱ्यास मिथ्या दूषण लावणें हें त्याज वर आळ घेणें होय; कोणत्ये आळे सारिखी ही आळ ह्मणून पुसाल तर ‘ **रविसखोत्थिता आळसी**, — रविसखोत्थिता, रवि-सख, – रवि – सूर्य, त्याचा ‘ सखा – मित्र, जो ‘ रवि-सख[2] – सत्राजित, त्या पासून ‘ उत्थिता[3] – उठलेली – नि-घालेली, जी ‘ आळ[4] – बालट, – त्वां माझा स्यमंतक मणि

---

१ वेदशास्त्रें पुराणें ।। जेनमानिती प्रमाणें ।। तयाधीटवादियांची उक्तिकवणें ।। साचमानावी ।। ३७ ।।

विवेकसिंधु, उ०, प्र० १.

२ **रविसख** एथें सखिन् या मूळ शब्दाचा रवि शब्दाशीं समास अ-सल्यानें – ‘ राजाहःसखिभ्यष्टच् ’ या सूत्रा वरून **रविसख** असा अकारान्त शब्द झाला आहे.

३ हें उत्पूर्वक ष्ठा ( गतिनिवृत्तौ ) या धातूचें क्तप्रत्ययान्त कृदंत. एथें – ‘ उदःस्थास्तंभोःपूर्वस्य ’ या सूत्रानें षच्या स्थानीं पूर्वसवर्ण आदेश झाला आहे, उदाहरण—

सूर्यस्यभाउत्थिता—

भागवत.

समुद्रादुत्थितमद्रिं—

भट्टीकाव्य..

अशा अर्थीं **आळ** हा शब्द बहुधा पुल्लिंगीं आढळतो. ‘ त्वां मज

मणि चोरिला ह्मणून त्याणें कृष्णा वर जें बालट घेतलें होतें त्या ‹ असी - त्या सारिखी. एथें ' रविसखोत्थिता ' हें संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें स्त्रीलिंगी ' आळ ' या श- -ब्दाचें विशेषण जाणावें; आणि ' आळसी ' - ' आळऽसी' हें पद 'असदुक्ति' या शब्दाचें विशेषण आहे ह्मणून स्त्रीलिं- -गीं जाणावें. एथें कवीनें एकदां भगवंतास आळसी ह्मणून पुनः त्या ह्मणण्याचा'बरी न असदुक्ति हे' येणेंकरून प्रतिषे- ध केला आहे, ह्मणून हा आक्षेप अलंकार होय. अथवा,दुस- रा अर्थ—एकदां कवि भगवंतास आळसी ह्मणून गेले, त्याच आपल्या ह्मणण्याचें ते समर्थन करित होत्साते ह्मणतातः— हें जें म्यां तुला आळसी ह्मटलें, ही माझी असदुक्ति तर खरी, परंतु ही 'बरी',कारण,-'रविसखोत्थिता आळसी न,'-ह्मणजे सत्राजितानें जशी आळ घेतली तशी तर केवळ दुःसह नाहीं, ह्मणून बरी; कांकि त्याणें तर तुज वर धडधडित चोरीचें बा- लट घेतलें, तसें तर म्यां केलें नाहीं; तूं मला अद्यापि पावत नाहींस ह्मणून म्यां तुला नुसतें आळसी मात्र ह्मटलें; तेव्हां अर्थात् चौर्यारोपा पेक्षां आलस्यारोप बरा; असा भावार्थ. अथवा, तिसरा अर्थ— म्यां तुला आळसी ह्मटलें, ही माझी उक्ति-भाषण, ' रविसखोत्थिता आळसी असतू न ' - ह्मणजे

पूर्वोक्त

---

वर हा खोटा आळ घेतला ' असें ह्मणतात; परंतु स्त्रीलिंगींहि या शब्दाची रूढि आहे.

एथे असी यांतील अचा लोप झाला आहे. पहा माझें महारा- ष्ट्र व्याकरण, आवृत्ति तिसरी, नियम ५४४, पृ० २७६.

पूर्वोक्त अजामिळादिकांस तूं पावलास, आणि व्रजवास्यादि-शरणागतां करितां गोवर्धनधारणादि साहसहि त्वां केलें, आणि मीं इतकी करुणा भाकित असतां मला अद्यापि पावत नाहींस, तेव्हां अर्थात् तुला मज विषयीं खराच आळस आला असेल ह्मणून म्यां तुला आळसी ह्मटलें; परंतु त्वां स्यमंतक मणि घेतला नसतां सत्राजितानें जी तुज वर धडधडित चोरीची आळ घातली, तशी तर ही माझी 'उक्ति' असत् ह्मणजे खोटी नाहीं; अर्थात् ती त्याची उक्ति आळे सारिखी मिथ्या होती, आणि माझी सत्य आहे, ह्मणून ' बरी ' ह्मणजे खरी आहे. लोकांतहि बोलण्याची रूढि आहे – ' तूं त्यास बरा आळसी केलास ' ह्मणजे त्यास आळसी ह्मटलेंस हें खरें आहे असा अर्थ. कदाचित् तूं ह्मणशील किं माझ्या आळसानें तुझ्या सारिखा एकादा कोणी माझ्या कृपे वांचून राहिला ह्मणून त्याणें माझें महत्व काय न्यून व्हावयाचें? त्यास, या प्रश्नाचें समाधान करित होत्साते कवि दृष्टांतेंकरून सांगतात– **जेमनीं असंख्य जन तर्पिले, — जेमनीं** – जेवण्याच्या समारंभांत, **असंख्य** – पुष्कळ, **जन** – लोक, **तर्पिले** – भोजन देऊन तृप्त केले; अर्थसंदर्भेंकरून वदान्यानें ह्मणजे दात्यानें तृप्त केले; परंतु त्यां मध्यें – **क्षुधित एकला चुकेल, — क्षुधित** – उपवासी, **एकला** – एकादा दुकादा–एकहि, **चुकेल** – कदाचित् चुकला ( एथे हा कादाचित्कत्वार्थद्योतक भविष्यकाळाचा प्रयोग समजावा ); **तरि वदान्य त्यास दे, — तथापि, वदान्य** – उदार यजमान, **त्यास** – त्या चुकलेल्या अतिथीस, **दे** – अर्थात् भोजन देतो; **परि**

मनीं

**मनीं लाजे,**— परंतु मनांत लाजतो; अर्थात् जर तो उदार मनाचा यजमान असला, तर एक जरीं कोणी आपल्या भोजनसमारंभांत क्षुधित राहिला, आणि जरीं त्यास मागा-रून यथेच्छ भोजन दिलें, तरीं तसें केल्यानेंहि आपण अपे-क्षास पात्र होऊं ह्मणून तो आंतून आपल्या मनांत लाजतो; कवि भगवंतास ह्मणतात - मग तुह्मीं तर मुळींच मज वर उ-त्कमकारचा कांहींच अनुग्रह केला नाहीं, तेव्हां या गोष्टीची लज्जा तुह्मास किती असावी बरें याचा तुह्मीच विचार करा; असा एथील ध्वन्यर्थ जाणावा.

अगाप्रगतवत्सलाह्मणतित्याजनांपावलां ॥
ह्मणोनितुमच्याचमींस्मरतसेंसदांपावलां ॥
करूंबरिकृपाहरूंव्यसनदीनहातापला ॥
असेंमनिंधराखराभरंवसामलाआपला ॥ ९ ॥

मागील केकेंत जें भगवंताचें आपणा विषयीं औदासिन्य सांगितलें तें अयोग्य, असें आणखी दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** अगा प्रणतवत्सला ह्मणति त्या जनां पा-वलां, ह्मणोनि तुमच्याच पावलां मीं सदां स्मरतसें, बरि कृपा करूं, व्यसन हरूं, हा दीन तापला, असें मनिं धरा, मला आपला भरंवसा खरा.

**अगा प्रणतवत्सला ह्मणति त्या जनां पावलां,— अगा** - अहो, ( **अगा** हें कारुण्यार्थी संबुद्धिदर्शक अव्यय होय ), मागल्या केकेंत कवींनीं भगवंतास आळसी ह्मटलें, व तुला मोठी लज्जा असावी असाहि आपला भावार्थ दृष्टां-तेंकरून प्रकटित केला, येणेंकरून आपल्या ठायीं औद्धत्य आलें, त्याच्या निवारणार्थ एथें **अगा** या करुणाशब्दानें संबोधन देऊन भगवंताचें शांतवन करूं पाहत होत्साते कवि ह्मणतात,- **प्रणतवत्सला,** - **प्रणत** - नम्र- कायावाचामनें-करून अत्यंत नत ह्मणजे नम्र, जे भक्त, त्यां विषयीं **वत्स-ल**- कनवाळू, **ह्मणति** - असें जे कोणी तुला ह्मणतात-

-अर्थात्

-अर्थात् 'हे भक्तवत्सला' ह्मणून जे कोणी तुला हाका मा-
-रितात-ह्मणजे असें ह्मणून जे तुला कायावाचामनेंकरून शर-
-ण येतात, **त्या जनां पावलां,**- अर्थात् त्यांज वर त्वां कृपा
केलीच केली. 'ह्मणति' हा वर्तमान काळ, आणि 'पावलां'
हा भूत काळ, यांच्या संबंधानें असा एथें निश्चयरूप अर्थ
ध्वनित होतो; उदाहरण- 'मी त्यास हा घोडा देतों ह्मणजे
त्याणें माझें काम केलें,'-अर्थात् केलें असें समज; असा एथे
निश्चयरूप अर्थ होतो. असे तुह्मीं भक्तवत्सल आहां' **ह्मणो-
नि तुमच्याच पावलां मीं सदां स्मरतसें,**-ह्मणोनि-या
करितां, **तुमच्याच पावलां** - तुमच्याच चरणकमलांस, मीं,
**सदां**- निरंतर, **स्मरतसें**- ध्यात आहें; अशी माझी तुमच्या
ठायीं एकनिष्ठा भक्ति जाणून मज वर' **बरि कृपा करूं,**-
-अर्थात् कैवल्यदाना पर्यंत, **कृपा करूं**- अनुग्रह करूं; आण-
-खी' **व्यसन हरूं,**--व्यसन-दुःख- त्रिविध ताप, **हरूं**-दूर
करूं;[1] आतां' **हा दीन तापला,**- **हा**- कवि आपणा कडे
लावून ह्मणतात - हा जो मीं, **दीन** - त्या तापत्रयाचें सहन
करण्यास

---

१ भगवच्चरणारविंदास शरण गेल्यानें तापत्रयोपशमन हेंच नैसर्गिक फल प्राप्त होतें, तसें केल्या शिवाय होत नाहीं, ह्मणून भागवतांत अशीच प्रार्थना आहे;—

नमामतेदेवपदारविंदंप्रपन्नतापोपशमातपत्रं ॥
यन्मूलकेतायतयोऽजसोरुसंसारदुःखंबहिरुत्क्षिपंति ॥३८॥
धातर्यदस्मिन्भवईशजीवास्तापत्रयेणोपहतानशर्म ॥
आत्मल्लुभंतेभगवंस्तवांघ्रिच्छायांसविद्यामतआश्रयेम॥३९॥

भाग०, स्कं० ३, अ० ५.

करण्यास असमर्थ, ह्मणून तापला-त्रिविध तापानें पोळला; **असें मनि धरा,**-असें, आमल्या मनि धरा-मनांत आणा; कारण **मला आपला भरंवसा खरा,**—अर्थात् आपल्या शिवाय इतर कोणाचाहि मला खरा भरंवसा नाहीं - इतर कोणीहि माझें त्रिविध दुःख निवारण करण्यास समर्थ ना-हीं, ह्मणून माझा त्यांज वर खरा भरंवसा नाहीं. याच ह्मणण्याचें समर्थन कवि पुढल्या केकेंत करितात.

---

१ एथे कवीनीं भगवच्चरणारविंदीं जशी आपली श्रद्धा दर्शविली आहे, तशीच भागवतांत श्रद्धावान् पुरुषांची श्रद्धा सरस अर्थानें वर्णिली आहे;—

स्वकृतपुरेष्वमीष्वबहिरंतरसंवरणं
तवपुरुषंवदंत्यखिलशक्तिधृतोंऽशकृतम् ।
इतिनृगतिंविविच्यकवयोनिगमावपनं
भवतउपासतेंऽघ्रिमभवंभुविविश्वसिताः ॥

स्कं० १०, अ० ८७, श्लो० २०,

मलानिरखितांभवच्चरणकन्यकाआपगा ॥
ह्मणेअगइऐकिलेंहिनकधींअसेंपापगा ॥
करश्रवणिंठेवितीनुघडिनेत्रघेभीतिला ॥
नघालिनभिडेसमींजरिंहिकार्यलोभीतिला ॥१०॥

या केकेंत कवि स्वपातित्याचें मान दर्शवित होत्साते, मला तुझाच भरंवसा खरा आहे ह्मणून मागल्या केकेंत जें सांगितलें, त्याचेंच आणखी प्रकारांतरानें समर्थन करितात.

**पदान्वय**— भवच्चरणकन्यका आपगा मला निरखि-तां अगइ असें पाप कधीं हि न ऐकिलें गा ह्मणे, श्रवणिं कर ठेविती, नेत्र नुघडी, भीतिला घे, जरीं हि मीं कार्यलोभी, तिला भिडेस न घालिन.

मला तुझ्या शिवाय खरा भरंवसा दुसऱ्या कोणाचा ना-हीं, याचें कारण मीं फारच पापी आहें, आणि तूं फारच दयालु आहेस, ह्मणुन मागल्या केकेंत कवीनीं दर्शविलें, त्याच आपल्या अभिप्रायाचें समर्थन करित होत्साते आपण किती पापी आहों हें प्रथमतः कवि सांगतात. — **भवच्चरणक-न्यका आपगा मला निरखितां अगइ असें पाप कधीं हि न ऐकलें गा ह्मणे,**—**भवच्चरणकन्यका,**- आ-पल्या चरणापासून उत्पन्न झाली,-**कन्यका**-लहान कन्या,

जी

जी ' **आपगा-नदी**[1] - अर्थात् भागीरथी;[2] ही भागीरथी विष्णुपदापासून उत्पन्न झाली अशी कथा प्रसिद्ध आहेच; आणि ती सर्वांस पावन करणारी आहे हेंहि सर्व जाणतात; ती कवि ह्मणतात' **मला निरखितां**-मला त्याहाळून पाहतां, **अगइ असें पाप कधीं हि न ऐकिलें गा ह्मणें**,-अगइ असें पाप म्यां कधींहि ऐकिलें नाहीं असें ह्मणत्ये; **अगइ** हें खेद किंवा आश्चर्य यांचें द्योतक केवलप्रयोगि अव्यय होय; याचा प्रयोग बहुधा स्त्रिया व मुलें यांच्या भाषणांत होत असतो; भय वाटलें असतां, अथवा कांहीं चमत्कार पाहिला असतां, निरंतर आईच्या सन्निध राहणारीं मुलें, त्या भयाच्या निवा-रणार्थ, अथवा तो चमत्कार दाखविण्या करितां, आपल्या आईसच प्रथम- ' अगे आई ' ह्मणून हाका मारितात; त्याच संबोधनाचें **अगइ** हें संक्षिप्त रूप होय; येणेंकरून भागी-रथीची सभयता ध्वनित होत्ये; **मला निरखितां-ह्मणजे** मला त्याहाळून पाहतांच, माझ्या स्वरूपा वरून तिणें तत्काळ ओळखलें किं मीं अत्यंत पापी आहें असा एथे **निरख-णें** या धातूच्या प्रयोगा वरून ध्वन्यर्थ होतो; **असें पाप**-ह्मणजे माझ्या सारिखें पाप,-कवि ह्मणतात, मत्कृत पाप, **कधीं हि तिणें न ऐकलें गा**,- इतके लक्षावधि पापी मज जवळ

आले

---

1 तरंगिणीशैवलिनीतटिनीह्रदिनीधुनी
स्रोतस्वतीद्वीपवतीस्रवंतीनिम्नगाऽपगा.

अमर-

2 गंगाविष्णुपदीजन्हूतनयासुरनिम्नगा.

अमर.

आले असतील, परंतु असें पाप त्यां कधींहि ऐकलें नाहीं गा, मग मज सारिखे पापी पाहिले कोठून, असा एथील ध्वन्यर्थ; ह्मणे-असें ती ह्मणत्ये; एथें **गा** हें आश्चर्यद्योतक अव्यय जाणावें; तिच्या आश्चर्याचीं व भयाचीं आणखी चिन्हें कवि प्रस्फुट करि-तात ' **कर श्रवणि ठेविती**,* -**कर**-हात, **श्रवणि**-काना वर, ( ही अधिकरणी सप्तमी ), **ठेविती**-ठेवित्ये; अथवा, **ठेविती** एथे **ठेवी**-ठेवित्ये, आणि **ती**, असे दोन निराळे शब्द काढावे हें मला अधिक प्रशस्त दिसतें, कारण, पुढें **नुघडि**, **घे**, हीं अशींच ग्रंथभाषेंतील सततवर्तमानकालार्थी क्रियापदें योजि-लीं आहेत; तिच्या काना वर हात ठेवण्यानें कवीनीं आप-ला पापातिशय दर्शवून निज पासून आपलें अनुद्धारार्हत्वहि दर्शविलें; लोकांतहि, त्यांत विशेषेंकरून स्त्रियांत, काहीं आश्चर्य अथवा एकाद्या गोष्टीची अश्राव्यता, अथवा अनं-गीकार, दाखवायाचा असतां काना वर हात ठेवण्याची चाल प्रसिद्ध आहे; आणखी ' **नेत्र नुघडि**,— **नेत्र**-डोळे, **नुघडि** - उघडित नाहीं;+ अर्थात् मला पाहतांच तिणें जे आपले डोळे मिटले ते तिणें उघडिले नाहींत; येणेंकरून कवीनीं पापमालिन्यानें आपल्या स्वरूपाचें त्रासदायकत्व दर्शवून तेणेंकरून तिच्या सभयतेस आणखी हेतु दर्शविला; आणखी

---

* कोठे ठेवित्ये, ठेवित, असाहि पाठ आढळतो.

\+ **नुघडि.** एथें ' उघडणें ' ह्या स्वरारंभक धातुच्या योगानें ' न ' या शब्दांतील अस परसवर्ण आदेश झाला आहे. नसणें, नावरणें, नाथणें, नानळणें, नातुडणें, नुरणें, नुगवणें इ०, अशा प्रकारच्या धातूंचीं आण-खीं उदाहरणें.

आणखी या प्रमाणें चिन्हें दाखवून ती ' **भीतिला घे**,- **भीतिला** - भयाला, **घे**- घेत्ये,- अर्थात् भयाभित होत्ये; एथें 'भीतिला' ही कर्मणि द्वितीया; अशी गोष्ट आहे ह्मणून कवि ह्मणतात' **जरीं हि मीं कार्यलोभी**,' — यद्यपि मीं, **कार्यलोभी**,- **कार्य**- अर्थात् आपल्यास पावन करवून घेण्याचें काम, त्या विषयीं ' **लोभी**- लोभाविष्ट, आहें; एथें 'आहें' या क्रियेचा अध्याहार जाणावा. तथापि' **तिला भि-डेस न घालिन**,-तिला-भागीरथीला-अर्थात् अशा भित्रीला, **भिडेस न घालिन** - भिडेस घालणार नाहीं; यद्यपि कार्यलोभी जन स्वकार्यसाधना करितां पात्रापात्रविवेचन करण्याचें धोरण ठेवित नाहींत, ते जो सांपडेल त्यास भीड घालितात, तथापि कवि ह्मणतात, मी तसें करणार नाहीं; कारण जी मला पाहून भित्ये, व माझा त्रास करित्ये, आणि त्यांत '**कन्यका**-ह्मणजे पोरगी' या शब्देंकरून तिच्या सामर्थाचें न्यूनत्वहि कवीनें दर्शविलें, अशा भागीरथीपासून माझा उद्धार कदापि होणार नाहीं, ह्मणून तुझाच भरंवसा मला खरा आहे असें जें पूर्वीं मीं बोललों, तेंच खरें; असा एथील कवि त्द्गतार्थ जाणावा. एथे स्वभावोक्ति अलंकार जाणावा.

सदैवनमितांजरींपदललाटकेलेंकिणें ॥
नसेइतरतारितामजभवत्पदाब्जाविणें ॥
नतांकरुनिमुक्तहीह्मणसिमींबुडालोंरिणें ॥
अशातुजनजोभजेमनुजधिक्तयाचेंजिणें ॥ ११॥

भगवंता शिवाय दुसरा मला कोणी त्राता नाहीं हें या केकेंत सांगून, तो केवढा दयालु आहे हेंहि कवि एथें वर्णि-तात.

**पदान्वय**— सदैव नमितां जरीं किणें ललाट पद केलें, [ तरीं ] भवत्पदाब्जा विणें इतर तारिता मज नसे, नतां मु-क्त करुनि ही मीं रिणें बुडालों ह्मणसि, अशा तुज जो मनु-ज न भजे, तयाचें जिणें धिक्.

कदाचित् तूं ह्मणशील कि भागीरथी शिवाय इतर देव, मानव, पुष्कळ तारणारे आहेत, त्यांस कां शरण जात ना-हींस ? तर त्यांज विषयीं ऐक ' **सदैव नमितां जरीं किणें ललाट पद केलें,**—सदैव-निरंतर, **नमितां**-साष्टांग दंडवत घालितां-अर्थात् त्यांच्या पायां वर मीं आपलें मस्तक घांसतां, **किणें**, - **किण**-क्षत- चिन्ह- वण- घट्टा[1] - त्याणें ( ही कर्तरि तृतीया ), ललाट- कपाळ- अर्थात् माझें कपाळ, पद

केलें

---

१ कोंट्टारघट्टहट्टाश्चपिंडगोंडपिचंडवत् ।
गडुःकरंडोलगुडोवरंडश्चकिणोघुणः ॥

अमर—तृ०, कां०.

केलें - ह्मणजे स्थान केलें - त्यांस नमस्कार करितां करितां घट्ट्यानें जरीं माझें कृपाळ आपलें राहायाचें ठिकाण केलें - अर्थात् त्याच्या पायां वर मीं आपलें कपाळ घांसतां घांसतां जरीं त्या कपाळा वर घट्टाहि पडला; या अशा क्षत-रूपकार्यवर्णनानें एक तर इतर देवांच्या चरणा वर मस्त-कारोपात्मक नमनाचें पौनःपुन्यरूप कारण स्पष्ट अनुमित होतें; दुसरें, इतर देवादिकांचें बाहुल्यहि येणेंकरू-न ध्वनित होतें; कारण, क्षतरूप कार्य एकाच देवाच्या चर-णा वर पुनःपुनः मस्तक घांसल्यानें, अथवा, बहुत देवांच्या चरणा वर एक एकदां घांसल्यानेंहि संभवतें; हें दुसरें अनुमान कवीस अधिक विवक्षित असावें असें माझ्या बुद्धीस येतें; तरीं कवि भगवंतास ह्मणतात॑ **भवत्पदाब्जा विणें इतर तारिता मज नसे,** — भवत्पदाब्जा विणें - आपल्या चरणकमला विना, **इतर** - दुसरा कोणीहि देव किंवा मानव, **तारिता** - तारणारा - अर्थात् पूर्वोक्त तापत्रयापासून रक्षायास समर्थ, **मज**- मला, **नसें**- नाहीं; तुमच्या चरणकमला शिवाय दुसरा कोणीं मला रक्षणारा नाहीं. त्यांत आणखी या दोन चरणांत किणविधानेंकरून, आणि भगवच्चरणास अब्जोपमा दिली येणेंकरून, कवीनीं इतरांच्या चरणाचें काठिन्य, आणि भगवच्चरणाचें अत्यंत मृदुत्व, येणें करून ऊह्यमान जी तारतम्येंकरून भगवंताचीं अत्यंत कोमलन्हृदयता ती इंगित केली, असें एथें सम-जलें पाहिजे; तीच पुढें ते स्पष्टार्थानें कथन करितात॑ **नतां मुक्त करुनि हीं-मीं रिणें बुडालों ह्मणसि,**-नतां- तुझ्या

चरण

चरणकमलास जे कोणी नम्र होतात- अर्थात् तुला जे कोणी अनन्यभावेंकरून शरण जातात त्यांस, मुक्त करुन ही- तापत्रयापासून सोडवूनहि- इतकी त्यांज वर उपकृति करून हि, आणखी उलटें ' मीं रिणें[1] बुडालों ह्मणसि, - मीं तु- -मच्या ऋणांत बुडालों- तुह्मीं सर्व ऐहिक सुखाचा त्याग क- -रून मला शरण आलां याच तुमच्या महदौदार्येंकरून मीं तुमचा अत्यंत ऋणी झालों, असें ' ह्मणसि- ह्मणतोस;[2] हा तुझा केवढा थोरपणा, ही तुझी केवढी सदयता; ह्मणून ' अशा तुज जो मनुज न भजे,— अशा तुज- अशा अत्यंत दयालु तुज भगवंताला, जो मनुज न भजे- जो कोणी म- -नुष्य भजत नाहीं-सर्वस्वेंकरून जो तुला शरण जात नाहीं; तयाचें जिणें धिक्,— तयाचें-त्या दूषितांतःकरण मान- -वाचें, जिणें - या सृष्टींत वांचणें, धिक् - धिक्कारयुक्त असो; अर्थात् अशा मनुष्याच्या वांचण्यास धिक्कार अ- सो. एथें भगवद्भक्ती शिवाय वांचणें अत्यंत निंद्य होय असा स्वाभिप्राय कवीनीं दर्शविला आहे.

---

[1] एथें ' रीण ' हा केवळ प्राकृत रूढीचा शब्द योजिला आहे.

मजवरित्याचेंफारआहेरीण येवढ्यानेंउत्तीर्णहोईनमीं

नामदेव.

[2] जे कोणी अनन्यभावेंकरून मला भजतात, त्यांची सर्व काळजी मीं वाहतों ह्मणून भगवान् गीतेंत सांगतात;—

अनन्याश्चिंतयंतोमांयेजनाःपर्युपासते ।

तेषांनित्याभियुक्तानांयोगक्षेमंवहाम्यहं ॥

भ० गी०, अ० ९, श्लो० २२.

**पटुत्वसकलेंद्रियींमनुजतासुवंशींजनी ॥**
**द्विजत्वहिदिलेंभलेंबहुअलभ्यजेंकींजनीं ॥**
**यशःश्रवणकीर्तनींरुचिदिलीतरींहावरा ॥**
**ह्मणेअधिकयाचकींअखिलयाचकींहावरा ॥१२॥**

कदाचित् तूं ह्मणशील कि म्यां तुला जें द्यावयाचें तें पुष्कळ दिलेंच आहे, आतां आणखी काय मागतोस? तर कवि भगवंतास ह्मणतात, ऐक—

**पदान्वय**—सकलेंद्रियीं पटुत्व, मनुजता, सुवंशीं जनी, जें जनीं बहु अलभ्य कीं [तें] भलें द्विजत्व हि दिलें, यशः-श्रवणकीर्तनीं रुचि दिली, तरीं हा अखिल याचकीं हावरा, अधिक वरा याच कीं ह्मणे.

**सकलेंद्रियीं पटुत्व,**— सकलेंद्रियीं - चक्षुश्रोत्ररसनादि पंचज्ञानेंद्रियें आणि पाणिपादादि पंच कर्मेंद्रियें यांच्या ठायीं, पटुत्व- आपआपले विषय ग्रहण करण्याविषयीं, व ग्रहणचलनादि व्यापार करण्याविषयीं, त्या त्या इंद्रियाची दक्षता; **मनुजता,**- मानवजन्म- इतर पश्वादियोनी पेक्षां श्रेष्ठ जो मनुष्यजन्म तो; त्यांत आणखी **सुवंशीं जनी,**— श्रेष्ठ कुलांत, जनी- जनन-जन्म;[1] ब्राह्मणव्यति-

रिक्त

---

1 जनुर्जननजन्मानिजनिरुत्पत्तिरुद्भवः

अमर.

जनीसीमंतिनीवध्वोरुत्पत्तौचजनिर्मता

विश्व.

-रिक्त वर्णांतहि श्रेष्ठ कुलीनतेचा संभव आहे ह्मणून एथें सुवंशीं जननाचें विधान केलें आहे; त्यांत आणखी 'जें जनीं बहु अलभ्य कीं [ तें ] भलें द्विजत्व हि दि-लें,—जें, जनीं-जनांत - सृष्टींत - कर्मभूमींत, बहु - अ-त्यंत, अलभ्य -प्राप्त होण्यास कठिण, कीं, ( हें अवधार-णार्थी अव्यय; ' तो जातो कीं,' ' ती मोठी गुणी आहे कीं,' इत्याद्युदाहरणांत कीं हें केवळ अवधारणार्थी अव्यय जसें समजायाचें तसें एथे समजावें ) तें' भलें द्विजत्व हि दिलें,-भलें-चांगलें-भक्तिज्ञानवैराग्येंकरून संपन्न, असें 'द्विजत्व-ब्राह्मणत्व, हि दिलें; एथे द्विजशब्देंकरून क्षत्रिय वैश्य या वर्णांचाहि संभव होण्याचा प्रसंग आहे, ह्मणून मला वाटतें 'भलें' या विशेषणानें कवीनीं त्याचें निराकरण दर्शवून एथें ब्राह्मणवर्णाचेंच ग्रहण अभिप्रेत आहे असें सुचविलें; अथवा, तशाच अभिप्रायानें दिलें या क्रियापदाचें तें क्रियाविशेषण मानिलें तथापि प्रशस्त;'द्विजत्वहि दिलें,' परंतु 'भलें' दिलें,ह्म-णजे जसें द्यावयाचें तसें दिलें- अर्थात् ब्राह्मणजन्मानें दिलें;[1] नुसता ब्राह्मणवर्णांत जन्म दिला इतकेंच नाहीं,परंतु तो देऊन आणखी 'यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली,- यशःश्रवण-

कीर्तनीं

---

१. भागवतांतहि कपिलानें देवहूतीस असेंच उत्तरोत्तर योन्याधिक्य वर्णून दाखविलें आहे, त्यांत ब्राह्मण श्रेष्ठ ह्मणून सांगितलें आहे; आणखी त्यांतहि जो कोणी समदर्शी मानव त्याचें अत्यंत श्रेष्ठत्व सांगितलें आहे.

जीवाःश्रेष्ठाह्यजीवानांततःप्राणभृतःशुभे ।
ततःसचित्ताःप्रवरास्ततश्चेंद्रियवृत्तयः ॥ २८ ॥

तत्रापि

-कीर्तनीं,- यशः ( यशस् यांतील स्चा विसर्ग पुढील शच्या योगानें तसाच राहिला ) - कीर्ति - महिमा - अर्थात् सर्व भूतांच्या

---

तत्रापिस्पर्शवेदिभ्यःप्रवरारसवेदिनः ।
तेभ्योगंधविदःश्रेष्ठास्ततःशब्दविदोवराः ॥ २९ ॥
रूपभेदविदस्तत्रततश्चोभयतोदतः ।
तेषांबहुपदाःश्रेष्ठाश्चतुष्पादस्ततोद्विपात् ॥ ३० ॥
ततोवर्णाश्चचत्वारस्तेषांब्राह्मणउत्तमः ।
ब्राह्मणेष्वपिवेदज्ञोह्यर्थज्ञोऽभ्यधिकस्ततः ॥ ३१ ॥
अर्थज्ञात्संशयच्छेत्ताततःश्रेयान्स्वकर्मकृत् ।
मुक्तसंगस्ततोभूयानदोग्धाधर्ममात्मनः ॥ ३२ ॥
तस्मान्मय्यर्पिताशेषक्रियार्थात्मानिरंतरः ।
मय्यर्पितात्मनःपुंसोमयिसंन्यस्तकर्मणः ।
नपश्यामिपरंभूतमकर्तुःसमदर्शनात् ॥ ३३ ॥

तृ॰ स्कं॰, अ॰ २९.

प्राकृत कवींनींहि जागोजाग इतर देहा पेक्षां या नरदेहाचें महत्त्व वर्णून आपलें अक्षय कल्याण करून घेण्यास हीच संधि आहे ह्मणून सांगितलें आहे. श्रीधर कवि ह्मणतात.—

सखयारामाविश्रांतितुझियेनामीं ।
ह्मणउनिमजलानेत्वरेंनिजसुखधामीं ॥ ध्रु ॥
अवचटसुकृतेंनरदेहाझालीभेटी ।
पशुसुतजायाधनधामींआवडीमोठी ।
माझीमाझीह्मणुनिम्यांधरिलींपोटीं ।
यांच्यासंगेंभोगिल्यादुःखकोटी ॥ सख॰ ॥ १ ॥

रामजोशींहि असेंच ह्मणतात—

नरजन्मा

भूतांच्या ठायीं अभिनिविष्ट जो मीं त्या मज भगवंताचे गुणानुवाद, त्याचें ' श्रवण - ऐकणें, आणि ' कीर्तन - कथन करणें, यां विषयीं, रुचि - आवड, दिली; ती तर अत्यंत दुर्लभ; **तरीं हा अखिल याचकीं हावरा,—तरी**-इतकें सारें दिलें असतां हि, **हा अखिल याचकीं हावरा, हा**-कवि आपल्यास दाखवून ह्मणतात-हा-मीं, **अखिल याचकीं**-साऱ्या याचकां मध्यें, **हावरा**-लोभी-अतृप्त असा, आहे; ह्मणून ' **अधिक वरा याच कीं ह्मणे,—अधिक**- आणखी, **वरा** - इष्ट वस्तूतें, **याच कीं, ह्मणे** - ह्मणतो; *एथें* **च** *आणि* **कीं** *हीं अव्ययें आग्रहार्थीं जाणावीं. अथवा, एथें, ' तरीं हा अधिकयाचकीं हावरा अधिक वरा* याच कीं ह्मणे,' असा पदान्वय करावा; अर्थात् साऱ्या मागणारां मध्यें असंतुष्ट, होय; आणखी ह्मटलेंहि आहे -

असंतुष्टा

---

नरजन्मामधिंनराकरुनिघेनरनारायणगडी ।
तरिचसार्थकमानवकुडी ॥ ध्रु ॥
बाचौऱ्यांशीलक्षवेळसंसारपडलागळा ।
चिंतेचापिकलामळा ॥
दारधनाचालोभटाकुनीझडकरहोवेगळा ।
हाकसाउकलिशिपिळा ॥
धनानिमित्तजनापुढेंतूंदाखविशिनानाकळा ।
कितितुलामुलाचालळा ॥
तूंपडुनकोयाचेभरीं । ( चाल )
तुझ्याहेंखापरफुटतेंशिरीं ।
तुलामीगोष्टसांगतोंखरी ।
आतांकरतांतडी हीपुन्हानयेबाघडी ॥ नरजन्मामधिं ॥ १ ॥

असंतुष्टाद्विजानष्टाः, तेंव्हां साऱ्या याचकां मध्यें हा नष्ट याच-
-क होय. खाण्या विषयीं जो अतृप्त असतो त्यास हावरा
ह्मणतात, त्याच अर्थाचा एथें अतिदेश जाणावा. यांत इं-
-द्रियपटुत्वापासून रुची पर्यंत उत्तरोत्तर पांच वस्तूचें उत्कर्षा-
-धिक्य दिसतें, ह्मणून एथें सार अलंकार जाणावा.

---

*असेंनह्मणसीलतूंवरदवत्सलश्रीकरा ॥*
*परंतुमजभासलेंह्मणुनिजोडितोंमीकरा ॥*
*दिलेंबहुवरेंखरेंपरिगमेकृपाव्यंगती ॥*
*अलंकृतिमतीसतीमनिझुरेनजोंसंगती ॥ १३ ॥*

पुनः कवि उलट घेऊन ह्मणतात,- साऱ्या याचकां मध्यें मीं हावरा आहें असें तुह्मीं ह्मणाल ह्मणून त्यां जें मागल्या केकेंत अनुमान केलें होतें तें वस्तुतः योग्य नाहीं; आणि जरीं तुह्मीं मला हावरा ह्मटलें तरीं त्या माझ्या हावरेपणास हेतु आहे; असा स्वाभिप्राय दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय** - वरद, वत्सल, श्रीकरा, तूं असें न ह्मणसील, परंतु मज भासलें, ह्मणुनि मी करा जोडितों, बहुवरें दिलें ख-
-रें, परि ती कृपा व्यंग गमे, जों संगती न, ( तों ) अलंकृतिम-
-ती सती मनिं झुरे.

**वरद, वत्सल, श्रीकरा, तूं असें न ह्मणसील, —** वरद – हे वर देणाऱ्या – जें जें ज्यास इष्ट तें तें त्यास पुरवि-णाऱ्या, वत्सल – हे दयार्द्रचित्त – हे दयानिधे, श्रीकरा – हे विष्णो – श्री आहे कराच्या ठायीं ह्म० हस्ताच्या ठा-यीं ज्याच्या असा तूं (बहुव्रीहि), अथवा, श्री – लक्ष्मी, आहे करीं–हातीं– अर्थात् सत्तेंत ज्याच्या असा तूं, अथवा, श्री– कल्याण, त्यातें करा– करणारा,– अर्थात् स्वभक्तांचें ऐहिक आणि कैवल्यदाना पर्यंत आमुष्मिक कल्याण कर-णारा, असा तूं, त्याचें संबोधन; हीं तिन्हीं हेतुगर्भ संबोधनें जाणावीं; **तूं असें न ह्मण**सील, – तूं – एतद्गुणविशिष्ट तूं, **असें** – साऱ्या याचकां मध्यें मी हावरा आहें असें जें म्यां वर मागल्या केकेंत ह्मटलें तें, **न ह्मण**शील – ह्मणणार नाहींस; कारण, तूं **वरद** आहेस– जो जो ज्याचा मनोरथ तो तो त्यास पुरविणारा आहेस, – 'येयथामांप्रपद्यंतेतांस्तथै वभजाम्यहम्' ह्मणून त्वांच गीतेंत सांगितलें आहे; त्यांत आ-णखी, **वत्सल** आहेस – दयालु आहेस – ह्मणजे आपल्या अज्ञपणानें कोणी 'भलतेंच मागितलें तर तें त्यास नेदतां जें त्यास हितकारक तेंच त्यास देतोस, ह्मणून दयालु आहेस; इतकें माझें सामर्थ्य कोठलें ह्मणशील तर तूं, **श्रीकर** आहेस- साक्षात् लक्ष्मीचें निवासस्थान तुझें हस्तकमल आहे, - अथवा, सर्व कल्याणातें करणारा. तूं आहेस; तेव्हां असा समर्थ तूं मला हावरा कसें ह्मणशील ? ज्याचे ठायीं देण्याची इच्छा अथवा सामर्थ्य न्यून असतें तोच आपले इच्छेहून अथवा सामर्थ्याहून अधिक मागणारास हांवरा असें ह्मणतो;

तूं तर देण्या विषयीं दयालु आणि समर्थ आहेस, तेव्हां अर्था-तू तूं असें मला ह्मणणार नाहींस; अथवा, एथें **वरदवत्सल** — साऱ्या वदान्यां मध्यें वत्सल ह्म० दयालु, असें एक पद केलें असतांहि प्रशस्त. असें एक पद केल्या वर **वरदवत्सला** असें जें पाठांतर आढळतें तें मला अधिक प्रशस्त दिसतें, कारण, पुढील **श्रीकरा** या संबोधनाशीं तें मिळतें आहे. **परंतु मज भासलें,**- तूं तर असें ह्मणणार नाहींस, परंतु मला उगीच वाटलें- अशी कल्पना उगीच माझ्या मनांत आली; एथें कवीनें पूर्वी ' मला हावरा ह्मणशील ' ह्मणून जें विधान केलें होतें त्याचा ' असें न ह्मणशील, ' येणेंकरून पुनः निषेध दाखविला आहे, तेव्हां हा आक्षेप अलंकार जाणावा. **ह्मणुनि मीं करा जोडितों,**-यास्तव मीं आपले हात जोडितों - अर्थात् नमस्कारपूर्वक तुझी क्षमा मागतों; तूं इतका समर्थ आणि दयालु असून मज सारिख्या दीनास हावरा ह्मणशील ह्मणून जो मला भास झाला, तो तुझ्या थोरपणास आणि माझ्या कृतज्ञतेस अयोग्य, ह्मणून मीं क्षमा मागतों असा एथील कविन्द्दृतार्थ जाणावा. **बहु बरें दिलें खरें,**—आपण जें पूर्वोक्त इंद्रियपटुत्वादि दिलें तें फार चांगलें यांत संशय नाहीं; **परि ती कृपा व्यंग गमे,**-परि-तथापि, **ती कृपा**-अशा देण्यानें आपण प्रकट केली जी आ-पली कृपा ती, मला 'व्यंग ह्मणजे न्यून-अर्थात् जशी असा-वी तशी नाहीं, अशी' गमे-वाटत्ये; अर्थात् भगवत्पददर्शना वांचून इतर सर्व अर्थ अशाश्वत ह्मणून निष्फल होत. त्या कृपेच्या व्यंगतेस दृष्टांत ' **जों संगती**' न, - जों कालपर्यंत,

संगती

**संगती** - आपला प्राणप्रिय जो सहवर्त्ती पति तो, अथवा त्याची **संगती**- ह्मणजे समागम, **न**- नाहीं;- [एथें **संगती** हा मूळचा शुद्ध संस्कृत शब्द मानून प्रासार्थ त्यास दीर्घत्व मानिलें असतां हा शेवटला अर्थ समजावा; अथवा, **संगती** हा प्राकृत शब्द मानिला असतां या उभय अर्थांचा हि स्पष्ट संभव त्यांत होतो ] तों कालपर्यंत ' **अलंकृतिम-ती सती मनिं झुरे,**— **अलंकृतिमती**[1] - अलंकारयुक्त- अर्थात् वस्त्रालंकार घालून पतीच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करणारी अशी, जरीं ' **सती** - साध्वी - पतिव्रता स्त्री, आहे तरीं ती ' **मनिं झुरे** - आपल्या मनांत झुरत्ये- अर्थात् पति-विरहानें दुःखित असत्ये. या दृष्टांतानें एथें स्वपतिव्यतिरि-क्तान्यपुरुषासक्त विरहिणी नायिकेचें[2] दर्शन होऊन तेणें

करून

---

१ हा संस्कृत व्याकरणांत **अलंकृति** शब्दास **मतुप्** प्रत्यय हो-ऊन त्यास स्त्रीलिंगीं ङीप् झाला आहे. श्रीमती, धीमती, बुद्धिमती, कीर्तिमती, दैदीप्यमती, इ० आणखी अशा प्रकारचीं उदाहरणें.

२ विरहिणी नायिकेचें वर्णन अमरुशतकांत केलें आहे; तें असें—

श्लिष्टःकंठेकिमितिनमयामूढयाप्राणनाथ
श्चुंबत्यस्मिन्वदनविधुतिःकिंकृतंकिन्नदृष्टः ।
नोक्तःकस्मादितिनववधूचेष्टितंचिंतयंती
पश्चात्तापंवहतितरुणीप्रेम्णिजातेरसज्ञा ॥

यांत विरहिणीस पश्चात्ताप कसा होतो, आणि ती आपल्या मनांत कशी झुरत्ये, हें दर्शविलें आहे; तसेंच पुढल्या श्लोकांत तिची उत्कंठा दाखवून उद्दिमता दर्शविली आहे.

वरम

करून कवीच्या अभिमेत मार्थनाविषयास अननुरूप शृंगार-वर्णनरूप दोषाचा मसंग येत होता, ह्मणून मला वाटतें, मोरोपंतानें आपल्या चातुर्यानें एथें **सती** पदाची योजना करून पतिव्रतेचा परम विहित जो आपल्या पतीच्या ठायीं अनुराग, त्याच्या वर्णनानें तो मसंग उडविला. या दृष्टांताचें तात्पर्य हेंच कीं, जरीं वस्त्रालंकारभूषिता अशी

---

वरमसौदिवसोनपुनर्निशा ननुनिशैववरन्नपुनर्द्दिवा ।
उभयमेतदुपैत्वथवाक्षयं मियजनेननयत्रसमागमः ॥

एथे विरहिणी नायिकेच्या अंतर्गत वासकसज्जा ह्मणून आणखी एक नायिकेचा भेद आहे, त्याचें वर्णन जाणावें. या वासकसज्जा नायिकेचें लक्षण साहित्यदर्पणांत केलें आहे तें असें;—

कुरुतेमंडनंयस्याःसज्जितेवासवेश्मनि ।
सातुवासकसज्जास्याद्विदितमियसंगमा ॥

आणि याच्या उदाहरणार्थ राघवानंद नाटकांतला श्लोक लिहिला आहे:—

विदूरेकेयूरेकुरुकरयुगेरत्नवलयैर् ।
अलंगुर्वीग्रीवाभरणलतिकेयंकिमनया ॥
नवामेकामेकावलिमयिमयित्वंविरचयेर् ।
नपथ्यंनेपथ्यंबहुतरमनंगोत्सवविधौ ॥

कृतंवपुषिभूषणंचिकुरधोरणीधूपिता ।
कृताशयनसन्निधौक्रमुकवीटिकासंभृतिः ॥
अकारिहरिणीदृशाभवनमेत्यदेहल्विषा ।
स्फुरत्कनककेतकीकुसुमकांतिभिर्दुर्दिनम् ॥

अमरुशतक

अशी पतिव्रता स्त्री आहे, तरीं जों पर्यंत तिला पतीचा सहवास नाहीं, तों पर्यंत ती जशी त्या अलंकारादिकांचें अ-धिक सुख नमानितां पतिविरहाचेंच दुःख अधिक मानित्ये, तसें कवि भगवंतास ह्मणतात,- जरीं इंद्रियपटुत्वादिकांचा लाभ आपण मला दिला, तरीं आपलें कृपादर्शन जों पर्यंत नाहीं, तों पर्यंत मला त्यांचा तसा संतोष नाहीं, असा एथील कविन्हृद्गतार्थ दिसतो. एथे हा दृष्टांत अलंकार जाणावा.

---

**करालपुरतीदयातरिअसोदिलेंपावलें॥**
**परंतुहरिएकदात्वरितदाखवापावलें ॥**
**प्रसादकरणेंमनींजरिनसेलहेंआवरा ॥**
**जयाबहुतयासद्यामजकशासमीहावरा ॥ १४ ॥**

आतां मज वर पुरतीच दया करा ह्मणून प्रार्थित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** पुरती दया कराल तरि दिलें पावलें असो, परंतु हरि एकदा पावलें त्वरित दाखवा, जरि प्रसाद करणें मनीं नसेल, हें आवरा, जया बहु तयास द्या, मज कशास, मी ह्मवरा.

मागल्या केकेंत कवीनीं भगवत्कृपेची व्यंगता मात्र सूच-विली, परंतु ती कृपा व्यंग कशी ह्मणून दर्शविलें नव्हतें, तें

एथें

एथें स्पष्ट दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.— **पुरती दया करालें तरि दिलें पावलें असो,**—पुरती दया कराल-पूर्णपणें जर आपण मज वर दया कराल, तरि-तर, **दिलें पावलें असो,** - जें इंद्रियपटुत्वादि पूर्वीं आपण दिलें ह्मणून त्यां मागल्या केकेंत सांगितलें तें, मला-पावलें असो-पावलें असें असो; अथवा, **पुरती दया कराल तरि असो,**— एथे उपकार स्वीकृति दाखविण्या करितां 'अ-सो' हें अव्यया सारिखें निराळें पद मानिलें तथापि प्रश-स्त, मग 'दिलें पावलें;' - इंद्रियपटुत्वादि आपण जें दिलें तें मला पावलें, असा पदान्वय करावा. **परंतु हरि एकदा पावलें त्वरित दाखवा,**— परंतु - ती पूर्ती दया तर फारच मोठी आहे परंतु, सद्यः हरि - हे हरि, एकदा **पावलें त्वरित दाखवा,**- एकवेळ तरि आपली पाउलें त्वरित दाखवा; अर्थात् एकदा तरीं दाखवा.परंतु उशीर लावूं नका. अथवा,-एथे 'एकदां' या पदानें केव्हां तरीं दाखवा असें कवि ह्मणून गेले, इतक्यांत लागलेंच दुसऱ्या विचारवेगानें आप-ला धीरपणा सोडून औत्सुक्य दर्शविण्या करितां त्यांणीं 'त्व-रित' या पदाची योजना केली असावी असें मला दिसतें;[1] इतकें असून हि **जरि प्रसाद करणें मनीं नसेल,**-जरि-

जर

1 सत्कर्माचरणा विषयीं अधीरपणाच असणें योग्य आहे;

गृहीतइवकेशेषुमृत्युनाधर्ममाचरेत्

अशी नीती आहे. तुकोबांहि आपल्या प्रार्थनेंत असाच आपला अधीरपणा दाखवितात;—

धीरनाहींमाझ्यामना नाहींनाहींनारायणा ॥

जर, हा आपले चरण दाखविण्याचा प्रसाद-अनुग्रह, करणें आपल्या मनीं नसेल-मनांत नसेल; तर मग हें **आवरा,**— हें- जें आपण दिले तें सारें, **आवरा**-आटोपून घ्या; आणि **जया बहु तयास द्या,**— ज्यास हें बहु — पुष्कळ वाटत असेल त्यास द्या; **मज कशास,** — मला कशास; देतां **मी हावरा,**— मी हावरा ह्मणजे अतृप्त याचक आहें; हें म्या पूर्वींच सांगितलें आहे, व आपणासहि ठाऊक आहेच. एथें 'आवरा' असें ह्मणण्यानें कवीनीं लेंकराचा आपल्या आई पुढें जसा तसा आपला भगवंता पुढें लडिवाळपणा दाखविला. इंद्रियपटुत्व, ब्राह्मणजन्मादि, ज्यास मोठेंसें वाटून याज वरच जो तृप्त असेल तो अज्ञ[१], अभागी, असा एथील ध्वनितार्थ जाणावा.

---

१ ज्ञानहीन जीं केवळ ब्राह्मणादि उंचवर्णाच्या ठायीं जन्मादि, तीं सारीं अभिमानजनक, अतएव भगवदनुग्रहास प्रतिबद्धक, ह्मणून तीं मला नकोत असाच आपला भावार्थ कुंतीनें कृष्णास स्वप्रार्थनेंत दर्शविला आहे;—

जन्मैश्वर्यश्रुतश्रीभिरेधमानमदःपुमान् ।
नैवार्हत्यभिधातुंवैत्वामकिंचनगोचरम् ॥

भाग, स्कं० १, अ० ८, श्लोक० २६

दिलेंफिरुनिघेतलेंअशिअकीर्तिलोकींनहो ॥
सुनिर्मळतुझींपदेंकधितरींविलोकीनहो ॥
निजप्रियजनांकडेतरिहिदेहवालाजसी ॥
पडेलसमजाविसीतसिकरोतकांलाजसी ॥ १५ ॥

मागल्या केकेंत दिलें तें परत घ्या ह्मणून लडिवाळपणानें कवीनीं भगवंतास ह्मटलें, परंतु यांत तसें करण्याचें अनौचि-त्य दर्शवित होत्साते कवि आणखी प्रार्थना करितात.

**पदान्वय—** दिलें फिरुनि घेतलें अशि अकीर्ति लोकां नहो, तुझीं सुनिर्मळ पदें कधि तरीं विलोकीन हो, निजप्रिय जनां कडे तरि हि हवाला दे, जसी समजाविसी पडेल तसि करोत, कां लाजसी ?

**दिलें फिरुनि घेतलें अशि अकीर्ति लोकां नहो,—** **दिलें फिरुनि घेतलें** - जें आपण इंद्रियपटुत्वादि दिलें आहे, तें **फिरुनि घेतलें**- परत घेतलें, **अशि अकीर्ति लोकां नहो,**- अशी, आपली अकीर्ति दुर्लौकिक, या लोकांत, नहो- नहोऊ;- याचकास दान देऊन तें पुनः परत घेणें दात्याच्या अपकीर्तीस कारण होतें ह्मणून असें अनु-चित कर्म आपणा कडून होणार नाहीं; मला जें इष्ट, व आपल्या सद्यशास कारणभूत, असें जें काहीं तेंच आपणा क-डून घडेल, असा आपला तद्गत अर्थ दर्शवित होत्साते कवि ह्मणतात-**तुझीं सुनिर्मळ पदें कधि तरीं विलोकीन हो,** तुझे अत्यंत पवित्र चरण मी केव्हां तरीं पाहीन असें, **हो**-हो-ऊ.

-ऊ. एथें भगवंताच्या निर्मलपदाच्या अवलोकनेच्छे वरून कवीची स्वपापरूपमालिन्याचें निरसन व्हावें अशी इच्छा ध्वनित होत्ये. या दोन चरणांत **नहो** आणि **हो** हीं जरीं एकाच धातूचीं रूपें आहेत, तरीं तीं एकांत अकरणरूपीं आणि दुसऱ्यांत करणरूपीं प्रयोजिलीं आहेत ह्मणून, माझ्या मतें एथें अशा अर्थयोजनेनें काव्यरचनेस बाध येत नाहीं; तथापि, दुसऱ्या चरणांतील **हो** हें औत्कंठ्यार्थी संबोधन मानलें असतां फार चांगलें. '**कधितरीं विलोकीन हो**'— अहो मी केव्हां तरीं पाहीन- मी तुमचे चरण केव्हां पाहीन कोणास कळे, असें एथे भगवच्चरणावलोकना विषयीं कवीचें औत्कंठ्य ध्वनित होतें. अथवा, 'तुझीं सुनिर्मळ पदें कधि तरीं विलोकीन' यांत नुसत्या विलोकन क्रियेनें स्वेच्छेचें अल्पत्व, आणि 'कधितरीं' या पदानें आपला धीर आणि दात्यास अवकाश दिल्याचें, इंगित होतें. असें असतांहि जर तुला माझी इच्छा पूर्ण करायास अवघड वाटत असेल, तर या पेक्षांहि अल्प मीं मागतों तें तरीं दे असा स्वाभिप्राय दर्शवित होत्साते कवि आणखी प्रार्थितात.- **निजप्रिय जनाकडे तरि हि हवाला दे,**— इतकेंहि न देशील तर ' **निजप्रिय जनां कडे तरि हि, - निजप्रिय जन**- आपले प्रिय जन जे साधु - भगवद्भक्त, त्यांज कडेस तरीं, **हवाला दे**- माझा हवाला दे- माझी भलावण कर- अर्थात् साधुजनाच्या तरीं मला स्वधीन कर- अथवा त्यांहीं तरीं मज वर कृपा करावी ह्मणून परभारें तूं त्यांस भीड घाल; तूं अत्यंत पापी, आणि ते परम पवित्र, तेव्हां तुझें त्यांचें कसें जमेल असें कदा-

चित्

चित् ह्मणशील तर' **जशी समजाविसी पडेल तसि करोत,**- त्यांशीं मजशीं जशी, समजाविसी-समजूत, पडेल तसि करोत-तशी ते करूत; **कां लाजसी,**- तूं तरीं कां लाजतोस; इतकें अल्प मागितलें असतां, आणि माझ्या उद्धाराचा दुसऱ्यावर भार घातला असतां, मग कां लाजतोस.[1] अर्थात् इतकी माझी अल्प व कमी जोखमदारीची प्रार्थना ऐकायास तरीं आतां लाजूं नको असा एथील भावार्थ जाणावा. मागल्या केकेंत 'तुमच्या मनांत मज वर पूर्णपणें प्रसाद करायाचा नसला तर पूर्वोक्त इंद्रियपटुत्वादि जें दिलें तें आपलें आटो-पून घ्या ' ह्मणून कवींनीं लडिवाळपणानें सांगितलें, तो के-वळ विध्याभास जाणावा, कारण या केकेंतील पहिल्या चर-णांत- 'दिलेलें परत घेतल्यानें तुमची अकीर्ति न व्हावी,' या आशीर्वादात्मक स्वेच्छाप्रदर्शनेंकरून कवींनीं पुनः तो वि-धि लज्जेस कारण होय ह्मणून निषिद्ध केला आहे; अतएव

हा

---

१ तुकोबानेंहि लडिवाळपणानें असाच आपला, किंचित् रोष दाखविला आहे; —

तरिकांमागेंवायां किर्तीवाढविली
जनांतआपुली ब्रीदावळी ॥ १ ॥
साचकरितांआतां फिरसीमाघारा
ठाईंचेदातारा नेणवेची ॥ २ ॥
संतासींश्रीमुख कैसेंदाखवीसी
पुढेंमातत्यासी सांगईन ॥ ३ ॥
घेईनडांगोरा तुझीयानांवाचा
नव्हेअनाथाचा नाथऐसा ॥ ४ ॥
तुकाह्मणेआह्मीं राहिलोंमरोनी
तुकांहोसिधणी निमित्ताचा ॥ ५ ॥

हा आशीर्वचनाक्षेप अलंकार होय.[1] तसेंच दुसऱ्या चरणांत कवीनीं भगवच्चरणदर्शनाच्या प्राप्तीची इच्छा प्रकट करून, ती प्राप्ति होत नसल्यास, तिच्यापेक्षां दिसण्यांत उण्या योग्यतेच्या साधुसमागमाच्या प्राप्तीची इच्छा तिच्या बद्दल पुढल्या दोन चरणांत प्रकट केली आहे; असें एथे न्यूनाधिक्याच्या परस्पर विनिमयाचें दर्शन होतें, ह्मणून हा परिवृत्ति अलंकार होय.[2]

---

या अलंकाराचें लक्षण सामान्यतः साहित्यदर्पणांत—

अनिष्टस्यतथार्थस्यविध्याभासःपरोमतः ।

असें सांगून पुढील उदाहरण दिलें आहे;—

गच्छगच्छसिचेत्कांतपंथानःसंतुतेशिवाः ।
ममापिजन्मतत्रैवभूयाद्यत्रगतोभवान् ॥

परंतु दंडीनें आपल्या काव्यादर्शांत या अलंकाराचा आशीर्वचनाक्षेप ह्मणून भेद मानून त्याच्या व्याख्यानांत हेंच वरील उदाहरण दिलें आहे.

२ एथें पुढल्या श्लोकाच्या द्वितीयार्द्धांत अधिकाचा न्यूनानें विनिमय दाखविला आहे, त्या प्रकारचा हा विनिमय जाणावा.

दत्वाकटाक्षमेणाक्षीजग्राहहृदयंमम ।
मयातुहृदयंदत्वागृहीतोमदनज्वरः ॥

साहित्यदर्पण.

**अहानिपटधृष्टमींप्रभुवरासिकांलाजसी ॥**
**ह्मणेंभजनसोतसीविकृतिभाविकांलाजसी ॥**
**परंतुअपराधहागुरुह्मणोनिशिक्षाकरीं ॥**
**असेचिधरिलीनयच्युतदमार्थदीक्षाकरीं ॥ १६ ॥**

मागल्या केकेंत कवीनीं भगवंतास ‘ कां लाजसी ’ ह्मणून ह्मटलें. याचकानें दात्यास असें ह्मणणें यांत त्याचें मोठें औद्धत्य दिसतें, ह्मणून कवि आपल्या औद्धत्यरूप अपराधा विषयीं पुढील सह्या केकांत प्रभूचें सांत्वन करित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय—** अहा मीं निपट धृष्ट, प्रभुवरासि कां लाजसी ह्मणें, भाविकांला जसी तसी तुज विकृति नसो, परंतु हा अपराध गुरु, ह्मणोनि शिक्षा करीं, नयच्युतदमार्थ करीं दीक्षा धरिली असेचि.

मागल्या केकेंत कां लाजतोस ह्मणून जें कवीनीं भगवंतास ह्मटलें, तेणेंकरून आपल्या अंगीं उद्धतपणा येतो, अशी आशंका मनांत आणून, त्या आपल्या उद्धतपणाचा पश्चात्ताप करित होत्साते कवि ह्मणतात - **अहा मीं निपट धृष्ट,-** **अहा !**- खेदार्थी अव्यय, मीं, केवढा ✓ निपट - निस्तुकतरंत,[1] धृष्ट- उद्धत- दांडगा,- अहा मी केवढा निस्तुक दांडगा

---

१ बहुकठोरह्मणेधनुजानकी निपटकांसवपृष्ठसमानकीं । रघुपतीतरिहालघुआपण अहहदारुणतातनुझापण ॥
जानकीस्वयंवर, वामन.

डगा आहें; कारण "**प्रभुवरासि कां लाजसी ह्मणें**,-प्रभुव-रासि- राजाधिराज महान् समर्थ धनी त्यास, **कां लाजसि ह्मणें**,-कां लाजतोस, असें "ह्मणतों; परंतु कवि पुनः आपल्या मनांत विचार करून ह्मणतात " **भाविकांला जसी तसी तुज विकृति नसो**,—भाविकांला,-भव - ह्मणजे प्रपंच, तत्संबंधी जे ते भाविक त्यांनां - अर्थात् प्रापंचिक जनांला, **जसी**- ज्या प्रकारची लज्जारूप, **तसी**- तशा प्रकारची ल-ज्जारूप, **विकृति**- मनोविकार, **नसो**- नसावा; अर्थात् ल-ज्जारूप जो मनास विकार व्हावयाचा, तो इतर प्रापंचिक जे जन त्यांसच व्हावयाचा, तूं निर्विकार, तुझ्या ठायीं अशा विकाराच्या उद्भवाचा संभवच होत नाहीं ह्मणून तो विकार नसावाच असा अर्थ;* "**परंतु हा अपराध गुरु**,—परंतु-जरी

---

यांत वामनानेंहि निपट ह्मणजे निस्तुक, केवळ, अशा अर्थींच या शब्दाची योजना केली आहे.

रामजोशानेंहि अशाच अर्थीं या शब्दाचा प्रयोग केला आहे;—

निपटबावळ्यायाविषयाच्यामागेंलागशीकसा ।
कांहोशीबाधडपिसा. ॥

लज्जादि मनोविकारांस मूळ जें सत्वरजादि त्रैगुण्य, त्याच्याहि पलिकडेस भगवद्व्यक्ति ह्मणून सांगितलें आहे;—

येचैवसात्विकाभावा राजसास्तामसाश्चये ।
मत्तएवेतितान्विद्धि नत्वहंतेषुतेमयि ॥ १२ ॥
त्रिभिर्गुणमयैर्भावै रेभिःसर्वमिदंजगत् ।
मोहितंनाभिजानाति मामेभ्यःपरमव्ययम् ॥ १३ ॥
भ० गी०, अ० ७.

जरीं तुज निर्विकाराच्या ठायीं तसा लज्जारूप विकार संभव-
-त नाहीं तरीं, म्यां त्याचा आरोप तुज वर केला ह्मणून/हा,
माझा/अपराध, गुरु- थोर-भारी; **ह्मणोनि शिक्षा करीं,-**
ह्मणून, तूं पाहिजे असल्यास मला / शासन, कर; कारण/
**नयच्युतदमार्थं करीं दीक्षा धरिली असेचि,— नय-**
च्युतदमार्थं, - नय- न्याय, त्या पासून/च्युत- भ्रष्ट, झाले
जे- अर्थात् अन्यायी, त्यांच्या / दमार्थ- दंडा कारणें, क-
रीं - आपल्या हातीं, दीक्षा - अधिकार चिन्ह चक्रगदादि,
**धरिलें असेचि-** धरलें आहेच; अर्थात् अपराध्यांस दंड करणें
हा आपला नियम आहेच;[१] व त्या करितां चक्रगदादि आ-
-युधेंहि आपण धारण केलींच आहेत; तेव्हां आपल्यास
योग्य दिसल्यास या माझ्या औन्नत्यरूप अपराधा करितां
मला आपण दंड करावा.

---

१ इंद्रस्तुतींत ह्मटलें आहे,—

कुतोनुतद्धेतवईशतत्कृता लोभादयोयेऽबुधलिंगभावाः ।
तथापिदंडंभगवान्बिभर्ति धर्मस्यगुप्त्यैखलनिग्रहाय ॥५॥
भाग०, द० स्कं० पू०, अ० २७.

सदैवअपराधहेरचितसेंअसेकोटिगा ॥
स्वयेंहिकथितोंनसेतिळहिलाजमीकोटिगा ॥
अजांडशतकोटिजाउदरिंसर्वदांनांदवा ॥
नत्यांतअवकाशयांस्थळदिलेंतदांकांदवा ॥१७॥

मागील केके वरून स्वापराधा विषयीं भगवंताचें सांत्वन चालू;—

**पदान्वय—**गा, असे हे अपराध कोटि सदैव रचितसें, स्वयेंहि कथितों, तिळहि लाज नसे, मी कोटिगा, जा उदरिं अजांडशतकोटि सर्वदां नांदवा, त्यांत यां अवकाश न, तदां दवा कां स्थळ दिलें ?

हा तुझ्या ठायीं लज्जारोपात्मक एकच अपराध म्यां केला असें नाहीं, तर **गा,** - अगा-विशालोदरा भगवंता ! **असे हे अपराध कोटि सदैव रचितसें,— असे हे** अपराध - या प्रकारचे हे अन्याय, मीं **कोटि सदैव रचितसें,** - **कोटि** - कोट्यावधि - कोटिशः, निरंतर, रचितसें - रचित आहें; इतकेंच नाहीं परंतु **स्वयेंहि कथितों,—** स्वतां हि, आपल्या मुखानें सांगतों; आणि असें करण्यांत मला **तिळहि लाज नसे,— तिळ हि**-तिळभरहि- यत्किंचित् हि, **लाज नसे,**- लज्जा वाटत नाहीं; तेव्हां अर्थात्

मी

मी कोटिगा,— मी, कोटिगा - कोटगा[1]- कोडगा- निर्ल-
-ज्ज; आहें; आपण अन्याय करून त्याचें आपणच स्वमु-
-खानें वर्णन करणें हें कोडगेपणाचें लक्षण होय. एथें कवी-
-नीं भगवंताच्या ठायीं जो लज्जारोप केला होता, ती भ्रांति,
तो संपूर्णत्वेंकरून आपल्या वर आणिल्यानें निवारण
केली,

1 कोटिगा हा शब्द मूळचा ' कोडगा ' या शब्दा वरून भाषा-
-रूढी प्रमाणें वर्णव्यत्ययानें कवीनें साधला आहे असें दिसतें:— डच्या
स्थानीं टचा समयविशेषीं अपभ्रंशेंकरून वर्णव्यत्यय होत असतो; या
नियमा वरून ' कोडगा ' या वरून ' कोटगा ' शब्द साधला आहे; जसें—
सोडगा, सोटगा; घोडगा, घोटक; झोडगें झोंट; रोडगा, रोटगा; फोड-
-णें फुटणें; तोडणें, तुटणें; इत्यादि शब्दां मध्येंहि हाच नियम सांपडतो.
' कोटिगा ' यांत जो इकार दिसतो तो शुद्ध प्रासा करितां कवीनीं घेतला
आहे. व असा इकारागम करण्याची या भाषेंत अनुकूलताहि पुष्कळ
आहे; मारला, मारिला; खाणला, खाणिला; तोडला तोडिला; सोडला
सोडिला; असा क्रियापदांच्या रूपांत तर इकारागमाचा नियम आहेच;
परंतु ग्रंथभाषेंत जेथें जेथें कवीस इष्ट दिसलें, तेथें तेथें बहुधा सर्व जाती-
-च्या शब्दांस असा आगम करण्याचा त्यांचा स्वेच्छाचार पुष्कळ आढळतो.

नव्हेमीपंचप्राण ॥ जेमजदृश्यमान ॥
विषयपंचकतेंअन्य ॥ मजचिपासाव ॥
तूंआपणयातेंजाणतचिनेणसी॥हेंचिमूळअज्ञानासी॥
नाथिलेंअज्ञानवाहतोसी ॥ निजमस्तकीं ॥
ह्मणोनिसुषुप्तिनातुज ॥ तियेतेंजाणणेवेगळेंबुज ॥
अवस्थात्रयबुद्धीसीसहज ॥ तूंतयावेगळाची ॥

विवेकसिंधु.

घणाचियेघायीं पोटिशीदेहीरा ॥ '
सांडोनेणेधीरा आपूलिया ॥

यांत

केली, ह्मणून एथें हा भ्रांतापन्हुति अलंकार दिसतो.[१] ह्मणूनें या आपल्या अपराधाची क्षमा भाकित असतां कवि पुढें ह्मणतात—**जा उदरीं अजांडशतकोटि सर्वदा नांदवा,**- ज्या, आपल्या ⁄ **उदरीं**- उदरांत-पोटांत, **अजांडशतकोटि,**- **अजांड,**- **अज**-ब्रह्मा, त्याचें जें ⁄ **अंड**- अंडें,- तें ब्रह्मांड, त्याच्या⁄ **शतकोटि**- शंभर कोटि- अर्बुदप्रमाण- अर्थात् असंख्य, निरंतर, नांदविता-बाळगिता;[२] **त्यांत यां अवकाश**

**न**

---

यांत-**मजचि**, **जाणतचि**, **हेंचि**, **वाहतांसी**, **ह्मणोनि**, **आपुलिया**, या शब्दांत असा हा यथेच्छ इकारागम स्पष्ट दिसतो.

१ कवीनें १५व्या केकेंत शेवटीं 'कां लाजसी' ह्मणून ह्मटलें होतें तेणेंकरून भगवंताच्या ठायीं जें सलज्जतारोपण केलें, ती पुढील दुसऱ्या उदाहरणांतील भ्रांतिविषयमहिषत्वा प्रमाणें निश्चयरूपा भ्रांति जाणावी; पहि--ल्या उदाहरणांतील ज्वरा प्रमाणें ही भ्रांति नव्हे असें मला वाटतें; तें सलज्जतारोपण एथें 'नसे तिळहि लाज मी कोटिगा' असें ह्मणून कवीनें आपणावरच केल्यानें त्या भ्रांतीचें वारणाहि स्पष्ट दिसतें.

भ्रांतापन्हुतिरन्यस्यशंकायांभ्रांतिवारणे ।
तापंकरोतिसोत्कंपंज्वरःकिंनसखिस्मरः ॥

कुवलयानंद.

नागरिकसमधिकोन्नति- रिहमहिषःकोयमुभयतःपुच्छः ।
नहिनहिकरिकलभोऽयं शुंडादंडोयमस्तिनतुपुच्छं ॥

२ अनंत ब्रह्मांडें भगवंताच्या पोटांत साठविलीं असतात, अशा मह--त्वानें त्याचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं केलें असतें; भागवतांत ह्मटलें आहे—

योऽविद्ययाऽनुपहतोऽपिदशार्धवृत्त्या ।
निद्रामुवाहजठरीकृतलोकयात्राः ।

अंतर्जले

**न,**—त्यांत-त्या पोटांत, यां-या मत्कृत अपराधांस, **अवकाश** -समावेश - जागा, **न** - नाहीं काय? एथे काक्वर्थमिश्रित आश्चर्यद्योतन जाणावें; अर्थात् ज्या तुमच्या पोटांत असंख्य ब्रह्मांडें राहतात, त्यांत यःकश्चित् जो मीं त्या माझ्या अपराधांचा समावेश होत नाहीं हें मोठें आश्चर्य होय; आणखी आश्चर्याचें कारण' **तदां दवा कां स्थळ दिलें?** तदां-त्या काळीं - अर्थात् बाळपणीं व्रजवासी असतां तुह्मीं दावाग्नि गिळिला त्या काळीं, **दवा** - दव जो दावाग्नि[1] - वणवा त्यास, **कां स्थळ दिलें?** कशी जागा दिली?- अर्थात् आ- आपल्या पोटांत. तात्पर्य जो गिळायाचा पदार्थ नव्हे असा दावाग्नि त्यासहि आपल्या पोटांत सांठविलें, आणि माझ्या अपराधांचा मात्र त्यांत समावेश होत नाहीं, हें आणखी मोठें आश्चर्य होय. हा विषम अलंकार होय. अपराध पोटांत घालणें, ह्मणजे त्यांची क्षमा करणें, असा लाक्षणिक अर्थ प्रसिद्ध आहे.

---

अंतर्जलेहिकशिपुस्पर्शानुकूलां ।
भीमोर्मिमालिनिजनस्यसुखंविवृण्वन् ॥ २० ॥
यन्नाभिपद्मभवनादहमासमीड्य ।
लोकत्रयोपकरणोयदनुग्रहेण ।
तस्मैनमस्तउदरस्थभवाययोग- ।
-निद्राऽवसानविकसन्नलिनेक्षणाय ॥ २१ ॥

स्कं० ३, अ० ९.

तुकारामानें या पेक्षांहि अतिशयार्थानें ह्मटलें आहे—
अनंतब्रह्मांडें एकेरोमींऐसींधेंडें ॥
तोहागवळीयाचेघरीं॰उमराचढतांटेंकाधरी ॥

१ दवदावौवनारण्यवन्ही—

अमर.

तुझ्याजिरविलेबहुप्रणतमंतुपोटेंपण ॥
त्यजीमदपराधहेंमजकडेचिखोटेंपण ॥
दवाग्निजठरींअतिक्षुधितत्यासहेंअन्नद्या ॥
वितृष्णकरितिश्रितांतुमचियादयासन्नद्या ॥ १८ ॥

आपल्या अपराधांचा समावेश भगवंताच्या महदुदरांत होत नाहीं ह्मणून कवीनीं जें मागल्या केकेंत आश्चर्यप्रदर्शन केलें, त्याचें एथें समाधान करित असतां कवि ह्मणतात.

**पदान्वय**— तुझ्या पोटें बहुप्रणतमंतु जिरविले, पण मदपराध त्यजी हें खोटेंपण मज कडेचि, जठरीं अति क्षुधित दवाग्नि त्यास हें अन्न द्या, तुमचिया दयासन्नद्या श्रितां वितृष्ण करिति.

आश्चर्य ह्मणावें तर - **तुझ्या पोटें बहुप्रणतमंतु जिरविले**,-तुझ्या, पोटें- पोटानें, **बहुप्रणतमंतु**,-**बहु**- पुष्कळ- असंख्य, जे^प्रणत-अत्यंत नम्र, त्यांचे^ **मंतु**-अपराध,[1] अथवा, प्रणतांचे जे मंतु ते प्रणतमंतु, बहु असे जे प्रणतमंतु ते बहुप्रणतमंतु, असा कर्मधारय करावा, अर्थात् सर्व मनोभावेंकरून जे कोणी तुला शरण आले त्या बहुतांचे अपराध, अथवा त्यांचे बहुत अपराध, **जिरविले**- पचविले- आंत दडविले - अर्थात् त्यांची क्षमा केली; **पण मदपराध त्यजी हें खोटेंपण मज कडेचि**,--**पण**-परंतु, **मदपराध**- माझे अपराध, तें तुझें पोट^**त्यजी**-टाकितें- आंत घेत नाहीं, हें,

1 आगोऽपराधोमंतुश्च. अमर.

हें, **खोटेंपण मज कडेचि,-हें खोटेंपण**-हा दोष, **मज कडे-**
**-चि**, - माझ्या कडेच; अर्थात् असंख्य शरणागताचे अप-
-राध तुझ्या पोटानें जिरविले, आणि माझे अपराध तेंच
पोट टाकितें, तस्मात् हा माझाच दोष; जसें निर्दोष अन्न
असतां पोट त्यास आंत साठवून पचवितें, परंतु तेंच अन्न
पामलेलें अथवा 'कट्वादिपदार्थमिश्रित अशा प्रकारचें सदो-
ष असल्यास त्यास शिसाळून तें आंत सुद्धां घेत नाहीं, अथ-
-वा कदाचित् आंत गेलेंच तर वमन करून त्यास बाहेर टा-
कितें, तस्मात् त्या अन्नाचा दोष, पोटा कडेस तो दोष नाहीं;
अर्थात् माझे अपराधच असे विलक्षण भयंकर आहेत कीं
तुझ्या क्षमेस ते पात्रच होऊं शकत नाहींत. एथें कवीनें आ-
-पल्या अपराधाचा कुत्सितपणा ध्वनित केला. तर मग
अशा तुझ्या अक्षमार्ह अपराधांस म्यां काय करावें असें
आतां तूं ह्मणशील, तर मला एक युक्ति सुचली आहे; तसें
त्वां करावें, ती अशी कीं ⁄ **जठरीं अतिक्षुधित दवाग्नि**
**त्यास हें अन्न द्या,**—आपल्या⁄**जठरीं**- जठरांत, **अतिक्षु-**
**धित**-फार भुकेला- पुष्कळ दिवसांपासून त्यास कांहीं भक्षा-
-यास मिळालें नाहीं ह्मणून फार भुकेला - अर्थात् जो प्रदीप्त
व्हावयास पाहत आहे, असा जो⁄**दवाग्नि**-दावाग्नि-गोकुळां-
-त तुह्मीं गिळिला होता तो वणवा, **त्यास हें अन्न द्या,**-त्या
भुकेल्या दावाग्नीस, हें, मदपराधरूप जें⁄**अन्न**-भक्ष्य-भोजन,
तें⁄ **द्या**; अर्थात् आतां त्या अग्नीनें हे माझे अपराध जाळून
भस्म करा; कदाचित् आपण ह्मणाल किं अन्न पचविण्याचें
अथवा दग्ध करण्याचें काम अग्नीचें, ह्मणून त्वां अग्नीस शरण

जाऊन

जाऊन त्यास ही प्रार्थना करावी, त्यास, अग्नी मध्यें जी पाचकत्वादि शक्ति आहे ती आपणा कडूनच आहे,[1] अथवा विश्वरूपेंकरून ती शक्तिहि आपल्यापासून भिन्न ह्मणतां येत नाहीं,[2] ह्मणून हें माझें इष्ट कार्य आपणच केलें पाहि-जे; आपण परम दयालु अहां ह्मणून प्रार्थनापूर्वक ही मी आपणासच तोड सांगतों; तें भगवंताचें दयालुत्व रूपक अलं-कारानें प्रकट करित होत्साते कवि ह्मणतात— **तुमचिया दयासन्नद्या श्रितां वितृष्ण करिति,**— तुमच्या दयारूप पवित्र नद्या ( कर्मधारय), श्रितां- आश्रितां - अर्थात् ज्यांनीं तुमचा आश्रय केला त्यांस, **वितृष्ण करिति, - वितृष्ण** - तृष्णारहित - कामनारहित - अर्थात् तृप्त - शांत - संतुष्ट, करितात. तात्पर्य, जे तुह्मास मनोभावें शरण येतात, त्यांचे सर्व मनोरथ तुह्मीं परिपूर्ण करून त्यांस संतुष्ट करितां, असे तुह्मीं दयालु अहां, ह्मणून प्रथम माझे अपराध जाळून नाहींसे करावे ही कवि ह्मणतात माझी एथे आपणास प्रार्थना आहे; असा एथील भावार्थ जाणावा.

---

१ भयादग्निस्तपति.

श्रुति

२ अहंवैश्वानरोभूत्वाप्राणिनांदेहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तःपचाम्यन्नंचतुर्विधं. ॥
भ० गी०, अ० १५, श्लो० १४.

**नहोयकवणाहितेंतुमचियाचिलीलालसें ॥**
**पदेंचरितदाविजेत्रिजगदब्जकीलालसें ॥**
**मदुद्धरणमात्रकांजडतुह्मांदिसेवारिती ॥**
**स्वकष्टव्यसनमर्त्यहीनकरितीचसेवारिती ॥ १९ ॥**

मागल्या केकेंत माझ्या अपराधांची क्षमा करावयास आपण दयावंत अहां ह्मणून कवीनीं दर्शविलें, आतां ती क्षमा करणें हें काहीं आपल्या सारिख्या समर्थास अवघड कार्य आहे असेंहि नाहीं, अशी विवक्षा मनांत आणून कवि ह्मणतात.

**पदान्वय** — कवणा हि न होय तें चरित तुमचियाचि लीलालसें पदें त्रिजगदब्जकीलालसें दाविजे, मदुद्धरण मात्र कां तुह्मां जड दिसे, मर्त्य ही स्वकष्टव्यसन वारिती, सेवा रिती न करितीच:

**कवणा हि न होय तें चरित तुमचियाचि लीला-**
**-लसें पदें त्रिजगदब्जकीलालसें दाविजे,**- **कवणा हि न होय**,-कोणाला हि जें होत नाहीं, अथवा, **क** ह्मणजे ब्रह्मा, [1] **व** ह्मणजे वरुण, [2] आणि **ण** ह्मणजे बिंदुदेवरुप शि-
व,

---

१ कोब्रह्मणिसमीरात्मयमदक्षेषुभास्करे
एकाक्षरीकोश.
कोब्रह्मणिसमीरात्मनि
मेदिनी.

२ वप्रचेतसिजानीयादिवाख्येपितदव्ययं
वःसांत्वनेचवातेचवरुणेचनिगद्यते.
एकाक्षरीकोश.

-व,[1] - अर्थात् ब्रह्मा वरुण आणि शिव, यांच्यानेंहि जें हो-
-त नाहीं, तें चरित - तें कार्य - तो अद्भुत चमत्कार,
तुमचियाचि - तुमच्याच, लीलालसें - लीलेंकरून जें,
अलस- स्तब्ध, अथवा, लीला ह्म० क्रिया[2] - चलनरूप,
तत्पूर्वक,- चलनरूप क्रिया करून मग स्तब्ध राहिलें,
अशा ( एथें लीलालसें हें पुढील पदें शब्दाचें विशेषण
असून एथें हेत्वर्थतृतीयातत्पुरुष समास जाणावा, व हें
सारें तृतीयान्त पद जाणावें ) पदें - पदानें - चरणानें-
अर्थात् वामन अवतारीं आपल्या अडीच पदानें सर्व
त्रिभुवन व्यापून पुढें अर्ध पाऊल ठेवण्यास आधार
नाहीं ह्मणून तसेंच स्तब्ध राहिलें अशा पदानें,
त्रिजगदब्जकीलालसें - त्रिजगदब्ज, - त्रिजगत् - त्रि-
-भुवन - स्वर्ग पृथ्वि पाताल, हेंच कोणी अब्ज- कमल,
त्यास कीलालसें,- कीलाल- उदक[3], त्या सारिखें, ( एथें
हें सर्व पद अथवा वाक्यांश क्रियाविशेषण होय ) अर्थात्
कमलाला सर्वत्र जसें उदकानें, तसें या त्रिभुवनरूप कमलाला
या तुझ्या प्रथम चालून स्तब्ध राहिलेल्या पदानें, व्यापिलें,
अशा या तुझ्या पदानें चरित दाविजे - दाविजेतें -
दाखविलें

1 णःपुमान्बिंदुदेवेस्यात्भूषणेगुणवर्जिते ——

2 लीलाविलासक्रिययोः

अमर.

हेलालीलेत्यमीहावाःक्रियाःशृंगारभावजाः

——

3 पयःकीलालममृतंजीवनंभुवनंवनं

दाखविलें जातें; हा प्राचीन मराठींत वर्तमान काळीं कर्म-कर्तरि प्रयोग जाणावा; अर्थात् अशी चमत्कृति कोणीहि दाखविली नाहीं ती तुमच्या पदानें दाखविली. अथवा,— **तुमचियाचि लीलालसें पदें,**— तुमच्याच, ( एथे इतर सर्वांची व्यावृत्ति जाणावी ) **लीलालसें, लीला**- सर्व त्रिजगतीचें निर्माणपालनसंहरणरूप जी क्रिया, ती करून ‹ अलस - ह्मणजे स्तब्ध - अकर्तृ, अशा आपल्या ‹ **पदें**, - पद ह्म० स्थान - अर्थात् कूटस्थरूप ' तत्सत् ' या महावाक्यैंकरून विभाव्यमान जी आपली सत्ता,[1] तिणेंकरून, **त्रिजगदब्जकीलालसें**, - त्रिजगत्,- त्रिभुवनरूप - ' भूर्भुवःस्वः ' एतत्पदेंकरून ज्ञेय जी जगत्रयी, तद्रूप जें ‹ **अब्ज**-कमल, त्या कारणें ‹ **कीलालसें** - अमृता सारिखें, अ-

र्थात्

१ क्षर आणि अक्षर ह्मणून दोन पुरुष गीतेंत सांगितले आहेत, त्यांत सर्वभूतें क्षर होत, आणि पुरुष कूटस्थ अक्षर होय, त्याही क्षराक्षरा पलीकडेस तो पुरुषोत्तम.

द्वाविमौपुरुषौलोकेक्षरश्चाक्षरएवच ।
क्षरःसर्वानिभूतानिकूटस्थोऽक्षरउच्यते ॥ १६ ॥

उत्तमःपुरुषस्त्वन्यःपरमात्मेत्युदाहृतः ।
योलोकत्रयमाविश्यबिभर्त्यव्ययईश्वरः ॥ १७ ॥

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपिचोत्तमः ।
अतोऽस्मिलोकेवेदेचप्रथितःपुरुषोत्तमः ॥ १८ ॥

अ० १५.

*याज वर ज्ञानेश्वराची टीका फारच सरस आणि विशद आहे ती इष्ट असल्यास पाहावी.*

-र्थात् चिदानंदरूप जीवनकलेनें जसें प्रादुर्भूत होतें तसें. **चरित** - जगन्निर्माणपालनसंहरणरूप कार्य, **दाविजे** - दाविजेतें; अर्थात् सरोवरांत उदक स्थिर असून कमलाच्या प्रादुर्भावास जसें कारणभूत असतें, तसें आपण कूटस्थानीं अकर्ते असून प्रकृतिकृत जगत्प्रादुर्भावास आपली सत्ता कारण होय, असा या केकेच्या दोहों चरणांतील गुढार्थ जाणावा. तेव्हां असे आपण कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु समर्थ असतां - **मदुद्धरण मात्र कां तुह्मां जड दिसे,**— **मदुद्धरण**.- माझें, **उद्धरण**- उद्धार करणें. इतकें क्षुल्लक कार्य असतां तेंच कां तुह्मास इतकें अवघड दिसतें. हा विशेषोक्ति अलंकार जाणावा. **मर्त्य ही स्वकव्यसन वारिती,**— **मर्त्य**- सामान्य मनुष्यें, ही, स्वकव्यसन, -**स्वक** ह्म० आ-पले आश्रितादि पोष्यजन, त्याचें व्यसन- दुःख, तें **वारिती** - वारितात --दूर करितात; आणि पुनः **सेवा रितीं न करितीच**.— **सेवा**- पोष्यजनानी केलेली सेवा-चाकरी, **रिती**-रिकामी-निष्फळ, **न करितीच**- करित नाहीं-च; अर्थात् त्यांनीं केलेली सेवा निष्फळ होऊं देत नाहींत. अथवा, त्यांज पासून सेवा घेण्याची जी, **रिती**- वहिवाट, ती, **न करिती** - करित नाहींत; ह्मणजे एकदां कोणास आपलेंसें ह्मटलें ह्मणजे त्यांज पासून सेवा घेण्याचीहि वहिवाट नचालवितां केवळ परोपकारार्थ त्यांच्या दुःखाचें निवारण करितात; असा अर्थहि इष्ट असल्यास करावा. मग आपण इतके महान समर्थ व दयालु असून माझाच उद्धार करणें आप-ल्यास इतकें अवघड कां पडलें, असा एथे विस्मयार्थ जाणावा

एथें

एथें कोणी पंडित—'त्रिजगदब्जकीलालसें' हे पद कदाचित् मागील पदें या शब्दाचें विशेषण मानितील, परंतु माझ्या बुद्धीस तसें मानितां येत नाहीं; कारण, त्रिजगदब्जकीलालसें हें प्रथमान्त पद, पदें या तृतीयान्त पदाचें विशेषण होऊं शकत नाहीं. महाराष्ट्र व्याकरणाच्या नियमा प्रमाणें त्याचें विभक्त्यंत विशेष्याच्या योगानें सामान्यरूप असलें पाहिजे; 'चंद्रसें मुखें' हे जसें होऊं शकत नाहीं तद्वत्. ह्मणून माझ्या मतें 'त्रिजगदब्जकीलालसें' या वाक्यांशांत विभक्त्यंत श्लेष मानून या साऱ्या पदाचा 'दाविजे' या क्रियापदाशीं अन्वय करावा हें प्रशस्त दिसतें.

दयाब्दवळशीलतूंतरिनंचातकासेवका ॥
उणेंकिमपिभाविकांउबगशीलतूंदेवका ॥
अनन्यगतिकांजनांनिरखितांचिसोपद्रवा ॥
तुझेंचिकरुणार्णवामनधरीउमोपद्रवा ॥ २० ॥

यांत भगवंताचें दयालुत्व दृष्टांतेंकरून वर्णून, असा तूं दयालु माझी उपेक्षा करणार नाहींस अशी आणखी आपली आशा प्रकट करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— तूं दयाब्द वळशील तरि चातका सेवका किमपि उणें न, तूं देव भाविकां उबगशील का, अनन्यगतिकां जनां सोपद्रवा निरखितांचि, करुणार्णवा, तुझेंचि मन उमोप द्रवा धरी.

**तूं दयाब्द वळशील तरि चातका सेवका किमपि उणें न,**— **तूं,** **दयाब्द**- दयारूद **अब्द** ह्म० मेघ, होत्सातां जर **वळशील**-फिरशील, **तरि चातका सेवका किमपि उणें न,**—तर चातकरूप जो सेवक त्वद्भक्त त्यास कांहींएक उणें नाहीं; अर्थात् आह्मां चातकरूप सेवकां वर जर तूं दयारूप मेघ वळशील, तर मग आह्मास कांहीं उणें नाहीं, सर्व आमचे मनोरथ परिपूर्ण होतील. एथें हा रूपक अलंकार जाणावा. परंतु असें सांकेतिक बोलणें कशास पाहिजे, तूं ज्या पेक्षां दयालु आहेस त्या पेक्षां **तूं देव भाविकां उबगशील का,**- **तूं देव**- तूं असा दयालु देव, **भाविकां,**-

आह्मा

आह्मा सारिखे¹ **भाविक**-श्रद्धावान्- भोळेभाविक जे जन, त्यांस, **उबगशील का**- कांटाळशील¹- त्रासशील काय ?- अर्थात् भाविकांची तूं कदापि उपेक्षा करणार नाहींस. 'का' हें एथे काक्वर्थी अव्यय जाणावें- 'तूं जाशील का, येशील का, ते देतील का,' असा कोंकणांत **का** या अव्ययाचा काक्वर्थी प्रयोग प्रसिद्ध आहे. भाविकांची उपेक्षा नकरण्यां-त जें भगवंताचें दयालुत्व या काक्वर्थानें ध्वनित होतें, तेंच पुढें कवि वर्णितात-**अनन्यगतिकां जनां सोपद्रवा निरखितांचि**, - **अनन्यगतिकां**, - **अनन्यगतिक** - ज्यांस दुसरी गति नाहीं - अर्थात् ज्यांस शरण जावयास दुसरें स्थान नाहीं- निरुपाय -, निराश्रितें; **अशां जनां**- अशां अनाथ लोकांस, **सोपद्रवा** - उपद्रवयुक्त- अर्थात् पिडलेले, असे¹ **निरखतांचि**- पाहतांच, **करुणार्णवा, तुझेंचि मन उमोप द्रवा धरी**,— **करुणार्णवा**- हे दयासागरा, तुझेंच मन,

---

१ **उबगणें** हा बहुतकरून कंटाळणें- त्रासणें, अशा अर्थी प्राचीन ग्रंथभाषेंत अकर्मक धातु आढळतो; उदाहरण—

**मीउबगलें**सासुऱ्यांआतांमजमाहेरासन्यावो ॥

आणिआंगाजीवाचीसंपत्ती ॥ वेंचूनिकरीबाळाचीपाळती ॥
परिजिवें**उबगणें**हेस्थिती ॥ नपाहेमाये ॥ ५८९ ॥
ज्ञानेश्वरी, अ० १८.

सुवर्णरत्नाचियांराशी ॥ भव्यदक्षणादेतांऋषीं ॥
**उबगोनि**सांडिलेंधनाशीं ॥ नेताघेताअसेना ॥ ६ ॥
मुक्ते०, भारत, स० प०, अ० २.

मन उमोप - पुष्कळ, अशा द्रवा - द्रव - ओलावा- अर्थात् लाक्षणिक अर्थानें दयेचा ओलावा, त्यास धरी- परितें- घेतें; अर्थात् आह्मा सारिखे अनाथ जन पिडलेले पाहिले ह्मणजे तत्काळ तुझ्याच मनास दयेचा मोठा पाझर फुटतो.[2] अथवा, **उमोप** - हें एथें क्रियाविशेषण केलें असतांहि मला वाटतें चालेल; ह्मणजे- तुझेंच मन दयेच्या ओलाव्यास थोडें धरित नाहीं, तर उमोप- ह्मणजे पुष्कळ परितें, तुला दया फार येत्ये, असा अर्थ.

---

१ हा मराठींत ग्राम्य शब्द आहे. या पेक्षां **अमूप** या शब्दाचा अधिक प्रचार आहे असें मला वाटतें.

ज्यांचिया सुकृतराशी **उमोपा** ॥ तृणभग्नतां ब्रह्मांडाचिया मापा ॥
सर्वथा डरविना मारोपा ॥ गणना न व्हे कल्पांतीं ॥ १७९ ॥

मुक्तेश्वर, आदि प०, अ० १.

२ तुकोबानेंहि असाच देवाच्या दयेचा ओलावा मोठ्या प्रेमानें वर्णि- ला आहे;—

माझी विठ्ठलमाऊली प्रेमपान्हा पान्हावली ॥
कुर्वाळुनी लावी स्तनीं नव जेदुरी जवळुनी ॥
कलीपुरवी आळी नव्हे निष्ठुर कोंवळी ॥
तुका ह्मणे घास मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ॥

**कळींकरिसुनिर्मळींपरमउग्रदावानळीं ॥**
**तयांतअविशुद्धमींशलभजेविदावानळीं ॥**
**व्रणार्थपशुच्याशिरावरिवनींउभेकाकसे ॥**
**स्मरादिरिपुमन्मनींअहिनकाळभेकाकसे ॥ २१ ॥**

मागल्या केकेंत मी पिडलेला आहें ह्मणून कवीनीं दर्शविलें, तीच आपली पीडा एथें ते विशद करून दाखवितात.

**पदान्वय—** कळी सुनिर्मळीं नळीं परम उग्र दावा करि, तयांत मी अविशुद्ध, जेवि दावानळीं शलभ; मन्मनीं स्मरादि रिपु वनीं पशुच्या शिरा वरि व्रणार्थ काकसे उभे. भेका अहि काळ कसे न.

**कळी सुनिर्मळीं नळीं परम उग्र दावा करि.—** कळी- कलियुग- अर्थात् कलियुगांत जनास पापास प्रवृत्त करणारी जी तद्युगसंबंधी देवता ती, सुनिर्मळीं नळीं, सुनिर्मळ- अत्यंत निर्मळ - केवळ शुद्ध - पवित्र- असा जो नळ - नळराजा त्याच्या विषयीं, ( एथें ही विषय सप्तमी जाणावी,) **परम उग्र दावा करि,**- अत्यंत भयंकर, असा दावा- द्वेष, करितो. एथें ' करि ' हें ग्रंथीं भूतकाळाचें रूप जाणावें; अर्थात् इतका पवित्र नळ राजा असतां कळीनें त्याचा छळ केला हें सर्वांस माहित आहेच; **तयांत मी अविशुद्ध,—** त्यांत - अर्थात् तशांत, मी, तर केवळ अविशुद्ध- अत्यंत अपवित्र- अर्थात् मोठा पापी; मग मला तो कळी पिडितो यांत काय आश्चर्य असा एथील ध्वन्यर्थ.

यास

यास दृष्टांत ' **जेवि दावानळीं शलभ;** — जसा दावा ग्नींत, शलभ-टोळ; अर्थात् दावाग्नींत टोळ सांपडला असत जशी त्याची अवस्था तशी या कलियुगांत माझी. एथें ह उपमा अलंकार जाणावा. आणखी नला सारिखा मह प्रतापी आणि अत्यंत पवित्र, अशा राजास ज्या कळी छळिलें, तो, अत्यंत क्षुल्लक आणि दोषी जो मी, त्या मल छळितो, यांत आश्चर्य नाहीं; असा एथे आणखी हा काव्यार्थापत्तिहि अलंकार होतो. त्या छळाचा प्र-कार वर्णित होत्साते कवि दृष्टांतकरून ह्मणतात ' **मन्मनीं स्मरादि रिपु वनीं पशुच्या शिरा वरि व्रणार्थ का-कसे उभे,** — **मन्मनीं** - माझ्या मनाच्या ठायीं, **स्मरादि रिपु,- स्मर**- काम, आणि आदिपदेंकरून क्रोध मदादि जे आणखी मनाचे पांच ' **रिपु**- शत्रु ते, **वनीं**- वनांत, **पशु-च्या शिरा वरि**-पशूच्या मस्तका वर, **व्रणार्थ**- व्रण कर-ण्या करितां, **काकसे**-कावळ्या सारिखे, **उभे**- उभे आहेत; अर्थात् जसे वनांत हा मृतप्राय झालेला पशु केव्हां मरेल, आणि आह्मी यास केव्हां चोंचून याचें मांस खाऊं, ह्मणून हिंस्र पक्षी जे कावळे, ते जसे त्याच्या मस्तका वर बसून सा-कांक्ष असतात, तसे माझ्या मनाच्या अग्रभागीं कामक्रो-धमदमत्सरादि षड्रिपु बसून आह्मीं याचा केव्हां नाश करूं ह्मणून टपत आहेत. अथवा, एथें '**व्रणार्थ**' याच्या ठिकाणीं **व्रणार्त** असा पाठ असल्यास - ' व्रणानें पीडित - व्रण-युक्त - घायाळ,' हें पुढील पशुशब्दाचें विशेषण करावें. या दृष्टांतानें कवीनीं आपली पापानें झालेली क्षीण अव-

-स्था

-स्था दर्शवून आणखी आपल्या नाशा विषयीं कामक्रोधा-
-दिकांची तत्परताहि दर्शविली., एथेहि हा उपमा अलंकार जाणावा. कामक्रोधास शत्रु ह्मटलें तें त्यांचें शत्रुत्व आ-
-णखी दृष्टांतेंकरून कवि वर्णितात. **भेका अहि काळ कसे न,-** भेका, भेक- बेडूक त्यास, अहि- सर्प, **काळ-** मृत्यु- अर्थात् मृत्युभेद, **कसे न-** कसे नाहींत ? एथे काक्वर्थ जाणावा; अर्थात् बेडकास सर्प काळरूप शत्रु आहेतच; तात्पर्य, जसे बेडकास सर्प तसे माझ्या मनास कामक्रो-
-धादि षड्रिपु नाशप्रवृत्त आहेत असा अर्थ.[1]

---

१ एथें सर्प आणि बेडूक यांच्या दृष्टांतानें मृत्युद्वारा विषयनिमग्न पुरुषाच्या आकस्मिक नाशाचा बोध होतो; ह्मणून कामक्रोधादि शत्रूंपासून आपलें रक्षण करावें अशी भगवंतास प्रार्थना असावी. भागवतांतहि असेंच ह्मटलें आहे;—

प्रमत्तमुच्चैरितिकृत्यचिंतया प्रवृद्धलोभंविषयेषुलालसं ।
त्वमप्रमत्तःसहसाऽभिपद्यसे क्षुल्लेलिहानोऽहिरिवाखुमंतकः॥५०

चिरमिहवृजिनार्त्तस्तप्यमानोऽनुतापै-
रवितृषषडमित्रोऽलब्धशांतिःकथंचित् ।
शरणदसमुपेतस्त्वत्पदाब्जंपरात्मन्-
नभयमृतमशोकंपाहिमापन्नमीश ॥ ५८ ॥

भागव०, स्कं १०, अ० ५१.

**साधुजन** - भक्तजन, त्यांच्या ‘**आश्रमींचा**, [१]-आश्रमांतील, **वास** - राहणें, ही, **विदित असे** - माहीत आहे; अर्थात् साधुजनाच्या आश्रमीं कसें वागावें हेंहि मला माहित आहे; हीशब्देंकरून आणखी माझ्या अंगीं थोडे बहुत गुण आहेत, त्यांत हाहि एक गुण आहे, ह्मणून साधुजनांस मला विका, अर्थात् साधुजनाच्या स्वाधीन मला करा, असा एथील अर्थ;-याची परीक्षा पाहणें असल्यास ‘ **स्वयें गुण पहा**,- **स्वयें**-स्वतः, **गुण**-साधूंच्या संनिध वास करण्यास जे गुण पाहिजेत ते, **पहा** - परीक्षेस लावा; अर्थात् साधूंच्या सन्निध वास करण्यास जे योग्य गुण पाहिजेत ते माझ्या अंगीं आहेत किंवा नाहींत याची परीक्षा करा. **स्वयें** याच्या ठिकाणीं **सवें** असेंहि पाठांतर आढळतें, तेंहि प्रशस्त;- **सवें**- ह्मणजे लागलेंच- तत्काळ- प्रत्यक्ष, पहा; असा अर्थ तसें पाठांतर असतां समजावा. आणि मी आपल्या कसोटीस उतरल्या वर ‘ **मज सदाश्रमी चाकरा दया करा,**— **मज**, **सदाश्रमी** - निरंतर श्रम घेणारा, - अर्थात् अनाळशी- मेहनती,- अशा‘ **चाकरा**-चाकरा प्रत-चाकरा

वर,

---

१ आश्रमींचा- एथें आश्रम शब्द सप्तम्यंत असून त्या वरून पुढें चा हा तत्संबंध्यर्थी प्रत्यय झाला आहे. ‘ घरींच्यास खायास मिळत नाहीं आणि दारींचें मौजा करितात.’ अशीं पुष्कळ उदाहरणें आढळतात.

तेचविषयींचेंनिरूपण ॥ श्लोकार्द्धेंसुलक्षण ॥
स्वयेंसांगताहेश्रीकृष्ण ॥ साध्यसाधनविभागें ॥ ८४ ॥
तेचिअर्थींचाप्रश्न ॥ देवांसीपुसेआपण ॥
कोण्यायुक्तींदेहाभिमान ॥ जन्ममरणभोगवी ॥ ९३ ॥
एकना० भा०, अ०२२,

वर, दया करा - अर्थात् साधुजनांच्या स्वाधीन करा. पूर्वी पंधरावे केकेंत - ' निजप्रियजना कडे तरि हि दे हवाला जसी पडेल समजाविसी तसि करोत' ह्मणून जें कवीनें ह्मटलें होतें, त्याचीच एथें विशद अर्थानें पुनरुक्ति केली आहे. एथें कवीनें सत्समागमा विषयीं जो आपला इतका आग्रह दाखविला तो योग्य आहे, कारण, सत्समागमाचें फल फार मोठें सांगितलें आहे.[१]

---

१ योगवासिष्ठांत ह्मटलें आहे;—

नयज्ञतीर्थैर्नतपःप्रदानैरासाद्यतेतत्परमंपवित्रं ।
आसाद्यतेक्षीणभवामयानांभक्त्यासतामात्मविदांयदंग ॥

योगवासिष्ठ, निर्वाण प्र०, सर्ग ४१.

तुकोबानेंहि भगवद्भक्तांच्या समागमा विषयीं आपली अत्यंत आवड दाखविली आहे;—

जेगातीअखंडविठ्ठलाचेगीत त्यांचेपायींचित्तठेवीनमी ॥
जयासींआवडेविठ्ठलाचेंनाम तेमाझेपरंमप्राणसखे ॥
जयासींआवडेविठ्ठललोचनीं त्याचेंपायवणीस्वीकारीन ॥
विठ्ठलासींजिहींदिलासर्वभाव त्यांच्यापायींजीवठेवीनमी ॥
तुकाह्मणेंरजहोइनचरणींचा ह्मणवीतित्यांचाहरिचेदास ॥५॥

**धनापरिजनाघरींतुमचियाउणेंकायसें ॥**
**नलाभमणिहेमभूपतिसजोडिल्याआयसें ॥**
**परिप्रभुहिसंग्रहींसकलवस्तुलाठेविती ॥**
**गुणानह्मणतांउणाअधिकआदरेंसेविती ॥ २३ ॥**

माझे भक्तजन बहुतकरून निष्कांचन असतात; तेव्हां ते तुला काय मोल देऊन घेतील, आणि तूं हि निष्कांचन तेव्हां त्यांस तुझा उपयोग तरीं काय, अशी मागल्या केके वरून भगवंताची आशंका आपल्या मनांत आणून कवि तिचें समाधान करित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय—** तुमंचिया परिजना घरीं धना कायसें उणें, मणिहेमभूपतिस आयसें जोडिल्या लाभ न, परि प्रभु हि सकल वस्तुला संग्रहीं ठेविती, गुणा उणा न ह्मणतां अधिक आदरें सेविती.

तूं ह्मणतोस किं मी निष्कांचन आहें, ह्मणून त्यां तुला उतारा करितां आपल्या भक्तजनांस विकावें, तर माझे भक्तजनहि तुझ्याच सारिखे निष्कांचन आहेत, तेव्हां ते काय तुझें मोल देतील, असें कदाचित् आपण मला पुसाल तर कवि ह्मणतात ऐका ‘ **तुमंचिया परिजना घरीं धना कायसें उणें,—** तुमच्या, **परिजना** - सेवकजनाला, **घरीं**- आपल्या घरीं, **धना** - धनाला, **कायसें** - काय, **उणें**; तुमच्या भक्तांच्या घरीं द्रव्याचा काय तोटा आहे ? अर्थात् कांहीं तोटा नाहीं. लक्ष्मीपति तुह्मी तुमच्या सन्निध वास करणाऱ्या

जनांस

जनांस द्रव्याची न्यूनता केवळ असंभाव्य असा एथें परिजन-शब्देंकरून कवित्दद्गतार्थ दिसतो. अथवा, ( महाराष्ट्र पद्यांत घरीं इ० सप्तम्यंत शब्दा वरून मागील षष्ठ्यंत प्रत्ययाचा क्वचित् लोप होऊन तन्निमित्त नुसतें सामान्यरूपच राहतें, असाहि नियम आढळतो; त्या वरून ) एथें '**परिजना घरीं**' ह्मणजे '**परिजनाच्या घरीं**,' असा अर्थ केला असतां-हि केवळ अप्रशस्त होत नाहीं.[1] अथवा, समीपता मुक्ति ज्यांस तुह्मीं दिली अशां तुमच्या भक्तांचा वास तुमच्या घरीं असतां, मग तेथें त्यांस प्रकाशांत अंधःकारा प्रमाणें दरिद्रतेचा केवळ असंभव; ह्मणून तुमच्या घरीं तुमच्या भक्तांस द्रव्याची किमपि न्यूनता नसतां उलटी त्याची विपुलता आहे; मग अशा तुमच्या श्रीमान्[2] भक्तांस मला विकत देण्यास तुह्मास काहीं अडचण आहे असें मला दिसत नाहीं. या वरहि कदाचित् आपण ह्मणाल कि जर ते श्रीमंत आहेत तर ते तुज सारिखा निष्कांचन

१ तुह्माघरींगाईह्मशी संतांघरींउंदिरघुशी
तुह्माघरींसोनेंनाणें संतांघरींपरळभाणें
तुह्माघरींवाडेघोडे संतांपायींनमिळतीजोडे

तुकाराम.

एथेंहि ' तुह्मा घरीं, ' ' संतां घरीं, ' ' संतां पायीं, ' यांत याच अर्था प्रमाणें प्रयोग जाणावा.

२ तशीच भगवद्भक्तांची, श्रीमत्ताहि तुकोबानें पुढल्या अभंगांत दाखविली आहे.

एकांतींलोकांतींकरूंगदारोळ लेशतोहीमळनाहींयेथें ॥ १ ॥
घ्यावेंद्यावेंआह्मीआपुलीयेसत्ता नदेखोंपुसतादुजाकोण्ही॥२॥
भांडाराचीकिल्लीमाझेहातींआहे पाहिजेतोपाहेंवानयेथें ॥ ३॥
तुकाह्मणेंआह्माविश्वासाच्याबळें ठेविलेंमोकळेंयेथेंदेवें ॥ ४ ॥

निष्कांचन गुणहीन अशास कशा करितां आपल्या जवळ ठे-
वितील ? तर ऐका ' **मणिहेमभूपतिस आयसें जोडिल्या लाभ न,— मणिहेमभूपतिस,- मणि**-रत्नादि, **हेम** - सोनें, **भू** - भूमि, यांचा जो ' **पति** -स्वामी, त्यास, अर्थात् ज्याज-
पाशीं रत्नसुवर्णादि द्रव्याची समृद्धि आहे त्यास, **आय-**
**-सें**[1] - लोखंड, **जोडिल्या**- जोडिल्यानें-मिळाल्या वर, **लाभ न**— लाभ नाहीं; हें खरें आहे ' **परि प्रभु हि सकल वस्तुला संग्रहीं ठेविती,— परि** -परंतु - तथापि, **प्रभु** - समर्थ - अर्थात् श्रीमंत लोक आहेत ते, **सकल वस्तुला** - साऱ्या वस्तूंला - अर्थात् लोखंडा पेक्षांहि अत्यंत हलक्या मोलाच्या वस्तु तृणपाषाणादि त्यांस ही, **संग्रहीं ठेविति**- अर्थात् आपल्या संग्रहांत ठेवितात; आणि अशा वस्तु संग्रहीं ठेऊनहि त्यांच्या ' **गुणा उणा न ह्मणतां अधिक आदरें** सेविती,

---

१ लोहोऽस्त्री शस्त्रकं तीक्ष्णं पिंडकालायसायसी
अश्मसारोऽथ मंडूरं सिंहाणमपि तन्मले
सर्वस्यात्तैजसं लोहं विकारस्त्वयसः कशी

अमर.

एथें **आयसें** हें ग्रंथभाषे प्रमाणें **आयस** शब्दाचें नपुंसकलिंगीं क-
-र्मणिप्रथमेचें रूप जाणावें. अथवा, **आयसें** ह्मणजे' आयसानें' असें तृतीयेचें रूप मानिलें असतांहि चिंता नाहीं. परंतु असें तृतीयेचें रूप मानिल्या वर प्रथम तें, 'जोडिल्या' हें उभयविध क्रियापदास सकर्मक मानि-
-लें असतां त्याचें कर्म, आणि अकर्म मानिलें असतां त्याचा कर्त्ता, करून आणि त्याचा अध्याहार करून मग तें तृतीयेचें रूप केलें पाहिजे.

**सेविती, — गुणा** - गुणाला, **उणा**[1] - उणा असें, **न म्ह**-णतां, उलटें त्यांस [2]**अधिक** - अत्यंत, **आदरें** - आवडीनें, **सेविंती** - सेवन करितात; अर्थात् त्यांचा उपयोग करि-तात. सारांश जे शोकी आणि समर्थ असे लोक आहेत, ते कोणत्याहि वस्तूच्या गुणाचा अनादर नकरितां तत्तद्गुणा-चा उपयोग करण्या करितां सर्व वस्तु आपल्या संग्रहीं ठेवितात; अर्थात् तुमचे भक्तजन मी दरिद्री व गुणहीन आहें ह्मणून माझी उपेक्षा करणार नाहींत, उलटें याच कारणानें आपल्या दयेनें माझा अधिक उत्सुकतेनें अंगीकार करितील, या स्तव तुह्मीं निःसंशय मला त्यांच्या स्वाधीन करा असा अर्थ.

---

१ एथें ' **गुणा**' या आकारान्त पदाशीं मिळविण्या करितां ' **उणा** ' या आकारान्त पदाची शब्दालंकारार्थ योजना जाणावी. उणा या शब्दाचा एथें विशेषणा प्रमाणें प्रयोग केला आहे. ' मी तीस भली ह्मणतों,' 'तो त्यास दांडगा मानितो, ' अशीं आणखीं या प्रकारचीं उदाहरणें, जाणावीं.

२ भर्तृहरिनीतिशतकांतहि थोरांची अशीच गुणग्राहकता सांगितली आहे.—

मनसिवचसिकायेपुण्यपीयूषपूर्णा -
स्त्रिभुवनमुपकारश्रेणिभिःप्रीणयंतः ।
परगुणपरमाणुंपर्वतीकृत्यनित्यं
निजहृदिविकशंतःसंतिसंतःकियंतः ॥ १५ ॥

दिसेंह्मणुनिशाश्वतप्रकृतिरंकमींकायहो ॥
प्रसन्नतुमचेबरेंमजवरींप्रभोपायहो ॥
क्षणत्यजुनिइंदिराबृहदुरोजसंगाधरा ॥
शिरींपदमिळोसखासमसुशीलगंगाधरा ॥ २४ ॥

मागल्या केकेंत कवीनीं आपलें दैन्य उपेक्षार्ह नाहीं ह्मणून दर्शविलें, आतां एथें तेंच आपलें दैन्य भगवदनुग्रहास पात्रभूत असें दर्शवित होत्साते कवि प्रार्थितात.

पदान्वय— प्रभो, मीं शाश्वतप्रकृतिरंक दिसें ह्मणुनि कायहो बरें तुमचे पाय मज वरी प्रसन्न हो, इंदिराबृहदुरोजसंगा क्षण त्यजुनि शिरीं पद धरा, सुशील गंगाधरा सम सखा मिळो.

**प्रभो,** — अहो प्रभो, **मीं शाश्वतप्रकृतिरंक दिसें ह्मणुनि कायहो बरें तुमचे पाय मज वरी प्रसन्न हो,** — प्रभो, **मीं शाश्वतप्रकृतिरंक दिसें,** - मीं, असा शाश्वतप्रकृतिरंक - निरंतर प्रकृतीनें रंक - निरंतर स्वाभाविक दरिद्री - जन्मदरिद्री, **दिसें** - दिसतों, **ह्मणुनि कायहो बरें** - ह्मणुनच कायहो[1] बरें - ह्मणूनच काय

1 कायहो, हें एक पद अव्ययरूप मानिलें असतां अधिक गोड लागतें— 'कायहो तुह्मी आतां असे निष्ठुर झालां,' 'कायहो तो चमत्कार,' इत्यादि वाक्यांत 'कायहो' हें सारें विस्मयार्थदर्शक अव्यय जाणावें. तसेंच—'तुह्मी आतां असे निष्ठुर झालां कायहो' ह्मणजे 'निष्ठुर झालां असें मला वाटलें', असा ईषत्स्वीकृतीचाहि अर्थ होतो. अथवा, यांतील 'हो' ह्मणजे 'अहो' हें निराळें पद काढून त्याचा अन्वय 'प्रभो' या संबोधनाशीं करावा.

काय जणु, तुमचे पाय - हे 'तुमचे चरण, मज वरी प्रसन्न हो, - मज वर प्रसन्न, - हो- होओत;'[1] एथें प्रार्थनेचा अर्थ जाणावा; मीं असा जन्मदरिद्री दिसतों ह्मणूनच काय बरें महाराज या तुमच्या पायांनीं मज वर प्रसन्न व्हावें, अर्थात् ह्मणूनच जणुं त्यांणीं व्हावें, असा एथें ध्वन्यर्थ निघतो.[2] ( एथें शाश्वतप्रकृतिरंक या पदांत 'शाश्वत' हें पद 'प्रकृतिरंक' ह्म॰ प्रकृतिसिद्ध रंक अर्थात् प्रकृतीनें केलेला रंक, असा एथें तृतीयातत्पुरुष अथवा मध्यमपदलोपी समास करुन त्यांतील लुप्त जें 'सिद्ध' धातुसाधित, त्याचें क्रियाविशेषण करावें हा मला उत्तम पक्ष दिसतो. यद्यपि प्रकृतीनें केलेला मी शाश्वत रंक आहें खरा, तथापि मुळीं प्रकृतिच अशाश्वत आहे, तेव्हां तिणें केलेला जो मी रंक त्या माझें तें रंकत्वहि अशाश्वत, भगवदनुग्रहकालमर्याद त्या रंकत्वाची स्थिति, अशी अर्थ-निष्पत्ति

---

१ 'हो' हें ग्रंथभाषेंत आज्ञा अर्थी अथवा विध्यर्थी एकवचनाचें आणि अनेकवचनाचें सारिखेंच रूप समयविशेषीं होतें. हो- ह्म॰ होओ, यांतील शेवटील ओ पहिल्या ओंत मिळून जातो. व्याकरणदृष्टीनें पाहिलें असतां होओ हेंच रूप शुद्ध होय. अलिकडेस त्याचा प्रघात न आढळतां होऊ अशा रूपाचाच प्रघात आढळतो तो विधिभंजक जाणावा. पहा माझें महाराष्ट्र व्याकरण, आवृत्ति ३, नियम ४७०, पृ॰ १९१.

२ थोरांचें लक्षण असेंच सांगितलें आहे, किं जितका दीन अनाथ तितका त्यांचे दयेस अधिक पात्र;

जेंकां रंजिलें गांजिलें त्याशीं ह्मणें जो आपुलें ॥
तोचि साधु ओळखावा देव तेथेंचि जाणावा ॥

तुकाराम.

-निष्पत्ति कवि न्हृद्गतार्थास अनुकूल जाणून, 'शाश्वत' हें प्रकृतीचें किंवा प्रकृतिसिद्ध जो रंक त्याचें विशेषण नकरितां वर सांगितल्या प्रमाणें क्रियाविशेषण केलें असतां माझ्या विचारास अधिक प्रशस्त दिसतें.) अथवा, एथे ' **बरें** ' हें केवलप्रयोगी अव्यय नकरितां, ' **बरे** ' असा शब्द- 'पाय' या शब्दाचें विशेषण मानून, 'प्रसन्न हो ' या पदाशीं त्याचा अन्वय करावा. 'तुमचे पाय मजवर बरे प्रसन्न हो- -ऊत' ह्मणजे यथेच्छ प्रसन्न होऊत, असा अर्थ करावा. त्या पायांचा महिमा वर्णित होत्साते कवि प्रार्थितात- **इंदिराबृहदुरोजसंगा क्षण त्यजुनि शिरीं पद धरा,**—इंदि- -राबृहदुरोजसंगा, - इंदिरा- लक्ष्मी[1] तिचे जे बृहत् - स्थूल, उरोज - स्तन, त्यांशीं जो आपले पायांचा संग- संलग्नता -योग, त्यास, क्षण - क्षणभर, त्यजुनि - टाकून, शिरीं- अर्थात् माझ्या मस्तका वर, पद-ते आपले पाय, धरा-ठेवा. एथें कवींनीं 'इंदिराबृहदुरोजसंग' या पदानें भगवच्चरण महिमा वर्णून, बृहदुरोजत्वानें लक्ष्मीचेंहि सौंदर्य सुचविलें.[2] लक्ष्मी आपल्या स्तनानें भगवान् विष्णूच्या चरणकमलाचें मर्दन करित आहे असें वर्णन प्रसिद्ध आहेच. एक क्षणभर

मी

---

१ इंदिरालोकमातामाक्षीरोदतनयारमा

अमर.

२ स्तनाचें स्थूलत्व सौंदर्याचें अंग ह्मणून या देशांत शृंगाररसप्रधान काव्यांत फार वर्णिलें असतें. जयदेव कवि गीतगोविंदांत ह्मणतात;—

धीरसमीरेयमुनातीरेवसतिवनेवनमाली ।
गोपीपीनपयोधरमर्दनचंचलकरयुगशाली. ॥

मी आपले पाय तुझ्या मस्तका वर ठेविल्यानें तुझें काय क-ल्याण होईल ह्मणून कदाचित् आपण पुसाल, तर तित-क्यानेंच कवि ह्मणतात मी आपल्यास केवढी मोठी पदवी मिळविण्याची आशा धरितों ती ऐका ⸍ **सुशील गंगाधरा सम सखा मिळो,— सुशील,**- चांगलें आहे ⸍ शील- स्वभाव, ज्याचा असा जो ⸍ **गंगाधर** - महादेव, त्या ⸍ **स-म**- बराबर, **सखा** - हा मी जो आपला सखा तो, **मिळो**- मिळून जाऊ-अर्थात् गंगाधरा बराबर होऊ; आपण चरणा-च्या ठायीं गंगा धारण केली आहे ह्मणून जगप्रसिद्ध वार्ता आहे, तेव्हां ते चरण आपण माझ्या मस्तकीं एक क्षणभर जरीं ठेविले, तरीं तेणेंकरून ती गंगा माझ्या मस्तका वर पडून मीहि गंगाधर होईन; अर्थात् तितक्या आपल्या अनुग्रहानें माझ्या अंगीं महादेवाची योग्यता येईल, या पेक्षां अधिक त्यां काय मागावें ? इतका थोर आपल्या चरणाच्या क्षणिक अनुग्रहाचा प्रताप होय, असा एथील कविन्द्रकृत भावार्थ जाणावा.

---

आणखी तेच दुसऱ्या गीतांत ह्मणतात.

पीनपयोधरभारभरेणहरिंपरिरभ्यसरागं ।
गोपवधूरनुगायतिकाचिदुदंचितपंचमरागं ॥

तसेंच भर्तृहरि आपल्या शृंगारशतकांत कामिनीगर्हणप्रकरणीं ह्मणतात.

उन्मीलत्त्रिवलीतरंगनिलयाप्रोत्तुंगपीनस्तन-
द्वंदेनोद्यतचक्रवाकमिथुनाकाराम्बुजोद्भासिनी
कांताकारधरानदीयमभितःक्रूराशयानेष्यतें
संसारार्णवमज्जनंयदिजनादूरात्परंत्यज्यतां ॥

अथवा,- 'इंदिराबृहदुरोजसंगा' क्षणभर सोडून, 'इंदिरा-बृहदुरोजसंगा' - इंदिरेचे जे बृहदुरोज त्यांचा आहे, संग-संलग्नता, ज्यांस असे जे आपले पाय, अशा बहुव्रीहि समासानें तें सारें पद **पाय** याचें विशेषण करून ते पाय माझ्या मस्तका वर ठेवा, असा अन्वय केला असतांहि बाध येणार नाहीं. अशी 'इंदिराबृहदुरोजसंगा' या पदाची द्विरुक्ति करून एकदां 'त्यजुनि' या सकर्मक धातुसाधिताचें कर्म, आणि एकदां त्याच पदाचा बहुव्रीहि विग्रह करून तें सारें पद 'धरा' या क्रियापदाचें कर्म मानण्याची पद्धति काव्यसरणीस केवळ प्रतिकूळ होईल असें मला वाटत नाहीं. अशीं उदाहरणें काव्यांत आढळतात. या प्रमाणें पदान्वय केल्या वर मग चवथ्या चरणांतील शब्द 'पद' याचा अर्थ '**पदवी**' असा करून, 'सुशीलगंगाधरा सखा सम पद मिळो' ह्मणजे सुशील जो, गंगाधर- महादेव, आपला - सख-मित्र, त्या- **सम** - सारिखें, **पद** - पदवी, **मिळो** - मला प्राप्त होऊ, असा अर्थान्वय करावा. अथवा, 'पद' या शब्दाचा एकदां पाय असा अर्थ करून, तें 'धरा' याचें कर्म करून, पुनः त्याच 'पद' शब्दाचा पदवी असा अर्थ करून तो 'पद' शब्द 'मिळो' या क्रियापदाचा कर्ता करावा.

**प्रभुस्तुतिनठाउकीपरितिच्यामहाकामुका ॥**
**मलाकृपणमारितोबहुसकामहाकामुका ॥**
**ह्मणामनिअसेंकसेंप्रथमनीटयेलेंकरा ॥**
**हळूहळुपटुस्वयेंसुपंथलावियेलेंकरा ॥ २५ ॥**

मागील केकेंत कवीनीं महादेवाची योग्यता आपल्यास मिळण्या विषयीं प्रार्थनेंत सुचविलें खरें, परंतु हें आपलें अत्यंत औद्धत्य जाणून आपल्यास स्तुतीच करितां येत नाहीं अशी एथें पड घेऊन कवि ह्मणतात.

**पदान्वय**—प्रभुस्तुति ठाउकी न, परि तिच्या महाकामुका मला कृपण मुका बहुसकाम हाका मारितो, असें मनिं ह्मणा, लेंकरा प्रथम नीट कसें ये, हळूहळु पटु स्वयें सुपंथिं लावियेलें करा.

माझ्या पूर्वोक्त स्तुती वरून कदाचित् आपल्या मनांत येईल कि- **प्रभुस्तुति ठाउकी न,** - प्रभुस्तुति - आपल्या स्वामीची स्तुति, ठाउकी नाहीं- आपल्या स्वामीची स्तुति कशी करावी हें तर मुळींच तुला ठाऊक नाहीं; **परि तिच्या महा कामुका मला कृपण मुका बहुसकाम. हाका मारितो,**— **परि**- परंतु- मग, **तिच्या**- त्या स्तुतीच्या, **महा कामुका मला**- मोठ्या कामुकाला मला, **कृपण** - दीन - स्तुति करण्यास शक्तिहीन, आणि **मुका**- ज्यास बोलतां येत नाहीं असा, **सकाम**- सकाम होत्सातां- मनांत मोठी हौंस धरून, **हाका मारितो**—

किंकाळ्या

किंकाळ्या फोडितों; अर्थात् आपल्या प्रभूची स्तुति कशी करावी हें ठाऊक नसतां मीं जो भगवान् स्तुतिप्रिय त्या मला ह्या कृपण- ह्मणजे स्तुति करायास शक्तिहीन, त्यांत आणखी मुका,- शब्दाचा नीट वर्णोच्चारहि ज्याच्यानें स्पष्ट करितां येत नाहीं, असा असून सकाम- ह्मणजे ती माझी स्तुति करण्याची मोठी हौस मनांत धरून, उगीच हाका मारितो- ह्मणजे मुका असल्यानें उगीच किंकाळ्या फोडितों; **असें मानि ह्मणा,**— कवि भगवंतास ह्मणतात, असें- मीं मुका उगीच किंकाळ्या फोडितों असें, कदाचित् आपल्या **मानि** ह्मणा- मनांत आणाल; तर कवि या आशंकेचें समाधान करित होत्साते ह्मणतात **लेंकरा प्रथम नीट करें ये,**— लेंकराला पहिल्यानेंच नीट करें येतें - अर्थात् शिकविल्या वांचून मुलाला पहिल्यानेंच कोणतेंहि काम नीट येत नाहीं; ह्मणून **हळूहळु पटु स्वयें सुपथि लावियेलें करा,**— हळुहळु पटु - नीट कौशल्यानें, ( हीं एथें क्रियाविशेषणें जाणावीं ) स्वयें - आपण स्वतः, सुपथि- चांगल्या मार्गास, लावियेलें - लाविलें, असें **करा**- तुह्मी करा- अर्थात् मीं या लेंकरास हळुहळु नीट चांगल्या मार्गास लाविलें असें तुह्मीं करा; ह्मणजे आपली स्तुतिहि करायास मला आपणच शिकवा, असा एथें मला कवित्हृद्रतार्थ दिसतो.

**जनींतरिअसेंअसेशिशुहिजेमुखेंवर्णवी ॥**
**पितापिउनितेभुलेमधुरतासुखेंवर्णवी ॥**
**मनाजरिनयेगुरुक्तहिह्मणेकटुप्रायशा ॥**
**दयानिधितुह्मांपुढेंजनकथाअशाकायशा ॥ २६ ॥**

मागल्या केकेंत सांगितल्या प्रमाणेंच वडील आपल्या बालकांस मोठ्या प्रेमानें शिकवितात, असा लोकांत व्यवहार आढळतो, हें दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— जनीं तरि असें असे, शिशु हि मुखें जे वर्ण वी, ते पिउनि पिता भुले, मधुरतासुखें वर्णवी, जरि मना नये, प्रायशा कटु गुरुक्त हि ह्मणे, दयानिधि, अशा जनक-था तुह्मां पुढें कायशा.

आपल्या मुलाला सुपंथास लावून त्यास शिकविणें इतकेंच नाहीं, परंतु त्या मुलाची अज्ञानदशा पाहून त्यास शिकविण्यांत आनंद मानून घेण्याचाहि लोकव्यवहार आढळतो, तो कवि एथें सांगतात- **जनीं तरि असें असे,**— जनांत हि असेंच आहे; किं ‘**शिशु हि मुखें जे वर्ण वी,**- **शिशु**- लहान बालक, हि, **मुखें**- आपल्या मुखानें, **जे वर्ण**- जीं अक्षरें, **वी**- वितो, - अर्थात् उच्चारितो, **ते पिउनि पि-ता भुले,** —**ते** -ते वर्ण, **पिउनि**- प्राशन करून- अर्थात् श्रवण करून, **पिता**-’ बाप, **भुले**- भुलतो- अर्थात् मोहित होतो. एथें मधुरता शब्दाचा पुढें प्रयोग आहे, ह्मणून वर्णा-च्या ठायीं मधुररसात्मकता गृहित असल्यानें तत्प्राशनक्रि-याहि

-याहि अविरोधित जाणावी. तसेंच **विणें ह्मणजे स्रावणें,** या क्रियेचा एथें प्रयोग केल्यानेंहि कवीनीं त्या वर्णांच्या ठायीं रसात्मकता स्पष्ट दर्शविली आहे, ह्मणून आणखी त्या रसात्मक वर्णांचें एथें प्राशनविधान प्रशस्त होय. मागें हि चौथ्या केकेंत कवीनीं -‘ विषाद धरिला ह्मणो न सुरभी विषक्षीर वी ’ यांत ‘ वी’ या क्रियेचा रसात्मकपदार्थप्रस्रवण- -दर्शनार्थ प्रयोग केला आहे. या प्रमाणें त्या लहान बालका- च्या मधुर शब्दाच्या श्रवणानें मोहित होऊन तो पिता‘ **मधु- रतासुखें वर्णवी,** — त्या बालकानें उच्चारिलेल्या वर्णां- -च्या माधुर्यसुखानें त्या बालका कडून आणखी आणखी तेच शब्द, **वर्णवी**- वर्णवितो- बोलवितो. ( एथे हें प्रयोजक क्रियापद जाणावें ). अथवा, ती जी बालशब्दजन्य मधुरता, ती‘ **सुखें** - सुखानें - यथेच्छ, वर्णवी - बोलवी- पुनःपुनः बोलवी; असा अर्थ केला तरीं चालेल. **जरि मना नये,**— जरीं त्या अज्ञान बालकाचे ते शब्द पित्याच्या मनास येत नाहींत- अर्थात् त्या शब्दांची अर्थसंगती त्यास आवडत नाहीं; आणखी ‘ **प्रायशा कटु गुरूक्त हि ह्मणे,**- **प्राय- शा**- बहुतकरून, **कटु**- कडू - असे जे त्या बालकाचे शब्द त्यांस, **गुरूक्त हि ह्मणे,**— **गुरूक्त**-चांगलें ह्मटलें, हि ह्मणतो; ह्मणजे त्या शब्दांच्या अर्थाच्या विचारा वरून त्या बाल- -काचे प्रायशः ते शब्द कडू असून जरीं त्या पित्यास संतो- -षवित नाहींत, तरीं तशा कडु शब्दांस, अर्थात् अर्थहीन बडबडीस हि,तो पिता, मुला त्वां फार सुंदर ह्मटलें असें आ- -णखी ह्मणून, त्या बालकाच्या मुखानें पुनः पुनः ते शब्द बोलवितो;

बोलवितो;[१] अथवा,-**कटुप्रायशा,**-कटुप्राय अशा- अर्थात् अशा शब्दांस, **गुरूक्त हि ह्मणे,** असा अन्वय केला असतां हि चांगला. सारांश कवि भगवंतास ह्मणतात,-**दयानिधि**- हे दयासागरा, **अशा जनकथा तुह्मां पुढें कायशा,**— **अशा**- ही जी म्यां दृष्टांतानें गोष्ट सांगिली अशा, **जनकथा**- लोकांच्या गोष्टी, **तुह्मां पुढें कायशा,**— तुमच्या पुढें काय होत. अथवा, एथे **दयानिधि** हें संबोधन न करितां- 'दयानिधि जे तुह्मी त्या तुह्मा पुढें अशा कथा कायशा' असा अन्वय करावा. अर्थात् तुह्मीं दयासागर अहां तेव्हां जरीं ही माझी वेडीबागुडी स्तुति आहे, तरीं तिचें आपण ग्रहण कराल असा मला भरवसा आहे, असा एथें कविद्धत अर्थ जाणावा.[२]

---

१ गुरु शब्दाचा 'चांगला' 'मनोरम' असाहि अर्थ होतो, यास प्रमाण -

बाढव्याढबहुगुरुवामनवृंदारकातिशये

भागवतांतहि नारदानें व्यासास अशाच अर्थानें ह्मटलें आहे.

तद्वाग्विसर्गोजनताऽघविप्लवो
यस्मिन्प्रतिश्लोकमबद्धवत्यपि ।
नामान्यनंतस्ययशोंकितानि
यत्शृण्वंतिगायंतिगृणंतिसाधवः ॥

स्कं १, अ० ५, श्लो० ११.

ज्ञानेश्वरानींहि ह्मटलें आहे—

जैसास्वभावमायबापांचा ॥ अपत्यबोलेंजरींबोबडी
वाचा ॥ तरींअधिकतयांचा ॥ संतोषआथीं ॥ ६४ ॥

ज्ञा०, अ० १.

या केकेंत प्रायशा – हा जरीं ' प्रायशः ' या शब्दाचा अपभ्रंश आहे, तथापि कवीस तोच प्राकृत शब्द एथें इष्ट दिसतो असें मला वाटतें; कारण, पुढल्या चरणांत ' कायशा ' या शब्दांत ' अशा ' हें निराळें पद निघतें, त्याच अर्थी 'कटुप्रायऽशा- कटुप्राय अशा, यांत ' अशा ' शब्दाची द्विरुक्ति आपल्या कवीच्या काव्यसरणीस अनुकूल नहोतां प्रतिकूल होत्ये; ह्मणून मला वाटतें ' प्रायशा ' हा शब्द निराळा काढिला असतां बरें.

---

तुकोबानेंहि भगवंताची स्तुति करितांनां असेंच ह्मटलें आहे—

माझ्याबोबडियाबोला ॥ चित्तद्यावेंगाविठ्ठला ॥
मजहांसतीललोक ॥ परिमीगाईननिःशंक ॥

अतर्क्यमहिमातुझागुणहिफारबाहेविधी ॥
श्रुतिज्ञहिह्मणेसदास्तविलआमुचीकेविधी ॥
तरीजनयथामतिस्तवुनिजाहलेसन्मती ॥
स्तवार्थतुझियातुझासमकवीकधींजन्मती ॥२७॥

भगवत्स्तव करणें मनुष्याच्या बुद्धीस अशक्य असें दर्शवित होत्साते कवि प्रार्थितात.

**पदान्वय**—तुझा महिमा अतर्क्य, गुण हि फार, विधि -बाहे; श्रुतिज्ञ हि सदा ह्मणे आमुची धी केवि स्तविल; तरी यथामति स्तवुनि जन सन्मती जाहले; तुझिया स्तवार्थ तुझा सम कवी कधीं जन्मती.

कवि भगवंतास ह्मणतात- **तुझा महिमा अतर्क्य**,—तुझा, **महिमा**- मोठेपणा, **अतर्क्य**-तर्क करायास अशक्य,-तुझ्या महिम्याचा[1] तर्कहि करितां येत नाहीं - अर्थात् तुझा महिमा इतका आहे कि त्याचा विचार करायास मति कुंठित होत्ये; तसे तुझे **गुण हि फार**, —गुण हि अनंत, ह्मणून **विधि बाहे**,—विधि- ब्रह्मदेव, **बाहे**-हाका मारितो-अर्थात् मोठ्यानें

---

१ महिमा, गरिमा, लघिमा, इत्यादि जे इमनिच्प्रत्ययान्त मु-ळचे संस्कृत शब्द त्यांचा एथे कवींनीं मूळ संस्कृता प्रमाणें पुल्लिंगीं प्रयोग केला आहे; परंतु मराठींत क्वचित् हे शब्द स्त्रीलिंगींहि मानितात. वामन ह्मणतात;—

जीनगायहरिचेमहिमेला तोअसेजितचियामहिमेला

मोठ्यानें सांगतो; आणखी ⁄ **श्रुतिज्ञ हि सदा ह्मणे आमुची धी केवि स्तविल, —** श्रुतिज्ञ – वेदतत्व जाणणारा, हि निरंतर ह्मणतो, किं ⁄ आमची, **धी** – बुद्धि, तुला कशी ⁄ स्तवील, – अर्थात् तुझी स्तुति करायास मोठा वेदतत्वज्ञहि समर्थ नाहीं.[१] **तरीं यथामति स्तवुनि जन सन्मती जाहले,—** तरीं – जरीं वस्तुतः तुझी स्तुति करायास कोणी समर्थ नाहीं तरीं, **यथामति** – आपल्या बुद्धीच्या शक्ती प्रमाणें, तुला ⁄ स्तवून, **जन** – व्यासवा-ल्मीकादि कविजन, **सन्मती** – उत्तम मतीचे, असे ⁄ झाले. एथें कवीनीं भगवत्स्तवनाचें फलहि दर्शविलें.[२] परंतु ⁄ तु-**झिया स्तवार्थ तुझः सम कवी कधीं जन्मती, —** तुझिया

---

१ जेथे शब्दच कुंठित होतो, तेथे भगवत्स्तुति यथार्थ करणें परम अशक्य ह्मणून भागवतांत सांगितलें आहे;

नैतन्मनोविशतिवागुतचक्षुरात्मा
प्राणेंद्रियाणिचयथाऽनलमर्चिषःस्वाः ।
शब्दोपिबोधकनिषेधतयात्ममूल-
मर्थोक्तिमाहयदृतेननिषेधसिद्धिः ॥

स्कं० ११, अ० ३, श्लो० ३६.

२ पुष्पदंतानेंहि अशाच अभिप्रायानें ह्मटलें आहे;-

महिम्नःपारंतेपरमविदुषोयद्यसदृशी ।
स्तुतिर्ब्रह्मादीनामपितदवसन्नास्त्वयिगिरः ॥
अथाऽवाच्यःसर्वःस्वमतिपरिणामावधिगृणन् ।
ममाऽप्येषःस्तोत्रेहरनिरपवादःपरिकरः ॥ १ ॥

महिम्नः स्तोत्र.

तुझिया स्तवार्थ - तुझें वास्तविक स्तवन करण्यास, तुझ्या सारिखे कवी कधीं जन्मतील; अर्थात् तसें तुझें वास्तविक स्तवन करण्यास तुझ्या सारिखेच कवी जन्मले पाहिजेत. हें होणें नाहीं, तसें तुझें यथार्थ स्तवन इतरां कडून होण्याचा हि संभव नाहीं, असा एथील ध्वन्यर्थ. एथे कविशब्द प्राकृतरीती प्रमाणें कवींनी दीर्घ ईकारान्त केला आहे. या शेवटल्या चरणांत कवींनीं केवळ साधारण शब्दांनीं अर्थगौरव फार सरस दाखविलें आहे.

निजस्तुतितुह्मांरुचेस्तविातित्यांबरेंतर्पितां ॥
नमस्कृतिपरांबरेंस्वधनसर्वहीअर्पितां ॥
स्वभावतुमचाअसाविदितजाहलायाचकां ॥
करूंस्तवजसातसाफळनव्हेजनायाचकां॥२८॥

एथें भगवंताचें स्वस्तुतिप्रियत्व कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** तुह्मां निजस्तुति रुचे, स्तविति त्यां बरें तर्पितां, नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्व ही अर्पितां; असा तुमचा स्वभाव याचकां विदित जाहला, जसा तसा स्तव करूं, याच जना कां फळ नव्हे.

**तुह्मां निजस्तुति रुचे,—** तुह्माला आपली स्तुति आवडत्ये - कोणी कशी हि प्रेमानें तुमची स्तुति केली ह्मणजे ती तुह्मांस आवडत्ये; नुसती आवडत्ये इतकेंच नाहीं परंतु ' **स्तविति त्यां बरें तर्पितां,—** जे तुमची स्तुति करितात त्यांस, चांगलें, तर्पितां - संतुष्ट करितां; इतकें तर काय परंतु ' **नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्व ही अर्पितां,—** नमस्कृतिपरां-नमस्कृतितत्पर जे कोणी त्यांस - अर्थात् जे तुह्मास सप्रेमांतःकरणानें नुसता नमस्कार करितात त्यांस - ह्मणजे सप्रेमांतःकरणानें जे तुह्मास शरण येतात त्यांस,- **बरें स्वधन सर्वही अर्पितां,-बरें** - उत्कृष्ट. स्वधन-आपलें **धन** - संपत्ति, अर्थात् ' बरें ' या विशेषणें-करून सलोकता समीपतादिं चारी मुक्ति, सर्व ही, **अर्पितां**-देतां; ह्मणजे तुमची स्तुति करण्याचें सामर्थ्य नसल्या मुळें ती

नकरितां

नकरितां नुसता सप्रेमांतःकरणानें नमस्कार करणारा जो त्यास हि तुह्मीं मुक्त करितां, असा एथील ध्वन्यर्थ. अथवा, **बरें** हें विशेषण नकरितां – ' बरें अर्पितां – ' बरें देतां, असें क्रियाविशेषण[1] करावें. **असा तुमचा स्वभाव याचकां विदित जाहला,—** असा – आपले स्तुतिपाठकांस सर्वस्व देण्याचा, **तुमचा स्वभाव**, आहे ह्मणून ' **याचकां** – याचकजनास–आह्मा सारिख्यां मागणारांस, **विदित जाहला**– माहित झाला, ह्मणून कवि ह्मणतात ' **जसा तसा स्तव करूं**,– जसा आह्मास आपला स्तव करितां येईल तसा करूं; **याच जना कां फळ नव्हे,—** मग ' **याच जना** – कवि आपणा कडे दाखवून ह्मणतात ह्या जो मी जन त्या मलाच, **फळ** – इष्टफलाप्राप्ति, **कां नव्हे** – कां नव्हावी: एथे काक्वर्थ जाणावा. अर्थात् मलाहि इतर व्यासशु- -कादि याचकां प्रमाणें फलप्राप्ति अवश्य व्हावी.

---

[1] ' तुह्मीं मला देत नाहीं आणि त्यास बरें देतां, या वाक्यांत 'बरें' हें जसें क्रियाविशेषण तसेंच एथेंहि हें क्रियाविशेषण जाणावें.

**तुह्मींपरमचांगलेबहुसमर्थदातेअसें ॥**
**सुदीनजनमींतुह्मांशरणआजिआलोंअसें ॥**
**पुन्हाहिह्मणतोंबरेंश्रवणहेंकरायास्तव ॥**
**समक्षकितिआपुलासकललोकरायास्तव ॥ २९॥**

मागील केकेंत कवीनीं जसातसा स्तव करूं ह्मणून प्रतीज्ञा केली, तीच पूर्ण करित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय—** तुह्मीं परम चांगले, बहुसमर्थ, दाते, मीं जन सुदीन असें, आजि तुह्मां शरण आलों, असें हें बरें श्रवण कराया स्तव पुन्हा हि ह्मणतों, सकललोकराया समक्ष आपुला स्तव किती.

**तुह्मीं परम चांगले,—** तुह्मीं सर्व सौंदर्यदयादिगुणें-करून शोभायमान; **बहु समर्थ,**—सर्व शक्तिमान्; **दाते,**-स्वभक्तमनोरथ परिपूर्ण करणारे; असे तुह्मीं, आणि ⸍ **मीं जन सुदीन असें,**- मीं जी ही व्यक्ति- ह्मणजे हा जो मीं तो, — सुदीन - केवळ दीन - अत्यंत रंक - दयापात्र, **असें** - आहें, आणि ⸍ **आजि तुह्मां शरण आलों,—** आज तुह्मांस शरण आलों; - सर्वस्वें तुह्मास मीं आपलें अर्पण केलें आहे, **असें हें बरें श्रवण कराया स्तव पुन्हा हि ह्मणतों,—असें हें**- असें हें माझें परम विनयपूर्व-क लहानसें स्तवन, **बरें श्रवण कराया स्तव पुन्हा हि ह्मणतों,**-.आपण ⸍ **बरें**- दधेनें, ऐकावें ह्मणून पुनः हि ह्मण-तों- प्रार्थनापूर्वक सांगतों; अथवा, **यास्तव असें हें बरें**

श्रवण

**श्रवण करा पुन्हाहि ह्मणतों,- यास्तव**-मीं दीन तुह्मांस श-
-रण आलों आहें म्हणून, असें हें बरें श्रवण करा, असें॰ पु-
-नःहि ह्मणतों; (असा अन्वय करावा.) कीं॰ **सकललोकरा-**
**-या समक्ष आपुला स्तव किति,** — सकललोकरा-
-या,- **सकल** लोक- ब्रह्मेंद्रवरुणादि लोक, - अथवा सूर्य-
-चंद्रभौमादि अंतरिक्षगोलनिवासी लोक,- अथवा स्वर्गादि
लोकत्रय, यांचा॰ **राय**- राजा- नायक, जो तूं त्या तुझ्या॰,
**समक्ष**- पुढें, **आपुला**- मत्कृत- म्या दीनानें केलेला, **स्तव**-
स्तुति, **किती**- किति अल्पयोग्यतेचा; अर्थात् कांहींच
योग्यतेचा नाहीं. सारांश, मीं दीन आपणास शरण आलों
आहें हेंच मी पुनः पुनः आपणास सांगतों, आणि हीच
माझी अल्पमतीची प्रार्थना आपण बरे प्रकारें ऐकावी;
वरकड मज सारिख्या दीनानें महा समर्थ सर्व ब्रह्मांडना-
-यक अशा आपणा पुढें किती आपला स्तव करावा.

**कितीश्रवणझांकितीप्रभुहिकायतेपोळती ॥**
**पुसालजरिकोणतेपदरजींतुझ्यालोळती ॥**
**बरेंतुजचिसोसवेस्तवनकृत्तिवासागरा ॥**
**नपीतरिकसेंघडेहितकरादयासागरा ॥ ३० ॥**

सामान्य ज्ञानी, माझें महत्त्व यत्किंचित् जाणारे जे पुरुष असतात, त्यांसहि प्रशंसा आवडत नाहीं, मग मीं एवढा ब्रह्मांडनायक स्वस्तुतिप्रिय ह्मणून त्वां आरंभीं विधान करून माझा स्तव करायास प्रवृत्त झालास, हें कसें ? अशी भगवच्छंका मनांत आणून तिचें निवारण पुढील दहा केकेंत करित होत्साते प्रथम एथें सामान्यतः स्तवनाचें विगर्हितत्व कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— प्रभु, किती श्रवण झांकिती, काय ते पोळती, ते कोण जरि पुसाल, तुझ्या पदरजीं लोळती, तुजचि स्तवन बरें सोसवे, कृत्तिवासा गरा नपी तरि कसें घडे, दया सागरा हित करा.

**प्रभु**- हे प्रभु, **किती श्रवण झांकिती,**— किती लोक आपली दुसऱ्यानें केलेली स्तुति ऐकून कान झांकतात; अर्थात् आपल्या प्रशंसेच्या दुःसहत्वा मुळें काना वर हात ठेवितात; **काय ते पोळती,**- कोणी ह्मणेल जसे काय ते पोळतात, अर्थात् त्यांस स्वस्तुति - इंगळा सारिखी दुःसह होत्ये; **ते कोण जरि पुसाल,**— असे पुरुष कोण ह्मणून जर आपण पुसाल; तर ऐका- **तुझ्या पदरजीं लोळती,**— तुझ्या पदसंबंधी धुळींत जे लोळतात ते - अर्थात् साधुजन;

तेव्हां

तेव्हां तुझ्या पदरजांत लोळणारे जे त्यांसहि स्वप्रशंसा इतकी दुःसह असतां, ती तुला आवडती हें परम आश्चर्य होय. एथें प्रथम चरणांत **हि** हें पादपूरणार्थी अव्यय होय. अथवा, **किति प्रभु हि श्रवण झांकिती,**- किती, प्रभु हि-प्रभु असतां हि- अर्थात् स्तुतीस योग्य असतांहि, कान झांकितात; असा अर्थान्वय करावा. या आश्चर्याचें निवारण करित होत्साते कवि पुढें ह्मणतात;— **तुजचि स्तवन बरें सोसवे,** — असें परम दुःसह ⸍ **स्तवन**— स्वप्रशंसा, तुलाच बरी सोसवते, इतरांस तर सोसवत नाहींच नाहीं, असा एथील ध्वन्यर्थ; यास दृष्टांत ⸍ **कृत्तिवासा गरा न पी,— कृत्तिवासा**[१]- महादेव, **गरा**- गर- विष त्यातें, **न पी**- न पिता- प्याला नसता, **तरि कसें घडे,**— तर मग कसें घडलें असतें; समुद्रमंथनकाळीं वासुकीच्या मुखांतून सर्व जगास दहन करणारें गरळ जरीं अत्यंत दुःसह होतें, तरीं महादेवानें सर्व जगता वर दया करून त्या विषाचें आपण

---

१ भूतेशःखंडपरशुर्गिरीशोगिरिशोमृडः ।
मृत्युंजयःकृत्तिवासाःपिनाकीप्रथमाधिपः ॥

अमर.

एथें **चंद्रमस्** शब्दा प्रमाणें मूळचा **कृतिवासस्** शब्द जाणावा. त्याचें संस्कृत नियमा प्रमाणें **कृत्तिवासाः** असें प्रथमेचें रूप होतें. परंतु प्राकृत भाषेंत त्यांतील विसर्ग गाळून **चंद्रमा** प्रमाणें, एथें रूप केलें आहे.

आपण प्राशन केलें; तसें **दयासागरा हित करा,— द-यासागरा-** हे दयानिधे, महादेवा प्रमाणें आपणहि आमचें **हित करा-** कल्याण करा. सारांश वासुकीचें गरळ जरी दुःसह होतें, तरी लोकहितार्थ महादेवानें त्याचें प्राशन केलें, तसें स्वस्तुति यद्यपि दुःसह आहे, त्यांत आह्मा सारिख्या अज्ञ जनानीं आपल्या सारिख्या त्रैलोक्यनायकाची केलेली स्तुति तर विषा प्रमाणें अत्यंत दुःसह होय, तथापि केवळ आमच्याच हिता करितां तिचा आपण अंगीकार करून आमचें कल्याण करावें असा अर्थ. एथें दृष्टांत अलंकार जाणावा.

**गमामधुरहेंविषस्तवनसेवितोंमाजवी ॥**
**करीमलिनसद्यशोमुखहलाहलालाजवी ॥**
**हरापरिसतूंबराप्रभुवरासदांजोपिशी ॥**
**असारससमर्पित्याअमृतआपुलेंओपिशी ॥** ॥ ३१ ॥

मागील केकेंत सांगितल्या अर्थाचें समर्थन करून भगव-
-ताचें विशेष दयालुत्व वर्णित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** हे विषस्तवन मधुर गमा, सेवि तों माजवी, सद्यशोमुख मलिन करी, हलाहला लाजवी, प्रभुवरा तूं हरा परिस बरा, जो सदां पिशी, असा रस समर्पि त्या आपुलें अमृत ओपिशी.

**हें विषस्तवन मधुर गमा,** हें- प्रस्तुत, सांगितलेलें, **वि**षस्तवन- विषतुल्य स्तवन- विषा सारिखें स्तवन, आ-
-पण ⁄ **मधुर गमा** - गोड मानिता; तें विषस्तवन आणखी कसें आहे ह्मणून पुसाल तर ऐका⁄ **सेवि तों माजवी,—** जों जों त्यास कोणी⁄ सेवि- सेवितो- त्याचें सेवन करितो, **तों**- तों तों, तें ⁄ **माजवी** - माजवितें- उन्मत्त करितें; आ-
-णखी ⁄ **सद्यशोमुख मलिन करी,** - सद्यशोमुख - सत्कीर्तिरूप जें मुख, तें ⁄ मलिन करितें, अर्थात् सत्कीर्तीस काळेपणा आणितें; आणखी ⁄ **हलाहला लाजवी,—** **ह**लाहल- वासुकीचें गरल, त्यास, हि⁄ लाजवितें, अर्थात् आपल्या नाशक गुणानें त्यासहि खालीं पाडितें; ह्मणजे हला-
-हला पेक्षांहि जें अधिक नाशक, तें हें विषस्तवन आपण गोड

मानितां

मानितां असा एथें अर्थसंबंध जाणावा. कदाचित् आपण पु-
-साल कि असें हलाहल ज्याणें लोकहितार्थ प्राशन केलें त्या
दयालु महादेवास तूं कां शरण जात नाहींस ? तर ऐका
**प्रभुवरा तूं हरा परिस बरा,—** हे प्रभुवरा, तूं महादेवा
पेक्षां चांगला- अधिक दयालु आहेस; कारण **जो सदां
पिशी,—** तो महादेव निरंतर, **पिशी**- त्या उन्मादक पदा-
-र्थाच्या सेवनेंकरून लोकमर्यादेचें अतिक्रमण करणारा-स्वे-
-च्छाचारा सारिखा असतो; ह्मणून तो मज वर कृपा करी-
-लच असा निश्चयपूर्वक मला त्याचा भरंवसा येत नाहीं,
असा एथील कवित्त्वद्रतार्थ ध्वनित होतो. ह्मणून तूंच त्या
पेक्षां बरा, यास आणखी कारण **असा रस समर्पि त्या
आपुलें अमृत ओपिशी,—** जो कोणी, **असा
रस**- हलाहलरूप रस, **समर्पि**- देतो, **त्या**- त्यास, अथवा
**समर्पित्या**- समर्पण करणारास, असा एथें एक शब्द करावा,
आपलें अमृत, **ओपिशी**- यथेच्छ देतोस. जो आपल्यास
विष देतो त्यास तूं अमृत देतोस, तेव्हां तूं अत्यंत दयालु होस,
असा एथील भावार्थ जाणावा.

कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्यापते ॥
भलेनवरितीस्तुतिमतिनजोडितीपापते ॥
गळांपडतिज्यांचियातवगुणैकदेशभ्रमें ॥
तिहींतुजचिदावितांभजतिबातुलासंभ्रमें ॥ ३२ ॥

स्तुति विषोपम दुःसह असतां तूं जो तीस गोड ह्मणून मानितोस, हें केवळ त्या स्तुतीच्याच आग्रहा करितां, वरकड तिच्या अंगीं वस्तुतः कांहीं माधुर्य आहे असें नाहीं, असा आपला भावार्थ कथित होत्साते त्या स्तुतीस कन्ये-ची उपमा देऊन कवि ह्मणतात.

**पदान्वय**— कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते, भले स्तुति मति न वरिती, पापते न जोडिती, तव गुणैकदेश-भ्रमें ज्यांचिया गळां पडति, तिहीं तुजचि दावितां बा तुला संभ्रमें भजति.

**कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते,**— हे **कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते**, **कवीश्वर**— व्यासवाल्मीकादि जे कविश्रेष्ठ, त्यांचा जो ⁄ **मनःपयोनि-धि** - मनरूप क्षीरसमुद्र, त्याची जी ⁄ **सुता** - कन्या, तद्रू-पा जी **स्तुति**, तिच्या ⁄ **पते** -हे तिच्या स्वामी; एथें कवी-श्वराच्या मनास क्षीरसमुद्राची उपमा देऊन तत्कन्येची उपमा स्तुतीस दिल्यानें ती स्तुती लक्ष्म्योपमा होत्ये ह्मणून हा रूपक अलंकार जाणावा. एथें समुद्राच्या ठायीं तरंग, आणि मनाच्या ठायीं तर्क, कल्पना, यांच्या चांचल्यानें जें साधर्म्य

इंगित

इंगित होतें, तें फार सुरस असून, त्या साधर्म्यानें, आणि गांभीर्यरूप साधर्म्यानें, मन आणि समुद्र यांचा उपमेयो-पमाभाव कवीनें दाखवून, मनोजन्यत्वेंकरून स्तुतीचें, आणि समुद्रजन्यत्वेंकरून लक्ष्मीचें, सामानाधिकरण्य साधून, तद्द्वा-रा स्तुति आणि लक्ष्मी यांचा आणखी उपमेयोपमाभाव प्रदर्शित केला आहे, येणेंकरून आपल्या कवीनें सा-हित्यशास्त्रज्ञांच्या बुद्धीस रममाण होण्यास चांगला अवकाश दिला आहे. या विशेषणात्मक संबुद्धीनें भगवंताचें स्तुतिप्रियत्व अबाधित आहे असें कवीनें एथें दर्शविलें; तथा-पि वर जें स्तुतिविगर्हितत्व सांगितलें तें वस्तुतः खरें आहे, त्याचेंच समर्थन करित होत्साते पुढें कवि ह्मणतातः- **भले स्तुति प्रति न वरिती,—** वस्तुतः स्तुतिलालित्यानें भुलून, भले - साधुपुरुष, त्या स्तुतीस, **न वरिती**- वरित नाहींत- तिचा अंगीकार करित नाहींत; आणि तेणेंकरून - **पापतें न जोडिती,— पा**पतें,[१]- **पा**पता- स्तुतिमोहितत्वरूप जी अपयशता- अपकीर्तिरूप दोष त्याला,- जोडित **नाहीं-**त; अर्थात् तिच्या लालित्यानें मोहित होण्याचा दोष ते घेत नाहींत. अथवा, एथें **ते पाप न जोडिती,- ते-** भले पुरुष, **पाप** पूर्वोक्त दोष, जोडित नाहींत, असा अर्थ करावा.[२]

ती

---

१ नृशंसोघातुकःक्रूरःपापोधूर्त्तस्तुवंचकः
अमर.

२ एथें 'पापतें' तें पाप, असाहि कोठे पाठ आढळतो, तें पाप जोडित नाहींत असा अर्थ केला असतां बाध येतो असें नाहीं; परंतु वरील चरणांत 'पते' या शेवटल्या पदांशीं 'पापते' या पदाचें यमक निरनुनासिक असल्यानें अधिक चांगलें जुळतें, आणि यांत प्रौढताहि विशेष, तेव्हां मूळचा पाठ असाच असावा असें मला वाटतें.

ती स्तुति ' **तव गुणैकदेशभ्रमें ज्यांचिया गळां पडति,— तव गुणैकदेशभ्रमें** - तुझ्या गुणाचा जो एकदेश - ह्मणजे तुझ्या गुणाचा जो यत्किंचित् अंश, तत्कृत जो भ्रम-मोह, त्या मोहानें, ज्यांच्या ज्यांच्या गळां पडती; अर्थात् तुझ्या गुणाचा यत्किंचित् अंश ज्या ज्या पुरुषांच्या ठायीं ती स्तुति पाहती, आणि त्या गुणांशानें त्या त्या पुरुषांस मोहित होऊन तुह्मीं मला आपली स्त्री करा ह्मणून त्यांच्या गळां पडती; एथें ' गळां पडती ' या पदानें कवीनें स्तुतीच्या निर्लज्जारूप दोषानें तिचें विगर्हितत्व सुचविलें. **तिहीं तुजचि दाविता बा तुला संभ्रमें भजति,—तिहीं**- त्या त्या पुरुषांनीं, तुलाच दाखविलें असतां, **बा**- अरे बापा, ती स्तुति' तुला, **संभ्रमें** - मोठ्या त्वरेनें अथवा परमादरानें, **भजति**- सेविती; सारांश ती स्तुतिरूप स्वयंवरा कन्या वरातुरा होत्साती कोणाही पुरुषा मध्यें तुझ्या गुणाचा यत्किंचित् अंश पाहिला, ह्मणजे त्या गुणानें वेडी होऊन त्यांच्या गळां पडूं लागती, तेव्हां ते सत्पुरुष तिला सांगतात कि ज्या आमच्या सौंदर्यौदार्यादि कोणत्याहि गुणाला तूं मोहित झाली असशील, तो गुण वस्तुतः आमचा नाहीं, तो गुण पूर्णत्वें ज्या भगवंताच्या ठायीं नांदतो त्या कडे जा, ह्मणजे तो तुझा अंगीकार करील; असें जेव्हां ते तीस सांगतात, तेव्हां ती परम आतुर होऊन लागलीच तुज कडेस वळून तुला शरण येती. एथें कवीनें स्तुतीचें आतुर्यादि लक्षण साधून तिच्या विगर्हितत्वाचें यथास्थित समर्थन केलें आहे. तसेंच सत्पुरुषाचा स्वस्तुतिविषयक अनादर साधून भगवंताचें

सर्वगुणाधि-

सर्वगुणाधिष्ठातृत्वहि साधिलें आहे. आणखी सद्गुणी - साधु पुरुष, परमेश्वराच्या विभूति आहेत असाहि या केकेंत आपला भावार्थ सुचविला आहे. एथें स्तुति आणि वरातुरा कन्या या उपमेय आणि उपमायांचा बिंबप्रतिबिंबभाव वर्णिला आहे, ह्मणून हा दृष्टांत अलंकार जाणावा.

'तव गुणैकदेशभ्रमें' या पदांत 'तव' हा षष्ठ्यंत शब्द असतां त्याचा 'गुणैकदेशभ्रम' या संयुक्त पदांतील गुण शब्दांशीं जो म्यां वर संबंध दाखविला, तो व्याकरणदृष्ट्या अयुक्त खरा; तथापि तो संबंध अर्थास फार अनुकूल दिसतो, आणि प्राकृत काव्यांत इतका बारीक दोष असह्य होईल असेंहि मला वाटत नाहीं; परंतु अर्थापेक्षां शब्दरचने वर ज्यांचें विशेष लक्ष अशा पुरुषांस तो दोष दुःसह होईल ह्मणून मला भीति आहे. या भीती स्तव इष्ट असल्यास 'गुणैकदेशभ्रम' ह्मणजे सामान्येंकरून गुण - अर्थात् उत्तम गुण, त्याचा जो एकदेश - यत्किंचित् अंश, तत्कृत जो 'तव' तुजसंबंधी अर्थात् त्वद्विषयक, भ्रम, त्या भ्रमानें ज्यांच्या ज्यांच्या गळां ती स्तुति पडली, अशी पूर्ववत् अर्थयोजना करावी; ह्मणजे एथें उत्तम गुणाच्या यत्किंचित् अंशानें तद्गुणविशिष्ट पुरुषां वर भगवद्गुणविषयक भ्रमाचें ग्रहण होऊन, तेणेंकरून भगवंताचें पूर्व ज्ञान स्तुतीस होतें असें स्पष्ट होतें; परंतु तव या पदाचा गुणाशीं संबंध केल्यानें तें पूर्व ज्ञान तीस नसतां सत्पुरुषानीं दाखविल्या वर तें ज्ञान तीस झालें, असा माझ्या मतें कवित्दृद्गत अर्थ असावा. मग पंडित जनांस जसा इष्ट अर्थ दिसेल तसा एथें त्यांनीं ग्रहण करावा.

**म्हणोनिकवितासुतातुजसमर्पितोंसाजरी ॥**
**नसेबहुतशीगुणीकनकपीतवासाजरी ॥**
**तरीनइतरावरीहरिकरीइलाकिंकरी ॥**
**मयूरहिनिजात्मजाग्रहविमुक्तजैसाकरी ॥ ३३ ॥**

मागील केकेंत कवीनें सामान्यतः कविजनसंबंधानें स्तुती--चा आत्मजारूप धर्म वर्णिला, ईंत विशेषतः स्वकृत स्तुतीचें स्वकन्यकात्व वर्णून तिचा आपण अंगीकार करावा म्हणून भगवंतास प्रार्थितात.

**पदान्वय—** म्हणोनि कवितासुता साजरी तुज समर्पि-तों, जरी तशी बहु गुणी कनकपीतवासा नसे, तरी इतरा न वरी, हरि, इला किंकरी करी, निजात्मजाग्रहविमुक्त जैसा मयूर हि करी.

**म्हणोनि कवितासुता साजरी तुज समर्पितों,—** म्हणोनि- मागील केकेंत कवीश्वरमनःपयोनिधिसुता अशी स्तुति वर्णिली आहे म्हणून, ही माझी^ **कवितासुता**- स्तु--त्यात्मककवितारूप **सुता**- कन्या, **साजरी**- साजरी नसतां नवें जुनें वस्त्र नेसवून खिडुकमिडूक डागिणे घालून नीटने--टकी अशी साजरीगोजरी, करून ^ तुला, **समर्पितों**- आदर--पूर्वक अर्पितों. एथें कवीनें स्वकाव्यरचनाल्पशक्तित्व सुचवून तद्द्वारा आपली निरभिमानता दर्शविली. **जरी तशी बहु गुणी कनकपीतवासा नसे,—** जरी, ही माझी कवितासुता^ **तशी**- पूर्वोक्त व्यासवाल्मीकादि कवी-

श्वरांच्या

श्वरांच्या सुकवितासुतां प्रमाणें, **बहु**-अत्यंत, **गुणी**-गुणवती, आणि **कनकपीतवासा**,- **कनक**- सुवर्ण, त्या सारिखा आहे पीतवास-पिवळें वस्त्र-पीतांबर, जिचें अशी, (एथें स्त्री-लिंगीं टाप् झाला आहे) अर्थात् सुवर्णा सारिख्या पीतांबरानें सुशोभित अशी; एथें **पीत** शब्द असून **कनक** शब्दाची योजना केली आहे, येणेंकरून कनकधटित अलंकाराचें-हि ग्रहण ध्वनित होतें- ह्मणजे सुवर्णाचे अलंकार घालून त्या अलंकारांस अनुरूप असें पीत वस्त्रहि जिणें धारण केलें आहे अशी, अथवा, जरतारी पिवळा पाटांव नेसलेली अशी, **नसे**-नाहीं;अथवा, **कनकपीतवासा**,-**कनक** ह्मणजे चंपक,[1] **पीत** ह्मणजे केशर, यां सारिखा आहे वर्ण आणि सुगंध जीच्या वस्त्रास अशी. स्तुतिपक्षीं 'बहु गुणी' आणि 'कनकपीतवासा' या विशेषणांनीं करुणादि रस आणि उपमादि अलंकार यांनीं प्रगल्भा अशी स्तुति, असा भावार्थ जाणावा. अथवा, एथे कनकपीतवासा हें सारें पद संबोधन करून विष्णूचें विशेषण केलें असतांहि चालेल. हे **कनकपीतवासा**- हे सुवर्णा सारिखा पीतांबर धारण करणाऱ्या-हे पीतांबरधारी, जरी ती माझी कवितासुता तशी बहु गुणी नसे, असा पूर्ववत् संबंध. **तरी इतरा न वरी**,-तरी-तथापि-व्यासवाल्मीकाच्या कवितासुतां प्रमाणें ही माझी सुता जरी गुणवती आणि कनकपीतवासा नाहीं तथापि, **इतरा**- तुज शिवाय इतर कोणासहि, ती वरित नाहीं, ह्मणून **हरि**,-हे हरि-हे मत्संकट निवार-

का

---

1 कनकं चंपकेहेम्निधत्तूरेऽपिनिगद्यते

विश्वकोश.

का, **इला किंकरी करी,**-इला-या माझ्या कन्येला, **किंक-री-दासी, करी-कर;** जर ही तुला वरायास योग्य नाहीं तर आपली दासी तरी कर; आणि **निजात्मजाग्रहविमुक्त जैसा मयूर हि करीं,**-**निजात्मजाग्रहविमुक्त,-निजात्मजा**-आपली कन्या, तिचा जो **आग्रह**- तुला वरायाचा जो तिणे हट्ट घेतला आहे तो, त्यापासून **विमुक्त** - मोकळा, **जैसा**- ज्या रितीनें मीं तिच्या अग्रहापासून मोकळा होईन तसें, **मयूर**-या मयूरास, येथें कवि आपल्यास दाखऊन ह्मण-तात, या मयूरास- या मोरोपंतास, हि कर. ह्मणजे या माझ्या स्तुत्यात्मककविताकन्येला शेवटीं तूं आपली दासी तरी कर, आणि मलाहि तिच्या आग्रहापासून सोडीव असा अर्थ.

या केकेंत कवीनें 'तुज साजरी समर्पितों' या पदानें आपल्या काव्याचें हीनत्व सुचवून तद्वारा आपली विनयिता प्रकट केली आहे. तसेंच, 'तशी बहु गुणी आणि कनकपी-तवासा नसे' असें ह्मटलें, येणेंकरून प्राचीन व इतर प्र-सिद्ध कवींच्या काव्यरचनेचें सौरस्य वर्णून, त्या सौरस्यास आपल्या काव्याचें सौरस्य तुलणार नाहीं असेंहि स्पष्ट दर्शविल्यानें आणखी आपली निरभिमानता ध्वनित केली आहे; इतकेंहि दर्शवून पुनः युक्तीनें 'तरी इतरा न वरी', येणेंकरून त्या आपल्या काव्यांत करुणारसाची प्रमुखता दर्शवून तद्वारा ती आपली काव्यरचनेची व्यंगता झांकण्याची-हि आपली कृतप्रयत्नता इंगित केली आहे; तथापि आप-ली विनयिता न सोडितां पुनः 'इला किंकरी करी,' आणि मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त जैसा करीं,' येणेंकरून

शेवटीं

शेवटीं स्वस्तुतीची स्वीकृति करण्या करितां आपली विनय-
-युक्त प्रार्थनाहि दर्शविली. एथें आणखी कवीनें ' जैसा '
या शब्दाचा प्रयोग संस्कृता प्रमाणें क्रियाविशेषणा सारिखा
केला आहे, ह्मणजे ' निजात्मजाग्रहविमुक्तोयथाभवतितथा
कुरु ' असा एथें अर्थ ' जैसा ' या शब्दानें जाणविला आहे.
आणखी या श्लोकांत - साजरी, जरी, तरी, वरी, करी,
किंकरी, करी, या पदन्यासांनीं यमकलक्षणानें आपल्या
कवीनें वृत्त्यनुप्रास साधिला आहे तोहि गोड.

स्मरोनिकृतमंतुलानकवितावधूस्वीकृति॥
करालतरिआयकाप्रभुखराचमीदुष्कृति ॥
नमस्कृतिपुरःसरस्वकृतिआर्पितोंआजिती ॥
दिलीरविसखेंतुह्मांजशिनमोनिसत्राजिती ॥३४॥

मागील केकेंत शेवटीं आपल्या स्तुतीचा अंगीकार क--रावा ह्मणून कवीनें आपला भावार्थ दर्शविला; ईत त्या अं--गीकारास स्वदोषस्मरणाचाहि प्रत्यवाय नसावा ह्मणून दृष्टांतानें सुचवून त्याच आपल्या प्रार्थनेस दृढ करितात.

**पदान्वय**— कृतमंतुला स्मरोनि कवितावधूस्वीकृति न कराल, तरि प्रभु आयका, मी दुष्कृति खराच, आजि ती स्वकृति नमस्कृतिपुरःसर आर्पितों, जशि नमोनि रविसखें तुह्मां सत्राजिती दिली.

मागें केलेल्या माझ्या अपराधांचें स्मरणहि या माझ्या स्तुत्यात्मिका कविता कन्येच्या अंगीकरणास बाधत नाहीं, असा आपला भावार्थ कथित होत्साते कवि ह्मणतात- **कृतमंतुला स्मरोनि कवितावधूस्वीकृति न कराल,**— **कृतमंतुला**[1]- केलेल्या अपराधास - अर्थात् माझ्या केले--ल्या अपराधांस, अथवा, **कृतमंतुला** हें एक पद करून- **कृतमंतु** - केला आहे अपराध ज्याणें - अर्थात् अपराधी, (असा

1 आगोऽपराधोमंतुश्चसमेतुद्दानबंधने— अमर.

( असा बहुव्रीहि ) जो मी त्या मला, **स्मरोनि**- ते माझे अपराध, अथवा असा मी अपराधी, मनांत आणून, **कविता-वधूस्वीकृति**- माझी कवितारूप जी वधू - नवरी, तिची जी स्वीकृति - स्वीकार - अंगीकार, **न कराल**- जर आपण करणार नाहीं; **तरि प्रभु आयका,**— तरि-तर, प्रभु - हे प्रभो, **आयका**[1] - ऐका - मीं एका गोष्टीचें आपल्यास स्मरण देतों तें ऐका; **मी दुष्कृति खराच,**— मी, तर दुष्कृति - दोषी - अपराधी, खराच - यांत संशय नाहीं; तथापि **आजि ती स्वकृति नमस्कृतिपुरःसर अर्पितों,**— आजि - आज - सांप्रतकाळीं, ती, **स्वकृति** - माझी कृति - स्तुतिरूप कविता, **नमस्कृतिपुरःसर**- नमस्कारपूर्वक, **अर्पितों**- तुला अर्पण करितों; कशी अर्पितों पुसाल तर **जशि नमोनि रविसखें तुह्मां सत्राजिती दिली,**—**जशि**- ज्या प्रकारें, **नमोनि**- नमून-नमस्कार करून, **रविसखें,**- रविसख- सत्राजित, त्याणें, **तुह्मां**-तुह्मां कारणें, **सत्राजिती**- सत्राजिताची कन्या जी सत्यभामा ती, **दिली**- अर्पिली; अर्थात् सत्राजित तुमचा परम अपराधी असून त्याणें

---

१ 'आयका'-हें रूप ऐकणें या धातूंतील ऐ या संयुक्त स्वराच्या अवयवांचें पृथक्करण होऊन - अइकणें, अईकणें, आइकणें, आईकणें, अशीं प्राकृत ग्रंथांत प्रांतानुरूप भिन्न भिन्न रूपें आढळतात त्यांत संप्रसारणानें इच्या स्थानीं य होऊन झालें आहे. मला वाटतें बायको शब्दहि असाच व्युत्पन्न झाला असावा. मूळच्या बाई शब्दा वरून कुत्सितार्थीं को प्रत्यय होऊन बायको शब्द व्युत्पन्न झाला असावा. एथें 'आइका' असा मूळचा पाठ असेल तर मला वाटतें चांगलें.

-र्णें शेवटीं नमस्कारपूर्वक जशी आपली कन्या सत्यभामा तुह्मांस अर्पण केली;[1] तसा मीं अपराधी असतां ही माझी कवितासुता तुह्मांस अर्पण करितों; तिच्या प्रमाणें इचाहि आपण अंगीकार करावा असा एथील भावार्थ जाणावा.[2] एथें कवीनें सत्यभामेच्या कथनानें आपल्या कवितेच्या आणि तिच्या स्त्रीकारार्हत्वाची तुलना करून, सत्राजिताच्या सापराधत्वाशीं आपलें सापराधत्व हि तुललें आहे, ह्मणोन एथें हा उपमा अलंकार जाणावा.

---

१ या प्रमाणें भागवतांत ह्मटलें आहे;—

सत्राजितःस्वतनयां कृष्णायकृतकिल्बिषः ।
स्यमंतकेनमणिना स्वयमुद्यम्यदत्तवान् ॥

भागव०, स्कं० १०, अ० ५६, श्लो० १.

२ आपला स्यमंतक मणि कृष्णानें हरण केला ह्मणून जो आपण त्या--ज वर आळ घातला होता, तो मिथ्या ( पहा केका ८ वी, ). कृष्णानें तो स्यमंतक मणि जांबवताकडून आणून सत्राजितास दिल्या वर, त्या सत्रा--जितास आपल्या अपराधाचा पश्चात्ताप होऊन, नुसता मणि कृष्णास अ--र्पण केल्यानें त्याचें योग्य सांत्वन होणार नाहीं, तर, त्या मण्या बराबर आपली कन्याहि त्यास द्यावी, असा त्याणें निश्चय केला. पुढें कृष्णानें त्या सत्यभामेचें पाणिग्रहणहि केलें. ( पहा भागवत, पूर्वोक्त अध्याय. )

तिलाहिबरवीह्मणाउचितहोयतोषाकरें ॥
असेलसजलीयथारुचितर्यांस्वयोषाकरें ॥
जशीपदरजेंशिलापरिअसेनव्हेशापिली ॥
धवेंहरिमनोहराकृतिसतीअघेंव्यापिली ॥ ३६ ॥

त्याच आपल्या अर्थाचें दुसऱ्या कल्पनेनें, व दृष्टांतरानें कवि समर्थन करितात.

**पदान्वय**— तिला हि बरवी ह्मणा, उचित होय, तर्यां तोषाकरें स्वयोषाकरें यथारुचि सजली असेल, अघें व्यापिली धवें शापिली सती शिला परि असे नव्हे ? हरि पदरजें जशी मनोहराकृति.

**तिला हि बरवी ह्मणा,**— अथवा दुसऱ्या कल्पनेनें **तिला हि**-तुह्माशीं सत्तावीस दिवस अहोरात्र भांडला असा दांडगा जो जांबवत् त्याची कन्या जांबवती तीस, हि, **बरवी ह्मणा**- रूपवती ह्मणा,- सारांश रूपवती ह्मणून आपण तिचा हि अंगीकार केला; ( ह्मणा हा भूत काळ जाणावा ) हें **उचित होय,**— योग्यच आहे; कारण **तर्यां तोषाकरें स्वयोषाकरें यथारुचि सजली असेल,**— तर्यां - ज्या काळीं आपण तिचा अंगीकार केला त्या काळीं, **तो-षाकरें**- **तोष** - संतोष - सुख, त्याचा **आकर** - खाण, अशा **स्वयोषाकरें**, - **स्वयोषा** - आपली स्त्री - रुक्मिणी अथवा लक्ष्मी, तिचा जो **कर** - हस्त, तेणेंकरून, **यथा-रुचि** - आपल्या रुची प्रमाणें, ( हें एथें क्रियाविशेषण जाणावें )

जाणावें ) सजली असेल - शृंगारिली असेल; सारांश, त्या काळीं रुक्मिणीच्या अथवा लक्ष्मीच्या आवडत्या हातानें ती जांबवती तुमच्या रुची प्रमाणें सजली असेल, ह्मणून तुह्मी तिला बरी ह्मणून तिचा अंगीकार केला हें योग्यच आहे; अथवा, ती आपल्यास चांगली आवडावी ह्मणून आपल्या रुची प्रमाणें स्वतः लक्ष्मीनें तिची चट्टीपट्टी केली असेल, ह्मणून ती जांबवती आपल्यास आवडली असेल हें योग्यच आहे; परंतु ' **अघें व्यापिली धवें शापिली सती शिला परि असे नव्हे ?**- अघें व्यापिली- पापानें व्याप्त- अर्थसंदर्भानें आरोपित अपराधानें पिडिलेली, ह्मणूनच ' धवें शापिली, धवें-नवऱ्यानें-अर्थात् गौतम ऋषीनें, शापिली-शापिलेली-तूं इतःपर शिला होऊन पडली राहा ह्मणून स्वपति गौतमानें जिला शाप दिला अशी ती, सती- साध्वी- अर्थसंदर्भानें अहिल्या, **शिला परि असे नव्हे ?**- शिले सारिखी नव्हती बरें ? अर्थात् शिला होऊन पडून राहिली होती, असा एथें काक्वर्थ जाणावा; अशी ती शिला ' **हरि पदरजें जशी मनोहराकृति**, हरि - हे हरि - हे सर्वदोषपरिहारका, पदरजें- रामावतारीं आपल्या पायधूळीनें, जशी-ज्या प्रकारें, मनोहराकृति- सुंदररूपिणी, झाली, ( एथें झाली या क्रियापदाचा अध्याहार जाणावा ), त्या प्रकारें लक्ष्मीच्या हस्तानें ही जांबवतीहि रूपहीन होत्साती तुमच्या अंगीकरणास पात्र झाली; असा एथें अर्थान्वय करावा.

परंतु मला वाटतें एथें तिसऱ्या चरणांत ' जशी ' ह्मणून पाठ आहे, त्या ठिकाणीं 'कशी' असा मूळचा पाठ असावा,

तसा असल्यास अर्थसौरस्यास आणि पदान्वयास एथें अधिक अनुकूलता येईल. लक्ष्मीनें आपल्या हातानें जांबवतीची वेणीफणी केली असेल ह्मणून ती आपल्यास रूपवती वाटून तिचा आपण अंगीकार केला, हें योग्यच आहे, अर्थात् यांत विशेष आश्चर्य मानण्या जोगें नाहीं; परंतु अघें व्यापिली ह्मणून धवें शापिली असता जी सती शिला परि असे नव्हे ? अर्थात् शिले सारिखी पडलेली असतां ती, हे हरि, तुमच्या पदरजें मनोहराकृति कशी झाली ?- अर्थात् तुमच्या पायांच्या रजानें पतीच्या शापानें शिला होऊन पडलेली अहिल्या मनोहराकृति झाली हें महदाश्चर्य होय, असा एथें काक्वर्थ केला असतां पदान्वय मला गोड दिसतो.

भलेंस्मरणजाहलेंसमयिंकंसदासीकरें ॥
कशीउजरलीसमुज्वलदयासुधासीकरें ॥
तुह्मांस्वरिपुचीतशीबटिकआवडेमत्कृति ॥
नकोनसजवेअसाबहुतकायमीदुष्कृति ॥ ३७ ॥

पूर्वोक्त अर्थांचेंच समर्थन प्रकारांतरानें करित होत्साते कवि आणखी ह्मणतात.

**पदान्वय—** समयिं भलें स्मरण जाहलें, दयासुधासी-करें करें कंसदासी समुज्वल कशी उजरली, तुह्मां स्वरिपुची बटिक तशी आवडे, मत्कृति नको, न सजवे, असा मी काय बहुत दुष्कृति ?

पुनः कवि ह्मणतात– **समयिं भलें स्मरण जाहलें,—** समयीं- याच काळीं - अर्थात् याच प्रसंगीं, भलें- चांगलें- समयोचित, स्मरण जाहलें; हा एथें स्मरण अलंकार जाणा-वा[1]. तें स्मरण कोणतें पुसाल तर एका– **दयासुधासीकरें** करें

1 एथें अहिल्येच्या मनोहराकृती वरून तद्विपरीत कुब्जेच्या विरूपा कृतीचें स्मरण होऊन उभयतांच्या उद्धारसादृश्याचा प्रसंग आहे. कुव--लयानंदांत या अलंकाराच्या उदाहरणार्थ मार्गांतलें उदाहरण दिलें आहे.—

दिव्यानामपिकृतविस्मयांपुरस्ता-
-दंभस्तःस्फुरदरविंदचारुहस्तां ।
उद्वीक्ष्यश्रियमिवकांचिदुत्तरंतीं-
-मस्मार्षीज्जलनिधिमंथनस्यशौरिः ॥

**करें कंसदासी समुज्वल कशी उजरली,—दयासुधा-सीकरें,**- **दयासुधा**- दयामृत, त्याचा ⁄ **सीकर**- बारीक वर्षाव, आहे ज्यापासून अशा ⁄ **करें** - अर्थात् आपल्या हातानें, ( ही कर्तरितृतीया ) **कंसदासी** - कंसाची दासी - अर्थसंदर्भानें कुब्जा, **समुज्वल**-फार स्वच्छ-चांगली अशी, अथवा जशा रीतीनें समुज्वल होईल तशी, ( एथें हें क्रियाविशेषण जाणावें ), **कशी उजरली** -कशी नीट केली; कोणत्या हेतूनें नीट केली; शेवटीं नीट केलीना ? असा एथें काक्कर्थानें कवित्वद्गतार्थ ध्वनित होतो; अथवा, एथें 'समुज्वल-' हें पुढल्या पदांत निविष्ट करून तें **दया** अथवा **सीकर** याचें विशेषण करावें;- **समुज्वलदयासुधासीकरें करें**,- ह्मणजे अत्यंत स्वच्छ- अति निर्मल- जी दया, तद्रूप जी सुधा, तिचा सीकर आहे ज्या पासून, अथवा, निर्मल जो दयासुधेचा सीकर तो आहे ज्या पासून, अशा **करें**; अशी योजना करावी. परंतु माझ्या मतें भगवद्दया नैसर्गिक निर्मल असतां तीस 'समुज्वल' या विशेषणाची योजना करून तिचें नैसर्गिक निर्मलत्व आशंकनीय करावें हा सत्पक्ष नव्हे; ह्मणून वर सांगितल्या प्रमाणें 'समुज्वल' हें एथें क्रियाविशेषण मानावें हें मला अधिक प्रशस्त दिसतें. **उरजणें**[१]- नीट करणें, अथवा नीट होणें- चांगल्या स्थिती

वर

---

१ **उजरणें** या मराठी क्रियापदाची व्युत्पत्ति मला वाटतें **उज्वलन** या संस्कृत शब्दा बद्दन असावी, '**ज्वल** —दीप्तौ.' या मूळ संस्कृत धातुस उत् हा उपसर्ग लागून '**उज्वल**' शब्द सिद्ध झाला आहे-याचा प्रका-

शनार्थ

वर येणें, असा हा महाराष्ट्र भाषेंत उभयविध धातु आहे; तेव्हां एथें अकर्मकत्वार्थी याचें ग्रहण कर्तव्य इष्ट असेल तर, ' **करें** ' ही एथें करणी तृतीया मानावी. या आपल्या कृती वरून आह्मीं असें समजतों कीं' असा भाव मनांत आणून कवि पुढें भगवंतास ह्मणतात — **तुह्मां स्वरिपुची बटिक तशी आवडे,— तुह्मां-** तुह्माला, **स्वरिपुची-** आपल्या शत्रूची अर्थात् कंसाची, **बटिक-** अर्थात् पूर्वोक्त कंसदासी कुब्जा, **तशी-** ह्मणजे त्या प्रकारची- अर्थात् जशी म्यां वर सांगितली तशी- तात्पर्य, नावा प्रमाणें शरी-रानेंहि कुब्जा असून आपल्या अमृतस्रावी अशा हस्तानें ती नीट सुशोभित- सुंदर होई अशी आपण उजरली ह्मणून जें म्यां वर सांगितलें तशी; **आवडे-** ती आपल्यास आव-डली

---

शनार्थ मुख्य; परंतु पुढें प्राकृतांत 'नीट करणें' 'पूर्णपणें मूळच्या सुस्थिती वर आणणें,' अशा लाक्षणिकार्थी याचा प्रयोग पडून गेला आहे; ती लक्षणा अशी कीं — जसा दीप मंद जळत असतां त्यास तैलप्रदानादिकेंकरून उज्वलित करणें; तसेंच एकादी वस्तु व्यंग असतां, तीस अपेक्षित अंगाच्या अथवा इतर साधनाच्या योगानें सांग करून सुशोभित - नीट नेटकी - क-रणें, हेंहि तिचें उज्वलन करणें होय. असा एथें मूळचा प्रकाशन अर्थ आ-हे ह्मणून मला वाटतें एथें कवीनें ' समुज्वल ' या क्रियाविशेषणाचा प्रयोग केला आहे.

अन्य पक्षीं ' ऋजु— सरळ ' या मूळ संस्कृत शब्दा वरून प्राकृतांत ' उजू ' - सरळ — नीट, हा शब्द व्युत्पन्न होऊन त्या वरून ' उजरणें ' हा धातू व्युत्पन्न झाला असावा अशीही कल्पना करितां येत्ये; परंतु हा पक्ष एथें ' समुज्वल ' या शब्दाच्या प्रयोगानें कवीस इष्ट असेल असें मला बहुधा दिसत नाहीं. , आणखी, ' उजू ' या शब्दा वरून ' उजरणें ' हा धातू व्युत्पन्न व्हावा त्या पेक्षां ' उजवणें ' हा धातू व्युत्पन्न व्हावा हें अ-धिक युक्त दिसतें.

-डली; एथें बटिक हा श्लिष्ट शब्द तिचें निद्यत्व द्योत-
-नार्थ होय. आणि' मत्कृति नको,- मत्कृति-माझी कृति-
-माझी स्तुत्यात्मिका कवितारूप कृति, आपल्यास आवडत
नाहीं ह्मणून नको; आणि' न सजवे,— ती मत्कृति आप-
-ल्याच्यानीं' सजवत नाहीं- उजरत नाहीं; अर्थात् कुब्जा
त्रिवक्रा असून तीस आपण सरळ केलें, तशी माझी कविता
व्यंग असली तर तीहि बुद्धिप्रदानेंकरून मनोरंजक करावी;
असा एथें ध्वन्यर्थ होतो. असा मी काय बहुत दु-
-ष्कृति,- असा मीच काय मोठा, दुष्कृति- दुष्टकर्मा-दोषी-
अपराधी; सारांश एकतर कंस आपला शत्रु, त्याची कुब्जा
ही आणखी बटिक, तीही नावा प्रमाणें त्रिवक्रा अर्थात् अ-
-त्यंत कुरूप, असें असतां ती आपण दयार्द्र होत्साते स्वह-
-स्तानें सरळ करून सुशोभित केली, [१] आणि माझी स्तुत्या-
-त्मक अर्थात् स्वाभाविक आवडती अशी कविता असून ती
आपल्यास आवडत नाहीं, व नीटही करवत नाहीं, असा
मीच काय मोठा अपराधी आहें; असा एथें सारालंकारमिश्रित
विशेषोक्त्यलंकार जाणावा.

---

१ कृष्णानें कुब्जेस स्वहस्तानें कसें सरळ केलें हें भागवतांत वर्णिलें आहे.—

प्रसन्नोभगवान्कुब्जांत्रिवक्रांरुचिराननाम् ॥
ऋज्वींकर्त्तुमनश्चक्रेदर्शयन्दर्शनेफलम् ॥६॥
पद्भ्यामाक्रम्यप्रपदेद्व्यंगुल्युत्तानपाणिना ॥
प्रगृह्यचुबुकेऽध्यात्ममुदनीनमदच्युतः ॥७॥

भा०, स्कं० १०, पू०, अ० ४२.

जसीपृथुकतंदुलप्रसृतिआप्तकामातसी ॥
रुचोकृतिसभाग्यतूंसुनयआप्तकामातसी ॥
कण्याविदुरमंदिरींह्मणतिसाधुआस्वादिल्या ॥
खरेंजरिकशातुजप्रभुसिआपुल्यास्वादिल्या ॥ ३८॥

तुला प्रेमभावानें कांहीं दिलें तरी त्याचा तूं स्वीकार करितोस अशी तुझी दया प्रसिद्ध आहे, असा आशय मनांत धरून त्याचें दृष्टांतेंकरून कवि एथें निरूपण करितात.

**पदान्वय—** जसी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा, तसी कृति रुचो, तूं सभाग्य, सुनयआप्त, का मातसी? साधु ह्मणति विदुरमंदिरीं कण्या आस्वादिल्या, जरि खरें, आपुल्या स्वा तुज प्रभुसि कशा दिल्या.

**जसी पृथकतंदुलप्रसृति आप्तकामा,—** जसी- ज्या प्रमाणें, पृथुकतंदुलप्रसृति,- पृथुकतंदुल,- पृथुक- पोहे, त्याचे- तंदुल- तांदूळ- दाणे- अर्थात् पोहे,[1] अथवा त्यांचे कण, त्यांची प्रसृति- ओंजळ- अर्थात् पोह्यांच्या कणांनीं भरलेली ओंजळ, आप्तकामा- आप्त ह्मo प्राप्त, केला आहे काम

---

१ जिरेसाळीचें- आंबेमोहराचे तांदूळ, ह्मणजे जिरेसाळ आंबेमोहर या प्रकाराचे अथवा जातीचे तांदूळ, अशी एथे प्रकारार्थक षष्ठी समजून ति- -चा लोप जाणावा. अथवा, सागूचे तांदूळ ह्मणजे सागूच असी स्वार्थी षष्ठी समजून तिचा लोप जाणावा; अथवा, सागूचे तांदूळ ह्मणजे सागू- -चे दाणे, कण, असा एथे तंदुल शब्देंकरून तद्धान्यविशेषाच्या कणाचें ग्रहण समजावें. हा शेवटला अर्थ एथे विशेषेंकरून प्राह्य दिसतो.

काम- मनोरथ, जिणें अशी; एथें 'झाली' या क्रियापदाचा अध्याहार जाणावा; अर्थात् त्या दरिद्री सुदाम्यास जशी पोह्यांची ओंजळ तुला अर्पण केल्यानें, आणि त्वां त्या पो-ह्यांचा स्वीकार केल्यानें, मनोरथ पूर्ण करणारी झाली, **तशी कृति रुचो,—** तशी, ही माझी' कृति- कवितारूप कृति, तुला' रुचो- आवडो; अर्थात् तुला आवडली म्हणजे मलाहि ही तशी सुदाम्याच्या पोह्या प्रमाणें सफल होईलच; वरकड ' **तूं सभाग्य,—** तूं, तर' सभाग्य- भा-ग्यवंत, अर्थात् सर्वैश्वर्यवान् आहेसच; आणखी' **सुन-यआप्त,—** सुनय- चांगला आहे नय- न्याय, ज्यांचा असे- अर्थात् साधु जन, त्यांचा' आप्त- सखा; असा एथें षष्ठीतत्पुरुष करावा; अथवा, सुनयआप्त- साधुजन आहेत सखे ज्याचे असा तूं, असा बहुव्रीहि करावा; एथें '**सुन-यआप्त**' या शब्दांत 'सुनय' आणि 'आप्त' हे दोन शब्द तसेच ठेऊन त्यांच्या संधीस अवकाश असतां तो केला नाहीं, कारण, प्राकृतांत असा संधि करणें वैकल्पिक होय. अथवा असा विकल्प नमानिला तर, सुनय- नीतिवान्-न्यायी, आणि' आप्त- आत्मीय, असा तूं आहेस, असा समास नकरितां दोन निराळे शब्द करून अर्थान्वय करावा. **का मातसी?-** मग' मातशील- फुगशील[1] काय? अर्थात्

तूं

---

[1] यद्यपि 'मातणें' या क्रियापदाचा निरंतर कुत्सितार्थी प्रयोग आढळतो, तथापि कविनैरंकुश्यानें समयविशेषीं स्तुत्यर्थीहि याचा प्रयोग प्राकृत काव्यांत कोठे कोठे अवलोकनांत येतो.

ब्रह्मानंदें क्रीडती साचार ॥ प्रेमबळें मातोनियां. ॥

तूं सभाग्य असून सुनयआम आहेस, ह्मणून आह्मा दीनां विषयीं तूं आपल्या ऐश्वर्याच्या भरानें फुगून आमचा अव्हेर करणार नाहींस असा एथें प्रश्नराद्धांत जाणावा. आणखी '

**साधु ह्मणति विदुरमंदिरीं कण्या आस्वादिल्यां,—**

**साधु ह्मणति**- साधु, आपली कथा अशी सांगतात, कीं' विदुराच्या घरीं, आपण एकदां नुसत्या कण्याच, **आस्वादिल्या** - खाल्या; **जरि खरें**,- हें त्याचें ह्मणणें जर खरें असलें तर; **आपुल्या स्वा तुज प्रभुसि कशा दिल्या,**— आपला स्वकीय जो तूं प्रभु त्या तुला, (ही एथें चतुर्थी जाणावी, ) **कशा दिल्या**- त्या नुसत्या तांदळाच्या कण्या कशा दिल्या ? त्या विदुराला तशा कण्या देण्याचें कसें धैर्य झालें ? कशी त्यास लाज वाटली नाहीं, असा एथील इंगितार्थ. सारांश प्रेमभावानें कोणी तुला कांहीं दिलें तथापि तूं तें त्याच्या भक्तो स्तव चांगलें'मानून त्याचा स्वीकार करितोस, आणि त्याचें कल्याण करितोस, अशीं उदाहरणें आहेत.

**जिणेंरसपहावयाप्रशिथिलींरदींचाविलीं ॥**
**सुवासहिकळावयाप्रथमनासिकींलाविलीं ॥**
**तुह्मांसशबरीतशींबदरिकाफलेंदेजुनी ॥**
**कथाअशिअसोपहास्वचरितेंतुह्मींमेजुनी ॥३९॥**

आणखी उदाहरण सांगत होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय** - जिणें रस पहावया प्रशिथिलीं, रदीं चा-
-विलीं, सुवास हि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं, तु-
-ह्मांस शबरी तशीं जुनो बदरिकाफलें दे, अशी कथा असो,
तुह्मीं स्वचरितें मेजुनी पहा.

**जिणें रस पहावया प्रशिथिलीं,** - **जिणें** - ज्या
शबरीनें - भिल्लिणीनें, **रस पहावया** - अर्थसंदर्भानें बोरां-
-चा रस पहाण्या करितां. **प्रशिथिलीं**[1] - अत्यंत शिथिल के-
लीं

---

[1] एथें आलेल्या कवीनें 'प्रशिथिलणें' असा नवा मराठींत धातु उत्पन्न केला आहे असें दिसतें. 'श्रथ - दौर्बल्ये' या मूळच्या संस्कृत धातू वरून शिथिल शब्द होऊन त्यास प्रकर्षणार्थी प्र हा उपसर्ग लागून प्रशिथिल शब्द होऊन त्या वरून हा धातु साधला आहे. या प्रमाणें प्रसंगीं स्वेच्छानुरूप शब्द कवि साधिन असतात, व अशा शब्दसाधनानेंच भाषेस प्रौढदशा येत्ये; मुक्तेश्वरानींहि पुढल्या ओवींत **म्लापणें** असा मराठींत धातु उत्पन्न केला आहे.-

झोंटीधरूनिहस्तकें ॥ दुःशासनआंसुडीतवेगें ॥
कृष्णाम्लापोनिदुःखें ॥ भीष्मद्रोणाविलोकी ॥७७ ॥
भारत, आदिप०,अ० १५.

-लीं -बोटानें दाबून ढील केलीं, (असें एथें क्रियापद करावें,) **रदीं चाविलीं,**— रदीं - दांतांनीं चाविलीं; **सुवास हि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं,**—जिणें त्यां बोरां-चा सुवासहि कळावया करितां पहिल्यानें तीं आपल्या, **नासिकीं**-नाकास, **लाविलीं**, अर्थात् हुंगलीं; **तुह्मास शबरी तशीं जुनी बदरिकाफळें दे,**— तुह्माला ती, शबरी - भिल्लीण, **तशीं**- पूर्वीं सांगितल्या प्रकारचीं- **जुनीं**- शिळीं- बाशीं, **बदरिकाफळें** - बोरें, **दे** -देई; (हा एथे ग्रंथी भूतका-ळ जाणावा,) **अशी कथा असो,**— **अशी** - जी रा-मायणीं आपली कथा आहे ती, **असो** - खरी असो; सांप्रत प्रसंगास फार उपयुक्त आहे असा एथील ध्वनि-तार्थ जाणावा. **तुह्मीं स्वचरितें मेजुनी पहा,** - अशीं तुह्मीं आपलीं चरित्रें मोजून पहा; मींच सांगतों असें नाहीं; वाल्मीकादिकांनींहि तीं चरित्रें लिहून ठेविलीं आहेत, व अद्यापि आपल्यास त्यां विषयीं संशय असला, तर आपण-च आपल्या मागील चरित्रांची आठवण करून पहा; असा एथें ‘ मोजून पहा ’ या शब्दांनीं कवीनें आपला ह्रद्गत अर्थ सुचविला.

कोठें ‘ **कथा अशि नसो** ’ असा पाठ आहे. अशी- भिल्लणीचीं उष्टीं बोरें आपण खाल्लीं ह्मणून जी कथा आहे ती खरी नसो; - अर्थात् ही कथा खरी असून तिचा मि-थ्या निषेधरूप विरोध दाखवून त्याचें कवीनें ‘ तुह्मीं स्वचरितें मेजुनी पहा ’ या विधानेंकरून निवारण केलें आहे, ह्मणजे मेजून पाहिलें असतां अशी कथा खरी आहे

असें

असें दिसेल; ह्मणून विरोधाभास[1] अलंकारानें एथें कवीनें निषेधार्थाचा विध्यर्थ दाखविला आहे; असा अर्थ तसा पाठ असतां समजावा.

या प्रमाणें कवीनीं तेतिसाव्ये केके पासून तर या केके पर्यंत आपल्या यथामति केलेल्या स्तुतीचा स्वीकार करावा ह्मणोन प्रभूची प्रार्थना केली आहे; असा यांचा तात्पर्यार्थ समजावा.

---

१ साहित्य दर्पणांत विरोधाभास प्रकरणीं- ' हरोऽपि शिरसा गंगां न धत्तें ' असें दाखवून ' त्वद्वाजी , येणेंकरून त्याचें समाधान केलें आहे ह्मणून उदाहरण दिलें आहे, तसें एथेंहि जाणावें, असें मला याटलें.

प्रभोशरणआलियावरिनव्हाकधींवांकडे ॥
ह्मणोनिइतुकेंचहेंस्वहितकृत्यजीवांकडे ॥
प्रसादकरितांनसेपळविलंबबापाखरें ॥
घनांबुनपडेमुखींउघडिल्याविनापाखरें ॥ ४० ॥

शरणागता वरं अनुग्रह करण्या विषयीं प्रभूचें औत्सु-क्य स्तवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— प्रभो शरण आलिया वरि कधीं वांकडे नव्हा, ह्मणोनि जीवां कडे इतुकेंच हें स्वहितकृत्य, प्रसाद करितां पळ विलंब नसे, बापा खरें, पाखरें उघडिल्या विना मुखीं घनांबु नपडे.

**प्रभो शरण आलियां वरि कधीं वांकडे नव्हा,**— **प्रभो**- हे प्रभु- हे स्वामी, **शरण आलिया वरि**-तुह्मास कोणीहि मनोभावेंकरून शरण आल्या [1]वर मग त्याशीं तुह्मी **कधीं**-कदापि, **वांकडे नव्हा**-वांकडे होत नाहीं; अर्थात् त्याचा आपण अंगीकार करित नाहीं असें आपणा कडून कदापि होत नाहीं;[1] अर्थात् त्याचा आपण अंगीकार करिता; **ह्मणो-**

**नि**

१ शरणागताची उपेक्षा भगवान् कदापि करित नाहीं ह्मणोन तुकोबा सांगतात.

निष्ठावंतभाव,भक्ताचास्वधर्म
निर्धारेंहेंवर्म चुकोंनये ॥
निष्कामनिश्चळ विठ्ठलींविश्वास
पाहोंनयेआस आणीकांची ॥
तुकाह्मणेऐसा कोणउपेक्षिला
नाहींआयिकीला ऐसाकोण्ही ॥

-नि **जीवां कडे इतुकेंच हें स्वहितकृत्य,— ह्मणोनि-** असा आपला शरणागतां वर अनुग्रह करण्याचा स्वभाव आहे ह्मणोन, **जीवां कडे** - ईश्वरापासून पराङ्मुख आणि संसारनिमग्न जीं आह्मा सारिखीं मनुष्यें त्यां कडे, **इतुकेंच हें स्वहितकृत्य,—** तुला शरण जावें एव्हढेंच काय तें आतां **स्वहितकृत्य** - आपलें हितकारक[1] कृत्य- अथवा आपल्या कल्याणाचें कृत्य - कर्तव्य कर्म राहिलें आहे; तुला शरण गेल्या वर मग **प्रसाद करितां पळ विलंब नसे,— प्रसाद करितां**- तुला त्या शरणागतां वर प्रसाद- अनुग्रह, करितांनां, **पळ** - पळमात्रहि, ( हें एथें क्रियाविशेषण करावें, ) **विलंब नसे** - विलंब लागत नाहीं; अथवा, ' **पळविलंब** ' पळाचा - पलावधि - पळभर - जो विलंब, असा कर्मधारय करून हें संयुक्त नाम करावें. शरण जाण्याची तरी मध्यें आडकाठी कशास पाहिजे अशी एथें आशंका मनांत आणून तिचें समाधान करित होत्साते कवि ह्मणतात;— **बापा खरें, बापा**- अरे बापा, शरणागताचे अपराध बापा प्रमाणें तूं पोटांत घालून त्यांज वर कृपा करितोस ह्मणून हे तात, **खरें**- तूं तत्काळ अनुग्रह करितोस हें खरें आहे; तथापि **पाखरें**[2] **उघडिल्या विना मुखीं** घनांबु

१ हित हा शब्द विशेषणाहि आहे आणि नामहि आहे.

२ यद्यपि 'पांखरूं' असा मराठी शब्द भाषारूढींत फार आहे, तथापि एथें यमका करितां ' पाखरूं' असाच शब्द लिहिला आहे. व तो मराठींत- कोंकरूं, लेंकरूं, वासरू, इत्यादि पुष्कळ शब्दां प्रमाणें सानुनासिक व निरनुनासिकाहि

**घनांबु नपडे,**— पाखरें- पाखरानें- अर्थसंदर्भानें चात-
-कपक्ष्यानें, उघडल्या विना- अर्थात् तोंड उघडल्या वांचून,
मुखीं- तोंडांत, घनांबु- पावसाचा थेंब, नपडे- पडत नाहीं;
यद्यपि पाऊस सर्वत्र पडतो, आणि चातकाच्या मुखांत पडकि
असेंहि त्याचें धोरण असतें, तथापि त्या पक्ष्यानें तो पाव-
-साचा थेंब घेण्यास आपलें तोंड तर वासलें पाहिजे; जसें,
तसें आपण घना सारिखे दयालु अहां खरे, परंतु आह्मां पाम-
-रांनीं आपली प्रार्थना तर केली पाहिजे, इतकेंहि आह्मीं न
केलें, तर आपण काय कराल, आह्मीच दोषी होऊं. हा
एथें दृष्टांत अलंकार जाणावा. एथें कवीनें हा चातक प-
-क्ष्याचा दृष्टांत फार सौरस्यंकरून दिला आहे. येणेंकरून
भगवत्स्तवनाची स्वकल्याणास अवश्यकता दर्शवून अल्प
प्रयासाचें महत्फलहि प्रकट केलें आहे.

---

सिकहि असतो; या कारणा स्तव, व मूळ 'पक्ष' शब्दा वरून 'पाखरूं' शब्द व्युत्पन्न आहे, या कारणा वरून, एथें 'पाखरूं' असाच मूळचा कवीचा शब्द असावा अशी कल्पना करायास सबळ कारण दिसतें.

शिवेनतुझियापदाअदयताख्यदोषक्षण ॥
प्रभोचुकतसोंतऱ्हीकरिसितूंचसंरक्षण ॥
नसेचिशरणागतीघडलिसत्यअद्यापिती ॥
रुचेविषयज्यामिळेअमृततेनमद्यापिती ॥ ४१ ॥

वरल्या केकेंत 'प्रभोशरणआलियावरिनव्हाकधीं वांकडे' येणेंकरून कवीनीं प्रथम अदयतेचें विधान इंगित करून पुढें तिचा निषेध दर्शविला आहे, तोच स्वाभिप्राय अर्थांतरानें प्रस्फुट करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** प्रभो अदयताख्य दोष तुझिया पदा क्षण न शिवे, चुकतसों तऱ्ही तूंच संरक्षण करिसि, अद्यापि ती शरणागती सत्य घडलि नसेचि, विषय रुचे, ज्या अमृत मिळे ते मद्या न पिती.'

**प्रभो अदयताख्य दोष तुझिया पदा क्षण न शिवे,—** प्रभो- हे प्रभो- हे दीनदयाला, अदयताख्यदोष,- अदयताख्य,[1] - अदयता - निर्दयपण, आहे ' आख्या - नाम, ज्याचें' असा, दोष- दूषण,- अर्थात् ज्याला निर्दयपण ह्मणून ह्मणतात तें दूषण, तुझिया- तुझ्या, पदा- पदाला- पायाला अथवा स्थानाला, क्षण - एक क्षणहि, न शिवे - शिवत

१ 'अदयता' यांत अदय शब्दावरून भावार्थी संस्कृतांत तासिल् प्रत्यय होऊन पुढें स्त्रीलिंगीं टाप् झाला आहे, आणि पुढें बहुव्रीहि होऊन पुढील पुल्लिंग शब्द दोष याचें तें पद विशेषण आहे ह्मणून 'आख्या यांत शेवटल्या आचा लोप झाला आहे; पहा माझें महाराष्ट्र व्याकरण, तिसरी आवृत्ति, नियम ५६७, पृ० २८७.

शिवत नाहीं - स्पर्श करित नाहीं; ( एथें 'क्षण,' हा शब्द क्रियाविशेषण होय. ) निर्दयपण ह्मणून जें दूषण आहे तें तुझ्या पायास क्षणभरहि शिवत नाहीं; एथें पायास शिवत नाहीं असें ह्मटल्यानें कवीनें आपली विनयोक्ति दर्शविली; अर्थात् आपण अत्यंत सदय अहां ह्मणून ' **चुकतसों तऱ्हीं तूंच संरक्षण करिसि,**— आह्मीं चुकतों अर्थात् अपराध करितों तथापि तूंच आमचें संरक्षण करितोस; ते आमचे अपराध मनांत आणून आह्मास दंड करावा तो नकरितां उलटें आमचें चांगल्या रीतीनें रक्षण करितोस; अशी तुझी जगविख्यात कीर्ति आहे; परंतु ' **अद्यापि ती शरणागती सत्य घडलि नसेचि,— अद्यापि** - हा वेळपर्यंत, **ती शरणागती** - तसा शरणागतभाव- अर्थात् मीं आपल्यास शरणागत असतां अद्यापि माझी तशी स्थिति ह्मणजे तुझ्या अनुग्रहानें अनुभावित केलेली जी परमानंद रूप स्थिति, ती, **सत्य**-खरेंच सांगतों, **घडलि नसेचि**- मला घडली नाहींच; न घडल्याचें प्रमाण पहा' **विषय रुचे,**—मला अद्यापि' विषय- वैषयिक पदार्थ - अनश्वर असारभूत असा जो हा प्रपंच तो, **रुचे** आवडतो; **ज्या अमृत मिळे ते मद्या न पिती,**—ज्याला अमृत मिळतें ते, **मद्या, मद्य**-दारू, त्यातें, कदापि पित नाहींत; अर्थात् आपल्या अनुग्रहानें प्राप्त जें परमानंदरूप अमृत, तें जर मला मिळतें, तर मग हे मद्यरूप वैषयिक पदार्थ मला न आवडते;' हे ज्या पेक्षां मला आवडतात त्या पेक्षां तुझा

अनुग्रह

---

१ ज्यांस भगवंताच्या भक्तिप्रेमरसाची गोडी लागल्ये, ते इंद्रादि देवांच्या

अनुग्रह मज वर नाहीं हें सिद्ध होय, असा एथे कवीचा बोलण्याचा कटाक्ष जाणावा. एथें आणखी कवीनें 'अमृत' शब्दाची योजना श्लेषानें केली आहे. अमृत शब्दाचा अर्थ सुधा आणि मोक्ष[1] प्रसिद्ध आहे, तसेच वैषयिक पदार्थ मोहक आणि मादक आहेत, ह्मणून त्यांचे उपमेस मद्यग्रह-णही यथार्थ होय. हा एथें चौथ्या चरणांत अर्थांतरन्यास अलंकार होय.

---

च्या ऐश्वर्यांसहि इच्छित नाहींत, मग हे पामर विषयभोग त्यांस कोठून आवडणार.—

ननाकपृष्टंनचसार्वभौमं नपारमेष्ठ्यंनरसाधिपत्यं
नयोगसिद्धीरपुनर्भवंवा वांछंतियत्पादरजःप्रपन्नाः॥३७॥
भागव०, स्कं १०, अ० १६.

१ पीयूषममृतंसुधा
अमर.
मुक्तिःकैवल्यनिर्वाणश्रेयोनिःश्रेयसामृतं
अमर.

विपाकनगणोनिम्यांप्रकटआपुल्याघातकें ॥
कळोनिअमितेंबळेंविविधजोडिलींपातकें ॥
क्षमस्वभगवन्नजामिलसखोऽस्मिऐसेंतुला ॥
ह्मणेंनमुनियांसुदुस्तरविपन्नदीसेतुला ॥ ४२ ॥

मागल्या केकेंत कवीनीं आपली प्रपंचासक्ति दर्शविली, तोच आपला अपराध कथित होत्साते त्या विषयीं एथें भगवंताची क्षमा भाकितात.

**पदान्वय**— प्रकट आपुल्या घातकें म्यां विपाक न गणोनि अमितें विविध पातकें कळोनि बळें जोडिलीं; सुदुस्तरविपन्नदीसेतुला तुला भगवन् अजामिलसखोऽस्मि क्षमस्व ऐसें नमुनियां ह्मणें.

**प्रकट आपुल्या घातकें म्यां विपाक न गणोनि अमितें विविध पातकें कळोनि बळें जोडिलीं;**— **प्रकट आपुल्या घातकें म्यां,**— प्रकट- स्पष्ट- उघडा- निःसंशय, **आपुल्या घातकें**- आपला घातक- घात करणारा जो मीं त्याणें, **विपाक**- परिणाम- अर्थात् वैषयिक पदार्थांवर अद्यापि आपली रुचि आहे ह्मणून मागल्या केकेंत आपला भावार्थ प्रकट करून तेणेंकरून जो आपला दोष सुचविला त्याचा परिणाम, **न गणोनि**- नगणतां-नविचारितां- अर्थात् तुच्छ करून, **अमितें**- ज्यांस मीति नाहीं- असंख्य- पुष्कळ, आणि **विविध** - नाना प्रकारचीं, अशीं **पातकें**

-कें - पापें, **कळोनि** - जाणून बुजून - बुद्धया, **बळें** - दाटून - स्वप्रेरणेनें, **जोडिलीं** - संपादिलीं; सारांश भगव-द्भक्तीपासून पराङ्मुख होऊन नाशवंत आणि क्षणभंगुर अशा प्रपंच्याचीच आवड म्यां धरिली, अतएव असा स्पष्ट आत्मघातकी जो मीं त्या म्यां अशा माझ्या दुर्वृत्त आ-चरणाचा काय परिणाम होईल हेंहि मनांत नआणितां असं-ख्य आणि नाना प्रकारचीं अशीं पातकें, तींही बुद्धया आणि स्वप्रेरणेनें, आचरिलीं; तस्मात् मीं महत्पापी केवळ दंडास योग्य आहें अशी भीति मनांत आणून कवि प्रार्थितात

**सुदुस्तरविपन्नदीसेतुला तुला भगवन् अजामि-ळसखोऽस्मि क्षमस्व ऐसें नमुनियां ह्मणें,— सुदुस्तर-**-विपन्नदीसेतुला तुला,- **सुदुस्तर** - तरायास अत्यंत कठीण, अशी जी **विपन्नदी**[१] - **विपत्** - विपत्ति- दुःख, तद्रूप जी नदी, तिच्या **सेतुला**- तिचा सेतु-पूल-धरण- एतद्रूप जो तूं त्या, **तुला**-तुज कारणें, **भगवन्**-हे भगवान्, **अजामिळसखो-ऽस्मि**[२] - मीं **अजामिळसख**- अजामिळाचा सखा-अर्थात् अजामिळा सारिखा महत्पापी, **अस्मि**- आहें, ह्मणोन **क्षम-स्व**

---

१ मज जवळ ज्या दोन प्रति आहेत, त्यांत ' भवन्नदीसेतुला ' अ-सा पाठ आढळतो, आणि बहुधा जेथे तेथे तोच पाठ ऐकण्यांतहि येतो; या पाठानें मला फार घोटाळ्यांत घातलें होतें, परंतु शेवटीं सोलापुराहून रामचंद्र विद्याधर जोशी यांज कडून ' विपन्नदीसेतुला' हा खरा पाठ आणविल्या वर माझें समाधान झालें.

२ एथें ' भगवन्नजामिळ 'यांत ' भगवन् 'या शब्दांतील अंत्यनकारास 'ङमोऱ्हस्वादचिङमुण्नित्यं ' या सूत्रा वरून द्वित्व झालें आहे.

स्व - क्षमा कर, [1] ऐसें - असें, **नमुनियां** - नमून - विन-
-यपूर्वक, **ह्मणें** - ह्मणतों- माथितों; अर्थात्, या अपार संसा-
-रांतून पार उतरविणारा जो तूं त्या तुला आतां इतकेंच मा-
-र्थितों कि हे भगवान् मीं महत्पापी आहें, मला क्षमा कर.

एथें तिसऱ्या चरणांत ' **ऐसें** ' असा जो पाठ आहे तो माझ्या मतें ' **ऐसे** ' असा पाठ असावा; ह्मणजे पुढील चव-थ्या चरणाच्या यमकास अनुरूप होऊन अर्थासहि अनुकूल होईल. - **सुदुस्तरविपन्नदीसेतुला ऐसे तुला नमुनियां ह्मणें,** — सुदुस्तरविपन्नदीसेतुला, ऐसे - अशा, [2] तुला नमून ह्मणतों; असा एथें पदान्वय करावा.

---

१ ' क्षमस्व ' हें ' क्षम - सहने ' या धातूचें आत्मने पदीं लोटाचें रूप होय.

२ ऐसे- हें ' ऐसा' या सर्वनामाचें सामान्यरूप ग्रंथभाषेच्या नियमानें आढळतें. अमृतानुभवांत ज्ञानेश्वरानें ह्मटलें आहे;—

जेंवितोचिचेताचेववी ॥ तैसाबुझेंबुझावी ॥
गुरुशिष्यत्वेंनांदवी ॥ ऐसेनिहा ॥ ११ ॥

प्रकरण २.

आणखी ज्ञानेश्वरींत—

उन्हाळेंनीनतापे ॥ हिमवंतींनकांपे ॥
कायसेनेंहीनवासिपे ॥ व्योमजैसें ॥ ६० ॥

—— अ० १३.

इयेशरीरींचीमाती ॥ मेळवीनतियेक्षिती ॥

ओ० १०२.

या उदाहरणांत ' ऐसेनी, ' ' उन्हाळेंनी, ' ' कायसेनें, ' ' इये, ' इत्यादि सर्व ' ऐसा, ' ' उन्हाळा, ' ' कायसा, ' ' हा, ' या आकारान्त शब्दांचीं ग्रंथभाषे प्रमाणें सामान्यरूपें होत. त्याच प्रमाणें ऐसा याचें ऐसे हें सामान्यरूप.

'क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि' हें सारें प्रार्थनारूप पद कवीनीं एथें गीर्वाण भाषेंत ठेविल्यानें आपल्या प्रार्थनारूप उक्तीस गोडता आणून तद्द्वारा आपला सरलभावहि प्रकट केला आहे.[1]

1 या प्रमाणें प्रसंगोपात्त सारीसंस्कृत फक्किकेची फक्किका कधीं कधीं आपल्या काव्यांत प्रविष्ट करण्याची मोरोपंताची चाल आढळण्यांत येत्ये; हें दाखविण्या करितां सभापर्वांतील एक आर्या खालीं लिहितों,—

ब्रूयात्क्षमीग भीरोऽसीतिबतयुधिष्ठिरंप्रभुंकोन
निजनीचपणप्रकटिसीतूंश्वानभल्यावराहिभुंकोन.

**नव्हेअनृतसत्यतेंअचळऊचलीलाकरें॥**
**तुवांहरिमदापहेंबृहदुदारलीलाकरें ॥**
**समुद्धरसिएकदांजरिजडाशियाकर्दमीं ॥**
**ह्मणेनभुवनत्रयींतरितुलाभलामर्दमीं ॥ ४२ ॥**

मागील केकेंत कवीनीं भगवंतास विपन्नदीचा सेतु ह्मणून विशेषण दिलें होतें, तेंच आपला भावार्थ विस्तृत करून पुनः प्रार्थितात.

**पदान्वय**— हरि तें अनृत नव्हे, सत्य, मदापहें बृहदुदारलीलाकरें तुवां करें अचळ उंचलीला, जरि या जडाशि कर्दमीं एकदां समुद्धरसि, तरि मीं तुला भुवनत्रयीं भला मर्द ह्मणेन.

**हरि तें अनृत नव्हे,**— **हरि** - हे हरी - हे मत्कृत सर्व दोष हरण करणाऱ्या प्रभो, ( एथें कवीनें हें जें हरि[१] या नामानें संबोधन दिलें आहे, तें पूर्वील केकेंत 'अजा- -मिलसखोऽस्मि,' व त्या मागें 'रुचे विषय' अशा उक्तींनीं जें आपलें सदोषत्व प्रकट केलें होतें त्या वर कटाक्ष ठेवून दिलें आहे, ) **तें अनृत नव्हे,**-**तें**-आपल्या करें अचळ उचलिला ह्मणून जें पुढें सांगायाचें तें, **अनृत** - मिथ्या, **नव्हे** - नाहीं; तर

१ हरि शब्दाचा अर्थ व्यासानें असाच केला आहे;—

हराम्यघंहिस्मर्तृणां हविर्भागंक्रतुष्वहं ।
वर्णश्चमेहरिःश्रेष्ट स्तस्माद्धरिरहंस्मृतः ॥

व्यासवचन.

तर ' **सत्य** — तें खरेंच आहे, एथें कवीनें ' अनृत नव्हे ' अशा निषेधवादानें एकदां खंडन करून, पुनः ' तें सत्य ' या पदांनीं सत्यत्वाचा अनुवाद केला आहे, येणें-करून आपल्या विधेय वादास दार्ढ्य आणिलें, ह्मणून हा एथें प्रतिषेध अलंकार होय. यांत ' होय ' या क्रियापदाचा ' सत्य ' शब्दा पुढें अध्याहार जाणावा. तें सत्य कोणतें अशी पृच्छा केली असतां कवि सांगतात ' **मदापहें बृहदुदारलीलाकरें तुवां करें अचळ ऊचलीला,—मदापहें,-मद-** पूर्वीं एकेचाळीसावे केकेच्या शेवटीं 'ज्या नमिळे अमृत ते न मद्या पिती' या वाक्यांत कवीनें वैषयिक पदार्थास मद्याची उपमा दिलीच आहे, त्या मद्यानें उत्पन्न केली जी गुंगी-अर्थात् प्रपंचनिमग्नतेनें प्राप्त झाली जी अज्ञानावस्था तो मद, त्याचें **अपहनन** - नाश, करणारा तो **मदापह** त्याणें, ( ही एथें कर्तरि तृतीया ). एथें ' **हरि** ' हे संबोधन, आणि ' **मदापह** ' हें विशेषण, या दोन पदांचा परस्परदक् हेतुहेतुमद्भावसंबंध दिसतो, - तूं मदापह आहेस ह्मणून मत्कृत पापाचेंहि हरण तूंच करशील, असा एथें संबंध दर्शवित होत्साते कवीनें ' **हरि** ' हें संबोधन दिलें आहे असें दिसतें. अथवा, **हरिमदापहें** - **हरि** - सूर्य - [१] अर्थात्

सूर्या

---

१ यमानिलेंद्रचंद्रार्कविष्णुसिंहांशुवाजिषु ।
शुकाहिकपिभेकेषुहरिर्नाकपिलेत्रिषु ॥
अमर.

सिंहोमृगेंद्रःपंचास्योहर्य्यक्षःकेसरीहरिः ।

सूर्या सारिखे उग्रप्रतापी जे रावणकंसा सारिखे, अथवा, हरि - सिंह[1] - अर्थात् सिंहा सारिखे पराक्रमी जे हिरण्य-कशिपुबलिदुर्योधनादिकां सारिखे भूपाल, अथवा, हरि - शूक[1] - पोपट - अर्थात् क्रीयाहीन असतां केवल पोपटासारिखे वाचालमात्र असे जे वाग्पंडित, अथवा, हरि - अग्नि[1] - अर्थात् अग्नी सारिखे दुसऱ्याच्या अंतःकर-णास पोळणारे जे दुष्ट जन, - अथवा सर्व गोकुलाचा नाश करणारा जो दावाग्नि तो, या सर्वांचा ⁄ मद - गर्व, त्याचा नाश करणारा जो तूं त्या त्वां; अथवा, हरि - यम[1] - कृतां-तरूप जो काल त्याचा, मी सर्व भुवनत्रयाचा संहार कर-णारा ह्मणून, जो मद ह्म० गर्व; अथवा, हरि - इंद्र[1] - हा एकदां अतिवृष्टी पाडून सर्व गोकुलाचा नाश करण्यास उद्युक्त झाला होता तेव्हां त्वां आपल्या आंगठीनें गोवर्धन उचलून त्याच्या छत्रा खालीं सर्व ब्रजवासी प्राण्याचें रक्षण करून तेणें-करून त्या इंद्राच्या मदाचा त्वां नाश केला अशी जगप्र-सिद्ध तुझी कीर्ति आहे, अशा, आणि ⁄ बृहदुदारलीलाकरं,- बृहद् -अत्यंत-आणि ⁄ उदार-मोठी-प्रशस्त, अशी जी ⁄ ली-ला-विलास, तीतें ⁄ कर - करणारा, अर्थात् जगदोत्पत्त्यादि आश्चर्यकारक क्रिया करणारा जोतूं अशा, अथवा, बृहद् आणि उदार जी लीला, तिचा ⁄ आकर-खाण-ह्मणजे कर्तुमं-कर्तुमन्यथाकर्तुं समर्थ जो तूं अशा, तुवां - त्वां, करें- हा-तानें- अर्थात् आपल्या हातानें, अचळ - पर्वत - अर्थसं-दर्भानें गोवर्धन नामा पर्वत, ऊचलीला - उचलिला - उ-चलून अंगुली वर धारण केला; हें आपलें वृत्त अनृत नाहीं

सत्यच

सत्यच आहे, असा एथें पदांचा अन्वय करावा. असा तूं महान् समर्थ आहेस खरा परंतु **जरि या जडांशि कर्दमीं एकदां समुद्धरसि,**- जर, **या जडास** - एथें कवि आपल्यास दाखवून ह्मणतात मीं जो तुझी प्रार्थना करणारा जड - मूढ, या मला मूढास, **कर्दमीं** - ( एथें '**या**' या पदाचा पुनरन्वय करावा, ) हा जो संसार रूप **कर्दम** - चिखल, या चिखलांत - अर्थात् चिखलांतून, ( एथें ही अपादानार्थी सप्तमी जाणावी; )-अथवा या संसाररूप चिखलांत रुतलेला असतां, जर, **समुद्धरसि** - चांगल्या रीतीनें माझा उद्धार करशील - अर्थात् मला यांतून बाहेर काढशील; एथें कवीनें आपल्यास जड ह्मटल्यानें जडत्वधर्मानें प्रपंचकर्दमांत जें आपलें निमज्जन त्याचें गांभीर्य सुचविलें, ह्मणूनच पुढें आणखी आपल्या उद्धरणाचें किंचित् दौष्कर्य्य दाखवून **समुद्धरसि** ह्मटलें, येणेंकरून पुनरपि या संसाराच्या येरजारा जर समूळ चुकवून-अक्षय पदीं नेशील असा आपला त्वद्गतार्थ दर्शविला आहे; **तरि मीं तुला भुवनत्रयीं भला मर्द ह्मणेन,**— **तरि** - तरच, **मीं तुला**, **भुवनत्रयीं**- या त्रिभुवनांत, **भला**, **मर्द** - पराक्रमी, **ह्मणेन**; - सारांश त्वां आपल्या उदार लीलेनें गोवर्द्धनोद्धारणादि मोठे पराक्रम केले हें खरें आहे, परंतु, जर त्वां माझा उद्धार केला तर हें सर्व खरें, आणि तेव्हांच मीं तुला खरा पराक्रमी असें ह्मणेन; - अर्थात् जों पर्यंत तुझ्या कृपेचा मला अनुभव नाहीं तों पर्यंत जरीं गोवर्द्धनोद्धारणादि तुझ्या कृपेचीं महत्कृत्यें प्रसिद्ध आहेत,

तरीं

तरी त्या मला केवळ कथा होत; माझ्या उपयोगास ना-
-हींत, ह्मणून तूं माझा उद्धार कर अशी एथें कविन्दद्वत
प्रार्थना जाणावी. आणखी, एथें 'भला मर्द' हे शब्द योजि-
-ल्यानें कवीनें आपलें जडत्वाधिक्य सुचवून तेणेंकरून आ-
पलें दोषाधिक्यहि सुचविलें; ह्मणजे गोवर्धनोद्धारणापेक्षां
मदुद्धरण अत्यंत दुष्कर, ह्मणून हें दुष्कर कार्य जर तूं
करशील तर तूं मर्द' खरा असाहि आणखी एथें कविन्दद्व-
-तार्थ ध्वनित होतो.

**चिकित्सकभलाभलाह्मणुनिफारवाखाणिला ॥**
**जरींबहुजनामयद्रुमसमूळहीखाणिला ॥**
**तथापिअतिदुःसहस्वगदशत्रुच्याअत्यया ॥**
**विनानह्रदयींधरीसरुजपामरप्रत्यया ॥ ४४ ॥**

आपण गोवर्धनोद्धारणादि जरीं महत्कृत्यें केलीं, तरी त्या आपल्या सदयताजन्य पराक्रमाचा मला अनुभव आला पाहिजे ह्मणून मागल्या केकेंत कवीनें आपला अभिप्राय दर्शविला, तोच अर्थ एथें दृष्टांतानें विशद करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— बहुजनामयद्रुम समूळ ही खाणिला, ह्मणुनि भला भला चिकिंत्सक जरीं फार वाखाणिला, तथापि अतिदुःसहस्वगदशत्रुच्या अत्यया विना, पामर सरुज ह्रदयीं प्रत्यया न धरी.

**बहुजनामयद्रुम समूळ ही खाणिला,**— बहुजनामयद्रुम, - **बहुजन** - पुष्कळ लोक, त्यांचा जो / **आमय** - रोग,[1] तोच कोणी एक / **द्रुम**- वृक्ष, **समूळ** - मूळासह (हें एथें क्रियाविशेषण अव्यय जाणावें), **खाणिला**- खणून टाकिला - उपटून टाकिला; अर्थात् बहुजनांचा रोग अगदीं घालविला; **ह्मणुनि भला भला चिकित्सक जरीं फार वाखाणिला,**-ह्मणून-बहु जनांचा रोग घालविला

१ रोगव्याधिगदामयाः "
अमर.

-ला ह्मणून, भला भला-फार चांगला, चिकित्सक-वैद्य,[1] जरीं, वाखाणिला - स्तविला; अथवा, भला भला-चिकित्सक ह्मणुनि फार वाखाणिला, आणि त्याणें जरीं बहुजनामयद्रुम समूळ ही खाणिला, असा अन्वय करावा; सारांश हा वैद्य अ-त्युत्कृष्ट, याणें पुष्कळ लोकांचा रोग अगदीं नाहींसा केला, ह्मणून जरीं त्याची फार वाखाणणूक केली; तथापि अ-तिदुःसहस्वगदशत्रुच्या अत्यया विना,— तथापि, अतिदुःसहस्वगदशत्रुच्या, - अतिदुःसह— अत्यंतदुः-सह, जो स्वगद-आपला रोग,[2] तद्रूप जो शत्रु, त्याच्या, अत्यया विना - नाशा शिवाय; सारांश आपल्या रोगाचा नाश झाल्या वांचून, पामर सरुज त्हदयीं प्रत्यया न धरी.— पामर - दीन - रोगानें बापुडवाणा झालेला,

असा

---

१ रोगाचें निदान शोधून त्या वर सूक्ष्म विचार करून उपचार करणाऱ्या वैद्यास चिकित्सक ह्मणावें.

चिकित्सारुक्प्रतिक्रिया

अमर.

भिषक्वैद्यौचिकित्सके

२ रोगव्याधिगदामयाः

अमर.

असा जो ' सरुज - रोगी,[१] तो ' व्हदयीं - आपल्या व्हदयांत, प्रत्यया- अनुभव जनित प्रमाणा, - न धरी - धरित नाहीं; अर्थात् मानित नाहीं; सारांश जों पर्यंत आपला रोग गेला नाहीं, तों पर्यंत जरीं मोठा धन्वंतरी असला, आणि त्याणें पुष्कळांचे रोग घालविले असले, तरीं जसा त्या रोग्याच्या अनुभवास तो वैद्य येत नाहीं, तसें तुह्मीं गोवर्द्धनोद्धारणादि महत्पराक्रम केले, तरीं ते माझ्या अनुभवास येतील तेव्हां खरे, अर्थात् माझा उद्धार झाला पाहिजे, असा एथें कवित्हृद्गत अर्थ जाणावा.

---

१ ' रुज् - रोगे ' या धातू वरून ' अच् ' प्रत्यय होऊन रुजा ह्मणजे रोग असा स्त्रीलिंगीं शब्द सिद्ध होऊन त्या मागें स हा उपसर्ग लागून सदय, सभार्य, या प्रमाणें सरुज, असा शब्द सिद्ध झाला आहे.

स्त्रीरुग्रुजाचोपतापे.

अमर.

म्हणामजउताविळागुणचिघेतलाघाबरें ॥
असोमनअसेंचिबाभजकबर्हिमेघाबरें ॥
दिसेक्षणिकसर्वहीभरंवसाघडीचाकसें ॥
धरीलमनआधिनेंबहुपरिश्रमेचाकसें ॥४५॥

मागल्या तीन केकांत कवीनीं स्वोद्धरणा विषयीं आप-लें अत्यौत्सुक्य दर्शविलें तें उचित होय असा स्वाभिप्राय कवि पुढल्या चार केकांत प्रकट करितात.

**पदान्वय** — मज उताविळा म्हणा, गुणचि घेतला. या मन असेंचि घाबरें असो, बर्हिमेघा भजक, बरें, सर्व ही क्षणिक दिसे, आधिनें चाकसें बहु परिश्रमे, मन घडीचा भरंवसा कसें धरील.

**मज उताविळा म्हणा,** - मला उतावळा म्हणत अस-ल्यास सुखें म्हणा; कारण ✓ **गुणचि घेतला,** - म्यां तुम-चा गुणच घेतला; अर्थात् मीं पापी दंडार्ह असून तुम्ही दु-ष्टांस दंड करणारे अहां, तेव्हां तो तुमचा दुष्टदंडकत्वगुणा-चा विचार नकरितां केवळ तुमचें दयालुत्व हाच गुण घे-तला, म्हणजे त्याच गुणाचें स्तवन केलें;[1] एथें चि या अव-धारणार्थक अव्ययानें इष्टगुणव्यतिरिक्त इतर गुणांची व्या-वृत्ति

१ 'गुण घेणें' म्हणजे कोणा एकाच्या सद्गुणाचें स्तवन करणें अशी भाषारुढि आहे. 'तो त्याचे फार गुण घेतो' म्हणजे त्याचे चांगले गुण वाखाणितो असा अर्थ.

-वृत्ति दाखविली. **बा मन असेंचि घाबरें असो**, -बा- हे बापा - हे दीनवत्सला, **मन** - अर्थात् माझें मन, **असेंच घाबरें असो**, - ह्मणजे तुमचा दुष्टदंडकत्वगुण मनांत नआणितां केवळ दयालुत्व हाच गुण घेतला, हें त्या मना-च्या घाबरेपणाचें लक्षण तसेंच अबाधित असो. घाबरेपणानें एका गोष्टीची विस्मृति होऊन अन्य गोष्टीचेंच ग्रहण होतें. एथें जी मला तुमच्या दुष्टदंडकत्वाची विस्मृति झाली ती मला इष्टच आहे, असा एथें ' असेंचि मन घाबरें असो ' या वा-क्यानें ध्वनितार्थ होतो. यास दृष्टांत‘ **बर्हि मेघा भजक**,- बर्हि - **मोर**,[1] **मेघा**- मेघाला, **भजक** - भजकच; अर्थात् गुणच घेणारा[2] असावा; ह्मणजे‘ **बरें**,- उत्तम; ( हें एथें अ-व्यय होय ) अथवा, **मोर** हा शब्द मराठींत विकल्पें नपुंसक होतो, ह्मणून तत्पर्यायवाचक **बर्हि** शब्दहि नपुंसक करून, पुढील ' **बरें** ' हें पद त्याचें विशेषण करून एथें पदान्वय करावा; ह्मणजे‘ **बर्हि मेघा भजक बरें** '—मोर मेघाला भ-कच बरें; अर्थात् मेघ पाहिला असतां मोरास स्वभावतः आनंद होतो. एथें कवीनीं मोराचा दृष्टांत फार सुंदर सम-योचित

---

१ मयूरोबर्हिणोबर्हीनीलकंठोभुजंगभुक्-

अमर.

२ ' भज - सेवायां,' या मूळ संस्कृत धातू वरून ' भजक ' हें एथें धातुसाधित विशेषण जाणावें. भजन ह्मणजे सेवन, ग्रहण, अर्थात् प्रेमपुरःसर गुणग्रहण.

वामन पंडित भरतभावांत ह्मणतात;—

नाहींतरीयाअथवानकांहीं गुरूसबोलेलघडेलकांहीं ।
रामानिमित्तेंगुरुहीत्यजावा वाक्यांतभावार्थअसाभजावा॥

-योचित घेतला आहे; कारण, यद्यपि समयविशेषीं मेघ त- -डित्वान् आणि स्तनित असे असतात, ह्मणजे वीज आणि गर्जना यांहींकरून युक्त होत्साते परम भयावह असतात, तथापि ते जसे मोरास अल्हादकारकच असतात, तसा, जरी तूं दुष्टजनास दंडक आहेस, तथापि मला दयालुच आहेस, असा या दृष्टांतानें कविच्छद्गतार्थ निघतो. कोठे **'मेघांबरें'** असाहि पाठ आढळतो; परंतु, या केकेंतील यमका वरून पहातां तो मूळचा पाठ असावा असें मला वाटत नाहीं. तसें पाठांतर असल्यास **मेघां** हें अनेकवचन करावें; अथवा, **मेघांबरें**- मेघरूप जें, **अंबर**- वस्त्र[1]- आवरण, तेणेंकरून, ह्मणजे चहूं कडून मेघांचें आवरण झालें असतां तेणेंकरून, मयूर त्या मे- -घांचा भजक होतो, अर्थात् त्या मेघांनीं उल्हासयुक्त होतो; अथवा, **'मेघांबरें'** ह्मणजे मेघयुक्त-**अंबरें**-अंबरानें-आका- -शानें,[1] **बर्हि** -मोर, **भजक**-अर्थात् उल्हासयुक्त होतो, असा अर्थ करावा. हा एथें दृष्टांतालंकार होय. अर्थांतरन्यासेंकरून तेंच आपल्या घाबरेपणाचें औचित्य प्रतिपादित होत्साते कवि ह्मणतात. **सर्व ही क्षणिक दिसे,**— **सर्व**- यत्किंचित् जें मला या सृष्टींत दिसतें व अनुभवास येतें तें सारें, **ही**- निश्चयेंकरून, ( एथें ' ही ' हें अवधारणार्थक अव्यय होय.) **सर्वही** ह्मणजे सर्वच, **क्षणिक**- क्षणभंगुर- नाशवंत, **दिसे**- दिसतें; कवि ह्मणतात जें मीं पाहतों तें सारें नाशवंत दिसतें, ह्मणून **बहु आधिनें चाकसें असे,**— **बहु आधिनें**- बहुत

1 अंबरंव्योम्निवाससि—
अमर.

बहुत काळजीनें- सर्व नाशवंत आहे तेव्हां माझें कसें होईल, मला कोणती गति प्राप्त होईल, या मोठ्या मानसिक व्यथेनें, **चाकसें**- चाका सारिखें, **भ्रमे**- भ्रमण करतें- अर्थात् वक्ष्य-माण मन केवळ अस्थिर आणि व्यग्र झालें आहे; अथवा, **बहु** याचा एथें 'भ्रमे' याशीं अन्वय करून तें क्रियाविशे-षण करावें. तें **बहु** भ्रमे-ह्मणजे फारच भ्रमण करितें- अर्थात् अत्यंत व्यग्र झालें आहे; असें हें **मन घडीचा भरवंसा कसें धरील**,- **मन**- हें माझें मन, घडीचा तरी भरवंसा कसें धरील, अर्थात् धरणार नाहीं; असा एथें प्रश्नराद्धांत जाणावा. मग माझें मन घाबरें कां नसावें ? अर्थात् असावें हेंच योग्य असा एथें अर्थान्वय जाणावा. अथवा, इष्ट असल्यास दुसऱ्या चरणांतील शेवटलें पद '**बरें**' हें प्रश्नार्थक अव्यय करून याचा अन्वय एथें करावा;तें असें-अत्यंत व्यग्र झालेलें माझें मन 'घडीचा भरवंसा कसें धरील बरें ? अर्थात् ध-रणार नाहीं; असा अन्वय केल्या वर मग दुसऱ्या चरणां-तील '**असो**' या पदाचा 'बहि मेघा भजक असो' अ-सा द्व्यन्वय करावा.

कृतांतकटकामलध्वजजरादिसोंलागली ॥
पुरःसरगदासर्वेंझगडितांतनूभागली ॥
सहायदुसरानसेतुजविणेंबळेंआगळा ॥
नहोंजरिउताविळास्वरिपुकापितोहागळा ॥ ४६॥

मागल्या केकेंत सांगितलेल्या आपल्या उतावळे-पणाचा हेतु एथें कवि प्रकट करितात.

**पदान्वय** — 'कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली, पुरःसर गदा सर्वें झगडितां तनू भागली, तुज विणें बळें आगळा दुसरा सहाय नसे, जरि उताविळा नहों, स्वरिपु हा गळा कापितो.

**कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली,**— कृतांतकटकामलध्वजजरा,- कृतांत[1]- यमराजा, त्याचें कटक[2] सेना, तिचा अमल- मलरहित- स्वच्छ- अर्थात् शुभ्र, असा जो ध्वज- निशाण- बाहुटा- झेंडा, तद्रूप जी जरा

---

१ कृतांतोयमुनाभ्राताशमनोयमराड्यमः—
अमरः

२ कटक शब्द सेनेचा वाचक प्रसिद्ध आहे, परंतु यास कोशाचें प्र-माण अद्यापि मला कोठें आढळत नाहीं. कटक शब्द 'वळें,' 'कडें,' 'डोंगराचा कडा,' या अर्थी आढळतो-. कटकंवलयेसानौराजधानीनि-तंबयोः असा विश्व कोश आहे. या वरून सद्यः साक्षी अशी अटकळ होत्ये किं - वलयाकार शिपायांची जी उभी रांग तिला लक्षणेनें कटक असें ह्मणावें.

जरा[1]- वार्द्धक्य - ज्ञातारपण, ती **दिसों लागली,** अर्थात् केशांची श्वेतता जें ज्ञातारपणाचें चिन्ह तें दिसूं लागलें; एथें कवीनीं **कृतांत** शब्द फार सरस ठेविला आहे. आणि **पुरःसर गदा सवें झगडितां तनू भागली,— पुरःसर**[2]- अग्रगामिनी- बिनीवाली- सेनेची नायिका, अशी **गदा**[3] - रोग, तिच्या **सवें**- सह- बराबर, **झगडितां**- झगडतानां- झगडत असतां, **तनू**[4]- हें माझें शरीर, **भागली** - थकली; एथें ' झगडितां ' या शब्दाच्या प्रयोगानें द्वंद्व युद्धाचा प्रसंग ध्वनित होतो; अशा विपत्तींत **तुज विणें बळें आगळा दुसरा सहाय नसे,**—तुज वांचून, **बळें**-बळानें, **आगळा**[5] - अधिक

---

१ पलितंजरसाशौक्ल्यंकेशादौविस्रसाजरा

अमर.

२ पुरोगाग्रेसरःपृष्ठाग्रतःसरपुरःसराः

अमर.

३ रोगव्याधिगदाऽमयाः

अमर.

४ स्त्रियांमूर्तिस्तनुस्तनूः

अमर.

५ **आगळा** अ० **अगळा.** हा शब्द मला वाटतें **आगळ** ह्म० पुढें, या हिंदी शब्दा वरून मूळचा व्युत्पन्न असावा. आगळा ह्मणजे पुढला, अर्थात् इष्ट गुणानें वरिष्ठ ह्मणून मागल्यांतून पुढें काढलेला अथवा पुढें सरसावलेला, ह्मणजे त्या गुणानें उत्कृष्ट अधिक इ०. एथें बळानें अ० सामर्थ्यानें उत्कृष्ट ह्मणजे बली अ० समर्थ, असा अर्थ घ्यावयाचा. आघाडी, आगळ, आगळीक, आगळा, हे सर्व एककुटुंबी शब्द होत.

जे

अधिक-समर्थ, असा दुसरा, मला सहाय- साहाय्य कर-णारा- पाठिंबा, नाहीं; यास्तव **जरि उतावीळा नहों,**— जर मीं उतावळा, **नहों** - न व्हावें; तर **स्वरिपु हा गळा कापितो,**— स्वरिपु- माझा शत्रु- कालरूप शत्रु, **हा गळा कापितो**-हा माझा गळा कापितो; अथवा एथें 'हा' हें अव्यय केलें असतांहि गोड, 'हा कापितो[1]' ह्मणजे कापायास सिद्ध आहे पहा.

या केकेंत कवीनीं आपल्या वार्धक्यावस्थेचें प्रतिरूपक फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे. यमराजाच्या सेनेच्या शुभ्र पताकेचें प्रथम दर्शन, आणि वार्धक्यावस्थेंत शुभ्र केशाचें प्रथम दर्शन, या उपमानोपमेय. धर्मांची तुल्यता, तसेंच रोगाच्या आणि त्या सेनेच्या अग्रगामित्वाचें साधर्म्य, व त्यांत अग्रगामी नायकांचें झुंज, व त्या झुंजांत तनूचा पराभव, आणि कृतांताचें वरचस्व, या सर्व उपमानोपमेयांचें साधर्म्य फार सुंदर रीतीनें एथें दर्शविलें आहे. हा एथें रूपक अलंकार जाणावा. यांत जरारूप विषय उपमेय, आणि कृतांतकटकामलध्वजत्व जें विषयी उपमान, या उभयतांचा अभेद वर्णिला आहे, ह्मणोन प्रथम चरणांतील रूपकाचा अ-

-भेदरूपक

---

जेसंसाराशींवेगळे ॥ ज्ञानवैराग्येंआगळे ॥
ब्रह्मरसेंआनंदले ॥ तेसद्गुरुजाणावे ॥ २९ ॥
वि॰ सिं॰, प्र॰ १.

१ 'तूं ह्मण ह्मणजे मी हा जातों,' 'तो हा बसतो, लिहितो.' इत्यादि स्थळीं मराठींत कर्त्याची सिद्धता, अथवा आतुरता दाखविण्या करितां 'हा' या सर्व नामाचा अव्यया प्रमाणें प्रयोग करितात.

जरा[1] - वार्द्धक्य - ज्ञातारपण, ती **दिसों लागली,** अर्थात् केशांची श्वेतता जें ज्ञातारपणाचें चिन्ह तें दिसूं लागलें; एथें कवीनीं **कृतांत** शब्द फार सरस ठेविला आहे. आणि **पुरःसर गदा सवें झगडितां तनू भागली,—** पुरःसर[2] - अग्रगामिनी- बिनीवाली- सेनेची नायिका, अशी **गदा**[3] - रोग, तिच्या **सवें**- सह- बराबर, **झगडितां**- झगडतानां- झगडत असतां, **तनू**[4] - हें माझें शरीर, **भागली** - थकली; एथें ' झगडितां ' या शब्दाच्या प्रयोगानें द्वंद्व युद्धाचा प्रसंग ध्व-नित होतो; अशा विपत्तींत **तुज विणें बळें आगळा दुसरा सहाय नसे,—**तुज वांचून, **बळें**-बळानें, **आगळा**[5] - अधिक

---

१ पलितंजरसाशौक्ल्यंकेशादौविस्रसाजरा

अमर.

२ पुरोगाग्रेसरःपृष्ठाग्रतःसरपुरःसराः

अमर.

३ रोगव्याधिगदाऽमयाः

अमर.

४ स्त्रियांमूर्तिस्तनुस्तनूः

अमर.

५ आगळा अ० अगळा. हा शब्द मला वटातें आगळ ह्म० पुढें, या हिंदी शब्दा वरून मूळचा व्युत्पन्न असावा. आगळा ह्मणजे पुढला, अर्थात् इष्ट गुणानें वरिष्ठ ह्मणून मागल्यांतून पुढें काढलेला अ-थवा पुढें सरसावलेला, ह्मणजे त्या गुणानें उत्कृष्ट अधिक इ०. एथें ब-लानें अ० सामर्थ्यानें उत्कृष्ट ह्मणजे बली अ० समर्थ, असा अर्थ घ्याव-याचा. आघाडी, आगळ, आगळीक, आगळा, हे सर्व एककुटुंबी शब्द होत.

जे

अधिक-समर्थ, असा दुसरा, मला सहाय- साहाय्य कर-णारा- पाठिंबा, नाहीं; यास्तव **जरि उतावळा नहों,**— जर मीं उतावळा, **नहों** - न व्हावें; तर **स्वरिपु हा गळा कापितो,— स्वरिपु-** माझा शत्रु- कालरूप शत्रु, **हा गळा कापितो**-हा माझा गळा कापितो; अथवा एथें 'हा' हें अव्यय केलें असतांहि गोड, 'हा कापितो[1]' ह्मणजे कापायास सिद्ध आहे पहा.

या केकेंत कवीनीं आपल्या वार्धक्यावस्थेचें प्रतिरूपक फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे. यमराजाच्या सेनेच्या शुभ्र पताकेचें प्रथम दर्शन, आणि वार्धक्यावस्थेंत शुभ्र के-शाचें प्रथम दर्शन, या उपमानोपमेय. धर्माची तुल्यता, तसेंच रोगाच्या आणि त्या सेनेच्या अग्रगामित्वाचें साधर्म्य, व त्यांत अग्रगामी नायकांचें झुंज, व त्या झुंजांत तनूचा परा-भव, आणि कृतांताचें वरचस्व, या सर्व उपमानोपमेयांचें साधर्म्य फार सुंदर रीतीनें एथें दर्शविलें आहे. हा एथें रूपक अलंकार जाणावा. यांत जरारूप विषय उपमेय, आणि कृतांतकटकामलध्वजत्व जें विषयी उपमान, या उभयतांचा अभेद वर्णिला आहे, ह्मणोन प्रथम चरणांतील रूपकाचा अ-

-भेदरूपक

---

जेसंसाराशींवेगळे ॥ ज्ञानवैराग्येंआगळे ॥
ब्रह्मरसेंआनंदले ॥ तेसद्गुरुजाणावे ॥ ३९ ॥
वि॰ सिं॰, प्र॰ १. ९

1 'तूं ह्मण ह्मणजे मी हा जातों,' 'तो हा बसतो, लिहितो.' इत्यादि स्थळीं मराठींत कर्त्याची सिद्धता, अथवा आतुरता दाखविण्या करितां 'हा' या सर्व नामाचा अव्यया प्रमाणें प्रयोग करितात.

-भेदरूपक प्रकार जाणावा. द्वितीय चरणांत अग्रगामी जी गदा तिज बराबर तनूचें द्वंद्वयुद्धरूपविषय्युपमान, आणि तनूचें जर्जरीभूतत्वविषयोपमेय, या उभयतांचें भेदवर्णन दिसतें, ह्मणोन हा ताद्रूप्यरूपक प्रकार जाणावा. यांत आ-णखी तनूच्या भागण्यानें उपमानाचें आधिक्यवर्णन होऊन तेणेंकरून तनूच्या जर्जरीभूतत्वोपमेयाचें आधिक्य ऊह्यमान होतें, ह्मणून हा अधिकाभेदरूपक उपप्रकार जाणावा[1].

---

१ हा एथें रूपक अलंकाराचा भेद दाखविला आहे तो कुवलया-नंदास अनुसरून दाखविला आहे. विश्वनाथकृत साहित्यदर्पणांत हे या अलंकाराचे भेद- परंपरित, सांग, निरंगम, व यांचे उपभेद, असे अन्य दृष्टीनें रचिले आहेत.

**अवश्यकरणेंखरेंप्रणतरक्षणस्वोचित ॥**
**उशीरमगकांबसोंकृपणमीहिकांशोचित ॥**
**नव्हेप्रभुवरातुह्मांउचितएकटेंधावणें ॥**
**कृतांतशिवलानसेतंवदिसेबरेंपावणें ॥ ४७ ॥**

मागल्या केंकेत कवीनीं आपल्या अधीरपणाचें कारण दाखविलें, आतां आपल्या उद्धरणा विषयीं प्रभूनेंहि त्वरा करावी ह्मणून ते एथें प्रार्थितात.

**पदान्वय** — स्वोचित प्रणतरक्षण अवश्य करणें खरें, मग उशीर कां, मी कृपण हि शोचित कां बसों, तुह्मां प्रभुवरा एकटें धावणें उचित नव्हे, कृतांतें शिवला नसे तंव पावणें बरें दिसे.

**स्वोचित प्रणतरक्षण अवश्य करणें खरें,- स्वो**-चित - आपल्यास उचित - योग्य - अर्थात् आपण प्रभुवर अहां ह्मणून योग्य, असें ⁄ **प्रणतरक्षण,- प्रणत** - अत्यंत नम्र- सर्वभावेंकरून शरणागत- 'अर्थात् अनन्य-भावेंकरून तुह्माला शरण आले जे मज सारिखे दीन, त्यांचें ⁄ रक्षण - तापत्रयापासून सोडवणूक, अवश्य, करणें - कर्तव्य, खरें; तुह्मी प्रभुवर, दीनानाथ, दीनवत्सल, अहां ह्मणून मज सारिख्या शरणागत दीनाचें रक्षण करणें तुह्मास योग्य असून तें कार्य अवश्य करायाचें खरें, ह्मणजे केल्या वांचून तुह्मास सुटका नाहीं; एथें कवीनीं भगवंताच्या गळां पडल्या सारिखा आपला भाव दाखविला; **मग**

उशीर

**उशीर कां,— मग** - अशी अवश्यकता असतां, **उशीर कां** - तुह्मां कडून इतका उशीर- मदुद्धरणा विषयीं विलं-
-ब कां असावा; आणि, - **मी कृपण हि शोचित कां बसों,**-. मीं, **कृपण**- अनाथ, हि, **शोचित**- शोक करित-
कोणी मला त्राता नाहीं तूं हि पावत नाहींस असा शोक क-
रित, कां, **बसों** - बसावें; तुह्मीं उशीर कां लावावा, आणि
म्यां तरी शोक करित कां बसावें; अर्थात् या काक्वर्थानें तुह्मीं
हि उशीर लावूं नये, आणि म्यांहि शोक करित बसों नये,
असा एथें वक्तयाच्या मनांतील भाव जाणावा. कदाचित्
तुह्मीं ह्मणाल कि तुझ्या रक्षणा करितां म्यां एकट्यानें काय
करावें ? अशी कवि आपल्या मनांत आशंका घेऊन तिचें
समाधान करित होत्साते पुढें ह्मणतात;- **तुह्मां प्रभुवरा एकटें धावणें उचित नव्हे,— तुह्मा प्रभुवरा**- तुह्मीं सर्व
प्रभूं मध्यें श्रेष्ठ राजाधिराज अशा तुह्मा प्रभुवराला, अथवा,
हे प्रभुवरा- हे राजाधिराज, असें एथें संबोधन करावें,
**तुह्माला**, माझ्या रक्षणा करितां **एकटें**- एकाद्या सामान्य
यःकश्चित् मनुष्या प्रमाणें एकटें, धावणें योग्य नाहीं; मज
सारिख्या पामरा करितां आपण सर्वैश्वर्यवान् असतां धावणें
योग्य नाहीं; ही गोष्ट खरी आहे. एथें कवीनीं **प्रभुवर**,
आणि **धावणें**, या दोन शब्दानें व्यधिकरण दाखविलें आहे;
आणखी एथें एकटें धावण्याच्या अनौचित्यदर्शनार्थ **प्रभुवर**
शब्दाची योजना जाणिली पाहिजे. तथापि कवि ह्मणतात
माझें इतकेंच मागणें आपण। पाशीं आहे कीं **कृतांत शिवला नसे तंव पावणें बरें दिसे,— कृतांत**- काल-

-रूप

-रूप शत्रु, शिवला नाहीं तों, तुमचें पावणें- अर्थात् शत्रु पासून रक्षण करण्या करितां मज सन्निध येणें, बरें दिसतें; आपण स्वैश्वर्यावर दृष्टि देऊन जर विलंब कराल, तर तो माझ्या उपयोगास पडणार नाहीं; कारण कालरूप शत्रु अति सन्निध टेंकला आहे. हें त्याचें सान्निध्य **शिवणें** या क्रि-येच्या दर्शनानें कवीनें एथें स्पष्ट दाखवून, **कृतांत** शब्दाच्या योजनेनें मागील केकेंत स्वनाशार्थ वर्णिलेली जी त्याची अति सिद्धता तिज वरही कवीनीं आपला कटाक्ष अस-ल्याचें दाखविलें आहे. यांत प्रभुवरत्वेंकरून एकटें धावण्याचें अनौचित्यविधान करून, तेणेंकरून जो आगमनरूप इष्टकार्यास प्रतिबंध दाखविला आहे, त्याचा कृतांत शिवल्या पूर्वीं सत्वरागमनेष्टत्वेंकरून एथें परिहार दर्शविला आहे, ह्मणून हा एथें मला वाटतें विभावना अलंकार होय.

कसेंतरिकरूंतुझेंअवनपूरवूंआळजी ॥
असेलमनिआमुचीतुजकशासरेकाळजी ॥
असेंजरिह्मणालहोप्रियतमाजगज्जीवना ॥
तदाश्रितमृगाशितीसुखसमृद्धिबाजीवना ॥ ४८ ॥

मागल्या केकेंत कवीनीं प्रभूची अडचण दाखवूनहि त्याच्या सत्वरागमना विषयीं आपला आग्रह दर्शविला, येणेंकरून ऊह्यमान जी स्वनिश्चितता, तिची आशंका मनांत आणून एथें त्या आशंकेचें कवि समाधान करितात.

**पदान्वय—** तुझें अवन कसें तरि करूं, जी मनि आळ असेल पूरवूं, आमुची काळजी तुज रे कशास, हो प्रियतमा जगज्जीवना असें जरि ह्मणाल, जी सुखसमृद्धि वना ती बा तदाश्रित मृगाशि.

आपल्या निश्चिततेची शंका मनांत आणून भगवद्वाक्या-चें अनुकरण करित होत्साते कवि ह्मणतात– **तुझें अवन कसें तरि करूं,—** तुझें, **अवन**- रक्षण- अर्थात् पूर्वोक्त कृतांतभयापासून सोडवणूक, **कसें तरि**- कसें तरी करून- कोणता तरी उपाय योजून, **करूं**- आह्मी करूं; आणि– **जी मनि आळ असेल पूरवूं,—** जी, **मनि**- तुझ्या मनां-त, **आळ**- इच्छा- म्यां एकट्यानें येऊन तुला मृत्युभयापा-सून सोडवावें ह्मणून जो तूं आपल्या मनांत विलक्षण छंद घेतला आहेस ती इच्छा, **पूरवूं**- पूर्ण करूं- तूं ह्मणतोस त्या पेक्षां कोणताहि उपाय करून तुझी इच्छा परिपूर्ण करूं; परंतु–

आमची

**आमची काळजी तुज रे कशास,**—असें करण्यांत (प्रभु ह्मणतात ) जे आह्मास पराकाष्ठेचे श्रम पडतील त्यां विषयींची' **आमची**- अस्मत्संबंधी- अस्मदुद्देशपर, **काळजी**- चिंता, **तुज रे कशास**-तुला रे कशा करितां-तुला रे कशाची-अर्थात् तुला आमची काळजी नाहीं;एथें 'रे'या संबोधनार्थक अव्यया-नें कवीनीं आपलें निश्चिंतताधिक्य दाखवून प्रभूचें स्वरक्षणमू-लक श्रमाधिक्यहि ध्वनित केलें. 'मज करितां तूं रे कां जा-शील'- ह्मणजे तूं अगदीं जाणार नाहींस, गेलाच तर दुसरा कोणी जाईल, अशा उदाहरणार्थ वाक्यांतील भावार्था प्रमा-णें या वाक्यांत भावार्थ ध्वनित होतो. अथवा, ' **मनिं अ-सेल** ' या पदांची पुनरुक्ति करून ' आमची काळजी तुज रे कशास मनिं असेल ' असा पाहिजे असल्यास आणखी पदान्वय एथें करावा. **हो प्रियतमा जगज्जीवना असें जरि ह्मणाल,— हो** प्रियतमा- अहो, माझ्या सर्वा पेक्षां आवडत्या, **जगज्जीवना**- सर्व जगाच्या प्राणसख्या, 'एथें कवीनीं ' **प्रियतमा** ' आणि ' **जगज्जीवना** ' या दोन संबो-धनांनीं स्वोद्धरणा विषयीं भगवंताचें प्रेम मनांत आणून ते-णेंकरून आपला अत्यंत प्रेमभाव दाखविला; **असें जरि ह्मणाल**- वर सांगितल्या प्रमाणें जर तुह्मी ह्मणाल; ह्मणजे तुह्मास माझें रक्षण करण्यांत जे श्रम पडतील त्या विषयींची मला कांहीं काळजी नाहीं असें जर तुमच्या मनांत येईल; तर मीं यास एक उदाहरण सांगतों त्याज वर तुह्मी लक्ष द्या, आणि मग अशी आशंका मनांत आणा, तें उदाहरण असें कीं-

की' **जी सुखसमृद्धि वना ती बा तदाश्रित मृगांशि,**- जी, **सुखसमृद्धि**- सुखाची- सुख हेतुक, **समृद्धि**- उदकतृ-णादिकांची विपुलता, **वना**- अरण्या कारणें, **ती**- ती समृ-द्धि, **बा**- बापा- हे तात, **तदाश्रित मृगांशि**- त्या वनाचे **आश्रित**- आश्रय करून राहिलेले, जे **मृग**- हरिणादि पशु, त्यां कारणें होय; ह्मणजे जर वन उदकतृणादिकेंकरून टवटवित असेल, तर त्या वनांत राहणारे पशुहि टव-टवित असतील; अर्थात् ती जर टवटवी वनाला नाहीं, तर मृगांलाहि नाहीं; अशी एथें अन्वयव्यतिरेकव्यामीनें अर्था-पत्ति जाणावी. सारांश कवि भगवंतास ह्मणतात जर आ-पल्यास श्रम पडतील तर ते मलाहि श्रम होतील, तेव्हां मला काळजी नाहीं असें होणार नाहीं. एथें शेवटल्या दोन चरणांत अर्थांतरन्यास अलंकार जाणावा.

**सुखेंचिसुखबाळकाप्रकटहोयमातेचिया ॥**
**तिलाघडतिजेश्रमप्रियजनोत्तमातेचिया ॥**
**ह्मणोनिनशिवोपळक्षणाहिकष्टजीवातुला ॥**
**विपज्जलधिसेतुलासकललोकजीवातुला ॥ ४९ ॥**

मागल्या केकेंत कवीनीं आश्रय्याश्रितधर्मन्यायेंकरून आश्रयी यास जें सुखदुःख तेंच आश्रितास, ह्मणून जो शेवटीं आपला भावार्थ दर्शविला तोच दृष्टांतरानें एथें स्पष्ट करितात.

**पदान्वय—** मातेचिया सुखेंचि बाळका सुख प्रकट होय, प्रियजनोत्तमा तिला जे श्रम घडति तेचि या, ह्मणोनि जीवा, विपज्जलधिसेतुला सकललोकजीवातुला तुला पळक्षण हि कष्ट न शिवो.

**मातेचिया सुखेंचि बाळका सुख प्रकट होय,—** मातेच्या सुखानेंच बाळकाला सुख प्रकट होतें- जर आई सुखी तरच तिचें बाळक सुखी; एथें ' प्रकट ' हें क्रियाविशे-षण अव्यय करून त्याचा अन्वय ' **होय** ' या क्रियापदाशीं करावा; अथवा, विधेय विशेषण करून त्याचा सुखा कडेस अन्वय केला असतांहि चालेल; ह्मणजे मातेच्या सुखानेंच बाळकास सुख स्पष्ट होतें; अर्थात् अन्वयव्यतिरिकेंकरून माता जर दुःखी आहे तर तिचें बाळक कदापि सुखी असणार नाहीं; हाच अर्थ पुढें स्पष्ट केला आहे. **प्रियजनोत्तमा तिला जे श्रम घडति तेचि या,—**प्रियजनोत्तमा- हे अ-त्यंत आवडत्या सख्या (या संबोधनानें कवीनीं बाळका प्रमा-णें भगवंताच्या ठायीं आपला अत्यंत प्रेमभाव प्रदर्शित केला आहे,

आहे, ) तिला-त्या आईला, जे श्रम घडति-जे, श्रम-दुःखें, घडतात, तेचि- तेच श्रम- तींच दुखें, या- अर्थात् या बाळ-काला, घडतात. एथें 'घडति' या क्रियापदाचा उभंया--न्वय जाणावा. **ह्मणोनि जीवा,-** ह्मणोनि-अशी गोष्ट-असा नियम आहे ह्मणोन, **जीवा-** हे माझ्या जिवलगा; अथवा, सकल जीवात्मक सृष्टीच्या [1] **जीवा** - जीवन कलारूप जो तूं त्याचें संबोधन; अथवा अशा; **विपज्जलधिसेतुला सकललोकजीवातुला तुला पळ--क्षण हि कष्ट न शिवो,—** विपज्जलधिसेतुला,-विपत्-कष्ट- संकट, तद्रूप [1] जलधि- महासमुद्र, तत्संबंधी अर्थात् तो तरण्या करितां - पार उतरण्या करितां, जो [1] सेतु- पूल, तद्रूप जो त्या, आणि [1] सकललोकजीवातुला,- सकललोक-सर्व लोक-सर्व प्राणिमात्र - अथवा, स्वर्गादि जे लोकत्र--य, त्यांचा [1] जीवातु [1] - संजीवनी औषधी- चैतन्यरूपेंकरून सर्वास

---

१ जीवातुर्जीवनौषधम्—

अमर.

सुभाषितशार्ङ्गधरांत याचकाख्यानांत कोणी याचकानें ब्रह्मदेवास ह्मटलें आहे;—

धातस्तातसमस्तयाचकविधौवैरायसेसर्वथा ।
यस्माद्विक्रमशालिवाहनमहीभृन्मुंजभोजादयः ।
अत्यंतंचिरजीविनोनविहितायेविश्वजीवातवो ।
मार्कंडेध्रुवलोमशप्रभृतयःसृष्टाःप्रभूतायुषः ॥

आणखी

सर्वांस सजीव करणारा[१] असा जो त्या, **तुला**- तुज मत, **प-ळ**- पळभर, **क्षण**- क्षणभर- क्षणमात्र, हि, **कष्ट**- श्रम- दुःखं, **न शिवो**-न स्पर्शो; सारांश विपत्तिरूप महासमुद्रा वरून पूला प्रमाणें पार उतारणारा जो तूं, आणि सकल लोकांस संजीवनी प्रमाणें चेतविता जो तूं, त्या तुला एक क्षणमात्र दुःख न होऊ. एथें '**पळ**' आणि '**क्षण**' या उभय शब्दांचा एकच अर्थ आहे ह्मणून अतिशयार्थी ही वीप्सा जाणावी; ह्मणजे तुला कष्ट अगदीं न शिवो असें एथें स्वारस्य जाणावें. चवथ्या चरणांत रूपक अलंकार जाणावा. आणखी, 'विपज्जलधिसेतुला सकललोकजीवातुला तुला' या पदांनीं यमक अलंकारहि होतो.

---

आणखी कोणी भगवंतास ह्मटलें आहे;

यद्वायद्वातद्वावांछसितत्तुभ्यमर्पितंनमम ।
देहंगेहंस्नेहंनेहंदातुंनजीवजीवातो ॥

१ या सकल जगास चैतन्यरूपेंकरून भगवान् सजीव ठेवितो यास पुष्कळ प्रमाणें आहेत.—

यतोवाइमानिभूतानिजायंतेयेनजातानिजीवंति ।
श्रुति

यदिदंकिंचजगत्सर्वंप्राणएजतिनिःसृतम्

सउप्राणश्चप्राणः—

कालीदासानेंहि शाकुंतल नाटकाच्या मंगलाचरणांत एका पदांत हाच भावार्थ दाखविला आहे.

यामाहुःसर्वबीजप्रकृतिरितिययाप्राणिनःप्राणवंतः

**असोतंतुजआमुचींसकळभाविकायुर्बळें ॥**
**जगोनिबहुकायम्यांसुकृतजोडिलेंदुर्बळें ॥**
**असेंप्रियतमासुखींबहुतकाळमायातमीं ॥**
**जनासुपथदाखवींमुदितसत्तमायातमीं ॥ ५० ॥**

मागील केकेंत शेवटीं कवीनीं आपल्या करितां भगवं-
-तास यत्किंचित्‌हि कष्ट नपडावे ह्मणून अत्यंत प्रेमभावानें आपली इच्छा प्रकट केली; यांतही ते आपल्या सर्व आयु-
-ष्याच्या अर्पणेंकरून स्वधिःकारपूर्वक तोच प्रेमभाव दर्श-
-वितात.

**पदान्वय**— आमुचीं सकळ भाविकायुर्बळें तुज अ-
-सोत, म्यां दुर्बळें बहु जगोनि काय सुकृत जोडिलें, प्रियत-
-मा बहुत काळ सुखी असें, मायातमीं जना सुपथ दाखवीं, सत्तमा यात मीं मुदित.

**आमुचीं सकळ भाविकायुर्बळें तुज असोत,—** आमचीं सारीं, भाविकायुर्बळें,- भाविक- पुढलीं, **आयु-
-र्बळें**- अयुष्याचीं बळें- ह्मणजे आयुष्येंच, **तुज असोत**- ह्मणजे तुला अर्पण असोत. कोठें '**भावुकायुर्बळें**' अ-

साहि

१ आयुष्य ह्मणजे वांचण्याची काळमर्यादा; ही प्राक्तनाधीन होय, असें मानि-
-ल्या वर त्याचा जो कालावधि-आयुष्य, त्यास मराठींत 'आयुष्याचें बळ,'
'आयुष्याची मर्यादा,' 'आयुष्याची दोरी,' असें अर्थाच्या दाढर्या करितां ह्मणण्याची फार जनरूढि आहे. 'त्याच्या आयुष्याचें बळ होतें ह्मणून तो त्या दुखण्यांतून वांचला,' 'त्याच्या आयुष्याची दोरी तुटली,' 'त्या-
-च्या आयुष्याची मर्यादाच तितकी,' अशीं वाक्यें निरंतर बोलण्यांत येतात.

-साहि पाठ आढळतो. भावूक ह्मणजे निष्ठावान्- तुझ्या-ठायीं परमनिष्ठ जे आह्मा सारिखे, त्या भावुकांचीं आयुर्बळें असा अर्थ करावा. आपला कोणी अत्यंत जीवलग असतां त्यास माझें सारें आयुष्य तुला असो असा आशीर्वाद दे-ण्याचा सांप्रदाय या देशांत फार आहे. येणेंकरून कवीनीं भगवंताच्या ठायीं आपला अत्यंत प्रेमभाव प्रकट केला असें एथें समजावें. आणखी पुढें कवि ह्मणतात **ग्यां दुर्बळें बहु जगोनि काय सुकृत जोडिलें,**— ग्यां दुर्बळानें, **बहु**- बहुकाळ, वांचून, कोणतें, **सुकृत**- सत्कर्म-पुण्य, जोडिलें; अर्थात् मजपासून कांहीं सत्कर्म घडलें नाहीं- उलटें नाना-विध दुःखमात्र ग्यां संपादन केलें[1] - ह्मणोन मज सारिख्या दुर्बळाचें आयुष्य तुज सारिख्या पुण्यशीलासच असावें; असा एथें कविन्हृद्गतार्थ दिसतो. एथें कवीनीं आपला धिःकार दर्शवून प्रभूचें गौरव केलें आहे. त्यांत आणखी तुज एक-ट्याचें आयुष्य मला किती दिवस पुरणार या आशंकेच्या समाधानार्थ एथें 'असोत तुज आमचीं,' असें बहुवचन ग्रहण केलें आहे, ह्मणजे मज सारखे जे कोणी आणखी पुष्कळ दुर्बळ असतील, व पुढें होतील, त्या साऱ्यांचीं आयुर्बळें

तुला

१ या संसारांत स्वभावतः सुख मिळविण्याची इच्छा मनुष्यें करितात, परंतु त्यांस त्या सुखप्राप्तीच्या ठिकाणीं नानाविध दुःखाचा वांटा मात्र मिळतो; याचें कारण काय ह्मणून भागवतांत विदुरानें मैत्रेयास पुसलें आहे.

सुखायकर्माणिकरोतिलोको नतैःसुखंवाऽन्यदुपारमंवा ।
विंदेतभूयस्ततएवदुःखंयदत्रयुक्तंभगवान्वदेन्नः ॥

स्कं०३,अ०५,श्लो०२.

तुला अर्पण असोत; ह्मणून दीर्घायुभव असा आशीर्वादात्मक आपुला पूर्ण भाव एथें कवीनीं ध्वनित केला. दिक्कालातीत जो भगवान् त्यास मनुष्यानें आपलें आयुष्य अर्पण करून दी-र्घायु इच्छिणें हें जरी केवळ असमंजस दिसतें, तथापि गंगेस गंगेच्या पाण्यानें अर्घ्यप्रदान करण्या प्रमाणें एथें हें कवीचें आयुरार्पण सप्रेम पूजन जाणावें. आणखी कवि आशिषात्मक वचनानें ह्मणतात; **प्रियतमा बहुतकाळ सुखी असें,**— **प्रियतमा**-हे अत्यंत जीवलगा, **बहुतकाळ**-दीर्घकाळपर्यंत, **सुखी असें**- तूंच सुखी ऐस. मागील केकेंत 'तुला पळक्षण हि कष्ट न शिवो' ह्मणून जें ह्मटलें त्या वचना वर एथें आपला कटाक्ष ठेवून कवि ह्मणतात, आह्मा सारिखे दुर्बळ कष्टी झाले तरी होऊत, परंतु तू सुखी ऐस; आणि **मायातमीं जनां सुपथ दाखवीं,**— **मायातमीं,**-माया-स्वस्वरूपाज्ञानरूप जो मोह, तज्जनित तमीं-अंधःका-रांत, **जनां**-सन्मार्गजिज्ञासु होत्साते जे तुला अनन्यभावें क-रून शरण येतात अशा भक्तांस तर काय परंतु जे केवळ अशा अंधःकारांत निमग्न होऊन बेहोष पडले असतील अशा लोकांसहि, ( असा विशेष अर्थ एथें 'मायातमीं' या नुसत्या सप्तम्यंत पदानें आणि **जन**शब्दग्रहणानें ध्वनित होतो ), सुपथ- सन्मार्ग- अर्थात् स्वत्प्राप्तीचा मार्ग, दाखवीं दाखी-व;[१] ह्मणजे **सत्तमा यात मीं मुदित,**— **सत्तमा**- हे

परमपुण्यशीला

---

[१] अज्ञ आणि 'भगवद्भक्तिपराङ्मुख अशा जनांस त्यांचें कल्याण व्हावें

परमपुण्यशीला प्रभो, यात- यांत-अशा तुझ्या सन्मार्गप्रदर्शकमीत, मीं- कवि ह्मणतात मीं, मुदित- आनंदी, होंय; एथें 'होंय', या क्रियापदाचा अध्यहार जाणावा. सारांश मज सारिखे दुर्बळ कष्टी असले तर असोत, परंतु तुज सारिखा पुण्यात्मा निरंतर सुखी असून त्वां जगाचा उद्धार करावा यांतच मला सुख आहे; अर्थात् इतरांचा उद्धार केल्या वर माझी उपेक्षा कदापि होणार नाहीं, असा एथें कविद्दृतार्थ ध्वनित होतो.

---

व्हावें ह्मणून भगवंताच्या विभूति या भूतला वर नानारूपांनीं विचरत असतात, असा विदुराचा आशय भागवतांत प्रकट आहे;—

जनस्य कृष्णाद्विमुखस्य दैवादधर्मशीलस्य सुदुःखितस्य ।
अनुग्रहायेह चरंति नूनं भूतानि भव्यानि जनार्दनस्य ॥
स्कं० ३, अ० ५, श्लो० ३.

१ 'मायातमीं' या यमका वरून कवीच्या मनांत यात हा शब्द एथें सानुनासिक असावा असें दिसत नाहीं; व असा सानुनासिक नकरण्यांत देशलोकपरत्वें शब्दोच्चारणाचें प्रमाणहि आढळतें; कोंकणांत, प्रकार बारकाईनें शुद्ध बोलण्यांत, या तकारान्त सप्तम्यंत व इतर बहुतेक अनुनासिक शब्दांत सानुनासिक वर्ण स्पष्ट उच्चारितात; परंतु देशा वर बहुधा सर्वत्र जनरूढि ह्मटली ह्मणजे ते सानुनासिक वर्णाचें स्पष्ट उच्चारण करित नाहींत; घरांत, यांत, धांवतो, कोंकरूं, वांसा, इत्यादि स्थळीं घरात, यात, धावतो, कोकरू, वासा, अशी शब्दोच्चारणाची रूढि पुष्कळ आढळत्ये.

भलेपरिशिलेसुरासुरनरींतसेलक्षमी ॥
ह्मणोतह्मणणारवातुजअसानसेलक्षमी ॥
उरींभृगुपदाहतीमिरवितोसिअद्यापिती ॥
कवीतवयशःकथानवसुधानवद्यापिती ॥ ५१ ॥

स्वस्वरूपाचें जें अज्ञानतद्रूपअंधःकारांत निमग्न, अर्थात् ज्यां-स स्वहित समजत नाहीं, अशा जनांस जागृत करून सन्मार्गास लावावें ह्मणून वर त्वां प्रार्थना केली, परंतु इतकी मोठी क्षमा माझ्या अंगीं नाहीं; अशी भगवदाशंका मनांत आणून तुला या पेक्षांहि अधिक क्षमा आहे, असें उदाहरणपूर्वक प्रभूचें क्षमाशीलत्व वर्णित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— मी सुरासुरनरीं तसे भले लक्ष परिशिले, वा ह्मणणार ह्मणोत, तुज असा क्षमी नसेल, भृगुपदाहती उरीं मिरवितोसि, ती तव अनवद्या यशःकथानवसुधा अ-द्यापि कवी पिती.

कोणी ह्मणणारा असेंहि ह्मणेल किं' **मी सुरासुरनरीं तसे भले लक्ष परिशिले,**—त्यां, सुरासुरनरीं,–सुर– देव, असुर– दैत्य, आणि' नर–मानव, यांत, **तसे**–त्या प्रकारचे–पूर्वी सांगितल्या प्रमाणें जनास सन्मार्ग दाखविणारे असे, **भले**–क्षमाशील साधु –नारदप्रल्हादव्यासवाल्मीकादि, **लक्ष**–लक्षावधि, **परिशिले**– ऐकिले; असें ' **वा ह्मणार ह्मणोत,**–हे बापा ह्मणणारे ह्मणोत; परंतु कवि ह्मणतात मीं निश्चयपूर्वक सांगतों कीं' **तुज असा क्षमी नसेल,**— तुज असा–

तुज

तुज सारिखा, **क्षमी**[१] - क्षमावान् - सहनशील - परापराधाचें सहन करणारा, नसेल; यास उदाहरण पहा ' **भृगुपदाहती उरीं मिरवितोसि,**—भृगुपदाहती,-**भृगु**-भृगुनामक ऋषि, त्याची ' **पद**ाहती,-**पद**-पाय, त्याची ' **आहती**-प्रहार-ताडण, अर्थात् भृगुचें लत्ताप्रहाररूप जें श्रीवत्सलांछन तें, उरीं-वक्षस्थळीं-आपल्या उरावर,-**मिर**वितोसि-भूषणरूपानें प्रकट धारण करितोस; **ती तव अनवद्या यशःकथानवसुधा अद्यापि कवी पिती,— ती**- अशी जी वर सांगितली श्रीवत्सलांछनधारणजन्य, **तव**-तुझी, **अनवद्या** - स्तुत्या - स्तवनास योग्य, अशी ' **यशःकथानवसुधा,-यशःकथा**-कीर्तिरूपकथा तीच ' **नवसुधा,- नव**-नूतन - अर्थात् सरस-स्वादु - जों जों ऐकावी तों तों गोड, अशी ' **सुधा**-अमृत, तें ' **अद्यापि**- हाकाळमर्याद, **कवी**[२] - ज्ञानी- पंडित, **पिती**- पितात. सारांश तूं इतका क्षमाशील आहेस कीं त्वां भृगुचा लत्ताप्रहार सहन केला इतकेंच नाहीं, परंतु त्या प्रहाराचें श्रीवत्सरूप चिन्ह आपल्या वक्षस्थळीं भूषणरूप धारण केलें आहेस, अशी तुझी कीर्ति ज्ञानी अद्यापि गात आहेत

---

१ एथें क्षम-सहनता या शब्दा वरून ' तें ज्यास आहे' या अर्थी इन् प्रत्यय होऊन **क्षमी** शब्द झाला आहे.

सहिष्णुःसहनःक्षंता तितिक्षुःक्षमिताक्षमी

अमर.

२ कवी हा एथें प्राकृत शब्द मानिला आहे असें दिसतें, ह्मणून दीर्घ स्वरान्त जाणावा.

आहेत.' एथें यशःकथा उपमेय, आणि सुधा उपमान, यांचा प्राशनरूप धर्मानें अभेद वर्णिला आहे ह्मणून हा रूपक अलंकार जाणावा.

---

१ मनुष्यां मध्यें सहनशीलता किती असावी याची पराकाष्ठा दाखविण्या-करितां भगवान् विष्णूनें भृगूचा लत्ताप्रहारहि सहन केला, अशी कथा पुरा-णांत सांगितली आहे; या वरून यःकश्चित् अशा मनुष्यजातीनें किती सह-नशील असावें हें उघडें दिसतें; वामन ह्मणतात.—

उरींभृगूचीहरिलातसोसी ऐसीक्षमेचीचसदाअसोसी।
क्षमाधरूंवृत्तिअसीमनाची प्रार्थीहरीतेंमतिवामनाची ॥
ऐसाक्षमानामकहाविलास रचूनिम्यांतूंहरिसेविलास।
क्षमामलादेअजिवासुदेवा सर्वात्मभक्तीचिकरूनिदेवा ॥

हरिविलास, वामन.

**भवन्मतिसआवडेंजरिंधनादिकांलागिते ॥**
**मदीयगुणकीर्तनश्रवणकांतरींत्यागिते ॥**
**असेंहिह्मणशीलबाजरिंतरींतुझीमावली ॥**
**तुजत्यजुनिपाजितांकशिदुधाकडेधावली॥ ॥५२॥**

बरें मीं तर त्वां सांगितल्या प्रमाणें क्षमाशील आहें, परंतु तुह्मां जनांची माझ्या ठायीं एकनिष्ठ भक्ति कोठें आहे, अशी भगवदाशंका मनांत आणून कवि तिचें समाधान क-रित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय—** जरिं भवन्मतिस आवडें, तरीं ते धनादि-कां लागि मदीयगुणकीर्तनश्रवण कां त्यागिते; जरिं बा असें हि ह्मणशील, तरीं तुझी मावली तुज पाजितां त्यजुनि दुधा कडे कशि धावली.

**जरिं भवन्मतिस आवडें,—** जर, भवन्मतिस[1]- तुम-च्या मतीस, आवडें-मीं आवडतों-अर्थात् जर मीं तुह्मां जनां-च्या मनास आवडतों; **तरीं ते धनादिकां लागि मदीय-गुणकीर्तनश्रवण कां त्यागिते,—**तरीं-तर, ते-ते माझे भक्तजन, धनादिकां लागि-धनादिकां करितां, ( एथे आदिश-ब्देंकरून स्त्रीपुत्रादिकांचा संग्रह जाणावा.)मदीयगुणकीर्तनश्रव-ण,

१ भवत् हें संस्कृतांत सर्वनाम होय. यांतील त्स. ' यरोऽनुना-सिकेऽनुनासिकोवा' या सूत्रानें नआदेश झाला आहे. पहा माझें महा-राष्ट्र व्याकरण, ३रीआवृत्ति, नियम ४७, पृ०१९.

॰ण,- मदीय-माझ्या, गुणकीर्तनश्रवण-गुणाचें कीर्तन आणि श्रवण, कां टाकिते; सारांश, जर मी त्यांस आवडतों तर ते द्रव्यस्त्रीपुत्रादिकांच्या लोभा करितां माझ्या गुणाचें कीर्तन आणि श्रवण यांचा त्याग नकरिते; अर्थात् ज्या पेक्षां त्यांस हीं द्रव्यादि विशेषेंकरून आवडतात, त्या पेक्षां मी त्यांस तसा आवडत नाहीं, असा एथील ध्वनितार्थ; **जरिं बा असें हि ह्मणशिल,** - ( कवि ह्मणतात ) जरिं बापा, **असें हि**- वर सांगितल्या प्रमाणें, कदाचित् तूं ह्मणशील; **तरीं तुझी मा-वली तुज पाजितां त्यजुनि दुधा कडे कशि धाव-ली,**— **तरीं तुझी मावली**- तरीं तुझीच आई यशोदा, तुला, **पाजितां**-स्तनपान करवित असतां, **त्यजुनि**-टाकून, **दुधा कडे**-घरांत दुधाला उकाळा आला तें उतून नजावें ह्मणून त्या दुधा कडे, **कशी**, **धावली**-धांवत गेली;[१] जर तुझी साक्षात् आई

[१] श्रीमद्भागवतांत हें उपाख्यान प्रसिद्ध आहे;—

एकदागृहदासीषुयशोदानंदगेहिनी ।
कर्मांतरनियुक्तासुनिर्ममंथस्वयंदधि ॥ १ ॥
यानियानीहगीतानितद्बालचरितानिच ।
दधिनिर्मंथनेकालेस्मरंतीतान्यगायत ॥ २ ॥
क्षौमंवासःपृथुकटितटेबिभ्रतीसूत्रनद्धं ।
पुत्रस्नेहस्नुतकुचयुगंजातकंपंचसुभ्रूः ॥
रज्ज्वाकर्षश्रमभुजचलत्कंकणौकुंडलेच ।
स्विन्नंवक्त्रंकबरविगलन्मालतीनिर्ममंथ ॥ ३ ॥
तांस्तन्यकामआसाद्यमथ्नंतींजननींहरिः ।
गृहीत्वादधिमंथानंन्यषेधत्प्रीतिमावहन् ॥ ४ ॥

तम

आई तुज सारिखें मीय बालक अंका वर असतां यत्किंचित् दुधाच्या लोभा करितां तुला टाकून त्या दुधा कडे धांवली, तर मग तूं अप्राप्त असतां आह्मां सारिख्या अज्ञ पामर जनाच्यांनीं स्त्रीपुत्रद्रव्यादि परमदुर्निवारणीयप्रपंचमोहपाश सुटत नाहींत यांत कांहीं महदाश्चर्य आहे असें नाहीं; त्यांत अधिक आश्चर्य होय असा एथील ध्वनितार्थ जाणावा. एथें हा काव्यार्थापत्ति अलंकार होतो.

---

तमंकमारूढमपाययत्स्तनं ।
स्नेहस्नुतंसस्मितमीक्षतीमुखम् ॥
अतृप्तमुत्सृज्यजवेनसायया- ।
-वुत्सिच्यमानेपयसित्वधिश्रिते ॥.५॥

स्कं० १, पू०, अ०९.

अनावर पिशाचिकाविषयवासनासत्यजी ॥
असेंकरविकृत्यजीभुलवित्येकधींनत्यजी ॥
ह्मणोनितुजजाणत्याविनवितोंइलाकाढगा ॥
करीनमगतूंजरीह्मणसिआपणागाढगा ॥ ५३ ॥

मागल्या केकेंत भगवदाशंकेच्या समाधानार्थ जें आ-श्चर्य प्रदर्शित केलें, त्याचेंच कारण एथें कथित होत्साते कवि आणखी प्रार्थितात.

**पदान्वय—** विषयवासना अनावर पिशाचिका सत्य, जी असें कृत्य करवि, जी भुलवित्ये, कधीं त्यजी न; ह्मणोनि तुज जाणत्या विनवितों इला काढ गा, मग तूं जरीं आपणा गाढ गा ह्मणसि, करीन.

**विषयवासना अनावर पिशाचिका सत्य,—** वि-षयवासना,- **विषय** - ऐहिक पदार्थ जे द्रव्यादि, तत्प्राप्ती विषयीं जी **वासना**- इच्छा-अर्थात् तदुपभोगा विषयीं जो लोंचटपणा, ती विषयवासना, **अनावर**-आवरण्यास अशक्य, अशी **पिशाचिका**- पिशाची- डाकिणी, **सत्य**-खरी, होय; कांकीं **जी असें कृत्य करवि,- जी-** विषयवासनारूप डाकिणी, **असें कृत्य करवि**- मागल्या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें मांडी वर भगवान् बसला असतां दूध रक्षण्या करितां यशोदेनें त्यास सोडिलें, अर्थात् क्षणभंगुर सुखा करितां अ-विनाश सुखांचा त्याग करणें असें कृत्य, **करवि**-त्यास तिचा संबंध लागतो त्याज कडून करवित्ये; आणखी **जी भुलवि-**

-त्ये

-त्ये,-मोहित करून लोभांत घालित्ये; **आणखी कधीं त्यजी न,**— एकदां झोंबली असतां कधींहि सोडित नाहीं; **ह्मणोनि तुज जाणत्या विनवितों इला काढ गा,**— ह्मणोनि- असा इचा घातक आणि लोंचट स्वभाव आहे ह्मणून, तुज, जाणत्या-देवभक्तयाला-भूतवैद्याला, विनवितों-प्रार्थितों, कि इला काढ गा,- गा- अगा, इला- या डाकिणीला, काढ- तूं आपल्या पंचाक्षरी विद्येच्या बलानें झाडून टाक; **मग तूं जरीं आपणा गाढ गा ह्मणसि,**— मग- या प्रमाणें त्वां ही माझी बाधा उतरविल्या वर, तूं जर आपल्यास, गाढ अत्यंत - अर्थात् सप्रेम अंतःकरणानें,[1] गा - माझें गायन कर, ह्मणून ह्मणसि- ह्मणशील- सांगशील; **करीन,**- तर तसें तुझें गायन ( कवि ह्मणतात ) मीं उत्साहानें करीन. एथें विषयवासना उपमेय, आणि पिशाचिका उपमान, यांचें साधर्म्य अभेदरूपानें वर्णिलें आहे, ह्मणून हा रूपक अलंकार होय. पिशाचबाधा झाली असतां ती बहुधा आवरत नाहीं जशी, तशी विषयवासनाहि सुत्याज्य नसल्यानेंहि अनावरच; पिशाच जसें अल्प लाभा करितां महल्लाभाचा त्याग करवितें, तशी विषयवासनाहि क्षणभंगुर प्रपंचसुखां

---

1 'गाढ' हें एथें क्रियाविशेषण अव्यय होय. अशा अर्थी या अव्ययाचा प्रयोग संस्कृतांत पुष्कळ आढळतो;—

सवासुदेवानुचरंप्रशांतंबृहस्पतेःप्राक्तनयंप्रतीतं ।
आलिंग्यगाढंप्रणयेनभद्रंस्वानामपृच्छद्भगवत्प्रजानां ॥
भाग०, स्कं० ३, अ० १, श्लो० २५.

प्रपंचसुखा करितां अविनाशसुखप्राप्तीची हानि करविन्ये; पिशाचाचा ज्यास संबंध लागतो तो जसा भ्रमिष्ट होतो, तसा विषयवासनेच्या आधीन जो जन आहे तोहि स्वहिता विषयीं अंधच असतो; आणखी पिशाचिका एकदां झोंबली असतां जशी सहज सुटत नाहीं, तशी विषयवासनाहि भगवदनुग्र- -हा वांचून दूर होत नाहीं.. अशीं हीं एथें उपमान आणि उपमेय यांचीं साधर्म्यें जाणावीं. एथें कवीनीं भगवंतास ' जाणता ' असें ह्मणून या पिशाचिकेच्या निवारणार्थ जो प्रार्थनाप्रकार योजिला, तो प्रस्तुत विषयास परम अनुकूल असून फार सरस होय.

कोठे – इला काढगा याच्या ठिकाणीं इला गाढगा असाहि पाठ आढळतो, व तो पुढल्या यमकास अनुकूलहि दिसतो; परंतु ' गाड ' या धातूच्या ठिकाणीं ' गाढ ' याचा प्रयोग केवळ आर्ष दिसतो, ह्मणून त्या पाठाचें एथें ग्रहण केलें नाहीं; वरकड तो पाठ अर्थासहि फार अनुकूल दिसतो. पिशाच बाधा झाली असतां देवभक्ते मंत्रेंकरून भूतांस शिशींत उतरवून ती शिशी भुईंत गाडून टाकितात ही गोष्ट या देशांत बहुतकरून त्या नादांत जे लोक फिरतात त्यांस चांगली माहित असत्ये.

तुझ्यागुणकथामहासुरभित्यांतहीरासभी ॥
शिरेंविषयवासनाजशिशुकाअहीरासभी ॥
तशीनइतरासभीइससदंडहीहाकिती ॥
तथापिबहुलाथळीमगअदंडमीहाकिती ॥५४॥

त्याच विषयवासनेची अन्यप्रकारें निर्भर्त्सना करित होत्साते या पुढील तीन केकांत कवि प्रार्थितात.

**पदान्वय** — तुझ्या गुणकथा महा सुरभि, त्यांत ही विषयवासना रासभी शिरे, जशि शुका अहीरास भी तशी इतरास न भी, सदंड ही इस हाकिती तथापि बहु लाथळी, मग अदंड मी हा किती.

कवि भगवंतास ह्मणतात ' **तुझ्या गुणकथा महा सुरभि,** - तुझ्या गुणकथा - तूं जो पुण्यश्लोक त्या तु-झ्या, गुणकथा - भक्तवात्सल्यादि जे गुण तद्विषयक कथा, ह्याच ' **महा सुरभि** - महा - प्रसिद्ध - स्वाश्रित मनोरथ परिपूर्ण करण्या विषयीं अत्यंत समर्थ, अशा ' सुरभि-कामधेनु, होत; असें असतां ' **त्यांत ही विषयवासना रासभी शिरे,** - त्यांत - त्या कामधेनूं मध्यें, ही विषयवासना-रा-सभी - ही, विषयवासनारूप, रासभी - गाढवी, शिरे - शिरल्ये - बळेंच घुसल्ये; अशा कामधेनूंच्या कळपांत शि-रणाऱ्या या निर्लज्ज गाढवीस तेथून हाकून काढण्याचें सामर्थ्य एका कुंभाराचेंमात्र आढळतें, तें कोणाचें पुसाल तर कवि ह्मणतात ऐका ' **जशि शुका अहीरास भी**

तशी

**तशी इतरास न भी,**- ही विषयवासना गाढवी ∕ **जशि** - जशी - ज्या मकारेंकरून, **शुका अहीरास** - **शुका** - इं-द्रियनिग्रहसमर्थ जो कृष्णद्वैपायनव्यासपुत्र शुक मुनि त्या, **अहीरास**[1] - कुंभारास, **भी** - भिन्ये, **तशी** - त्या म-कारेंकरून, **इतरास न भी,** - दुसऱ्या कोणासहि भित नाहीं; आणखी पुनः ∕ **सदंड ही इस हाकिती तथापि बहु लाथळी,** - **सदंड** - दंडयुक्त- अर्थात् इंद्रियनिग्रहरूप जो दंड तद्युक्त - अर्थात् मोठमोठे सन्यासी, तमस्वी, योगी, पक्षांतरीं हातांत काठी घेऊनहि, **इस** - या विषयवासना-रूप गर्दभीस, **हाकिती** - हाकितात - दूर घालवितात, **त-थापि**-असें असतांहि, **बहु लाथळी**-फार लाथाळत्ये-लाता मारित्ये-अर्थात् त्या कळपांतून नजाण्या करितां फार दांडगाई वर येत्ये; **मग अदंड मी हा किती,**-मग-सदंडांसहि ही आटोपत नाहीं मग, **अदंड** - दंडरहित - जितेंद्रियत्वादि-गुणरहित - केवळ संसारी असा, - पक्षांतरीं ज्या माझ्या हातांत काठीहि नाहीं असा, **मी हा किती** - मीं हा त्या गर्दभीस दूर घालविण्या विषयीं, **किती**[2] - किती समर्थ - अर्थात् कांहींच समर्थ नाहीं.

यांत कवीनीं भगवद्गुणात्मक कथांस कामधेनूच्या क-

-ळपाची

---

१ पुराणांत जो अहीर ह्मणून शूद्रजातींतला एक भेद सांगितला आ-हे, तीच ही जाति होय. उत्तर हिंदुस्थानांत हे अहीर लोक बहुतकरून गवळी असतात; व कोठे गाढवें राखून कुंभाराचाहि धंदा करितात.

२ कोणत्याहि कार्या विषयीं असामर्थ्य दाखवायाचें असतां **किती** या शब्दाचा प्रयोग व्यवहारी भाषणांत फार आढळतो;-उदाहरण-'तुह्मी असे धु-रंधर त्या कामांत असतां मी किती ' ह्मणजे माझी कथा काय.

-ळपाची उपमा दिली आहे, तेणेंकरून तद्गायकांची स्वर्ग-सुखाद्यामोक्षपरमानंदप्राप्तीच्छा परिपूर्ण करण्या विषयीं त्यां भगवद्गुणात्मक कथांचें सामर्थ्य अति मनोहर री-तीनें दर्शविलें, आणि तसेंच त्या कळ्पांत विषयवासनाग-र्दभीचा अंतःप्रवेश विसंगत असून त्या परमानंदप्राप्तीचा तो विघातकहि होय. असा आपला अभिप्राय तिच्या पुढील लत्ताप्रहारादि क्रिये वरून इंगित जें तिचें दुर्निवारत्व तेणें-करून सुचविला. आणखी, मात्क्यानें इंद्रियनिग्रहादिरूप दंडानेंहि तिच्या शासनाचें दुर्घटत्व दाखवून शुकमुनिविष-यक भीतीच्या उपमानानें तो दंड जर भगवद्भक्तिप्रधान अ-सेल तरच तिचें निवारण होईल असाहि एथें कवीनीं स्वमनो-गतार्थ इंगित केला आहे. या श्र्केंत रूपक अलंकार जाणावा.

**खरासुरजसातसीविषयवासनाहेखरी ॥**
**इचावधकरावयातुजचिशक्तिआहेखरी ॥**
**बकीसुमतिताटकालघुनहीभलीलाजशी ॥**
**उगाचितशिएकहीव्रजवनांतलीलाजशी ॥ ५५ ॥**

विषयवासनेची निर्भर्त्सना मागील केकेहून चालू.

**पदान्वय—** जसा खरासुर तसी हे विषयवासना खरी, इचा वध करावया तुजचि खरी शक्ति आहे, बकी सुमति ताटका लघु, ही भली न, उगाचि लाजशी, जशी व्रजवनांत लीला तशि ही एक.

**जसा खरासुर तसी हे विषयवासना खरी,—**जसा- पूर्वी कृष्णावतारीं जसा प्रसिद्ध दुष्ट, **खरासुर**- धेनुकासुरनामा राक्षस, अथवा गर्दभाच्या रूपानें प्रकट होऊन लोकांस पीडा करणारा असा, **असुर**- राक्षस,[१] **तसी**- त्याज सारिखी दुष्ट, **हे** - ही, **विषयवासना**, **खरी** - गर्दभी, होय; अर्थात् तो जसा दुष्ट खरासुर गर्दभरूप राक्षस तशी ही दुष्ट गर्दभीरूप राक्षसी होय; ह्मणून **इचा वध करावया तुजचिं खरी शक्ति आहे,— इचा**- या गर्दभीरूप राक्षसीचा, वध करावयास तुलाच, **खरी**-वास्तविक- निःसंशय, शक्ति आहे; अर्थात् खरासुरा प्रमाणें इला मारण्यास तुज वांचून इतर कोणी समर्थ नाहीं. कदाचित् तूं ह्मणशील किं

खरासुर

१ ही धेनुकासुरनामक खरासुराच्या वधाची कथा भागवतांत दशम स्कंधांत पंधराव्या अध्यायांत वर्णिली आहे, ती इष्ट असल्यास पहावी.

खरासुर पुरुष होता ह्मणून त्याचा वध करणें निषिद्ध नव्हतें, परंतु ही स्त्रीजाति आहे ह्मणून शास्त्रदृष्ट्या इचा वध निंद्य होय; त्यास, दुष्टांचें पारिपत्य करण्यांत स्त्रीपुंस्त्वधर्माचें विवेचन करणें योग्य नाहीं; व पूर्वीही त्वां अशा दुष्ट स्त्रियांचा वध केला ह्मणून प्रसिद्धि आहेच; अशा आशंकेचें निवारण करित होत्सातें कवि ह्मणतात ' **बकी सुमति ताटका लघु,**— बकी - पूतना, सुमति - कोणी दुष्ट स्त्री,[1] ताटका- प्रसिद्ध राक्षसी, या ' लघु - गर्दभीरूप विषयवासनाराक्षसीशीं तुलना करून पाहिल्या असतां लहान- अर्थात् ही त्यांज पेक्षांहि प्रचंड, ह्मणून ' **ही भली न,** - ही, भली- अर्थात् अवध्या, नाहीं; वध्याच होय; ही मारिलीच पाहिजे; मग' **उगाचि लाजशी,**— ही स्त्रीजाति आहे ह्मणून इस मारायास उगाच लाजतोस; ह्मणजे बकी, ताटका, या स्त्रीजातीय असतां त्वां मारिल्या, मग इलाच मारून टाकायास कां लाजतोस ? अथवा, **बकी सुमति ताटका लघु नं,** ?— या

---

१ हा पाठ मूळचा कसा असेल तो असो. परंतु मला एथें मोठा संशय आहे. **सुमति**नामाची कोणी राक्षसी अथवा दुष्ट स्त्री पुराणप्रसिद्ध अशी आढळण्यांत नाहीं. त्यांत आणखी **सुमति** हा स्त्रीनामवाचक शब्दाहि दिसत नाहीं. एथें कदाचित् **कुमति** असा पाठ असावा अशी माझी अटकळ होत्ये; **कुमति** ह्मणजे दुष्ट बुद्धि; बकी ताटका यांच्याच प्रमाणें मनुष्यांची कुमति दुष्ट बुद्धि हीहि राक्षसी होय; परंतु ती कुमति विषयवासने पेक्षां लघु, अर्थात् विषयवासने सारिखी बलवत्तर नाहीं; आणि ज्या मनुष्या वर ईश्वर अनुग्रह करायास इच्छितो, त्याच्या दुष्ट बुद्धीचा तो प्रथम नाश करितो, तद्वत् माझ्या विषयवासनेचाहि तूं नाश कर असा अर्थ करावा; एथें मूळचा पाठ संदिग्ध असल्यानें अशी मला अटकळ करावीशी वाटत्ये.

या लघु नाहींत काय ? आणि ही भली,?- ही खरी भली काय ? अर्थात् या तिघी लघु नाहींत, आणि ही खरी भली नाहीं, ह्मणून इचा वध करायास उगाच लाजूं नको, असा काक्वर्थ करून अन्वय करावा. [1] **जशी व्रजवनांत लीला तशि ही एक,**- जशी खरासुरवधाची व्रजवनांत तुझी लीला तशी ही एक-ही माझी विषयवासना एतद्रूपराक्षसीचा वध करण्याची आणखी एक तुझी लीला कां होईना असा अर्थ.

---

१ या विषयवासनेचा समूळ नाश करावा ह्मणून आपल्या कवीनीं भगवंताची प्रार्थना केली आहे ती योग्य होय; कारण, ही विषयवासना सर्वथैव मनुष्याचा नाश करणारी आहे ह्मणून भगवंतानें अर्जुनास गीतेंत स्पष्ट सांगितलें आहे; — त्याज वर शेवटीं ज्ञानेश्वर ह्मणतात.

ह्मणोनिआइकेंअर्जुना ॥ जैसाविस्फुलिंगलागेइंधना ॥
ममतोमौढझालियात्रिभुवना॥पुरोंशके॥३०॥तैसेंविषयांचेंध्यान॥
जरीविपायेंवाहेमन ॥ तरीयेसणेंहेंपतन॥गिवसीतपावे॥ ३१ ॥

ज्ञानेश्वरी, अ० २ श्लो० ६२.

कसेंतरिअसोमगस्वपणरक्षणाकारणें ॥
अवश्यशरणागतव्यसनतोंस्वयेंवारणें ॥
तुह्मांविहितमुख्यहेंनपुसतांकराहोखरी ॥
निजोक्तिखरकायतोअधिकसंहराहोखरी ॥ ५६ ॥

विषयवासनेची निर्भर्त्सना चालू.

**पदान्वय—** मग कसें तरि असो, स्वपणरक्षणा कारणें तों शरणागतव्यसन स्वयें वारणें अवश्य, हें तुह्मां मुख्य विहित, न पुसतां निजोक्ति खरी करा हो, तो खर काय, खरी अधिक, संहरा हो.

**मग कसें तरि असो,**—मागील केकेच्या संदर्भा वरून मग - स्त्रीत्वपुंस्त्वाचा विचार करणें, हें वर सांगितल्या वरून, कसें तरीं असो; परंतु **स्वपणरक्षणा कारणें तों शरणागतव्यसन स्वयें वारणें अवश्य,— स्वपणरक्षणा कारणें- स्वपण-** आपली प्रतिज्ञा- शरणागताचें दुरित निवारण करण्या विषयीं जी आपली भाक, तिच्या **रक्षणा कारणें** - ती मिथ्या न व्हावी एतदर्थ-ती पूर्ण करण्या करितां, **तों**[1] - तर, **शरणागतव्यसन स्वयें वारणें अवश्य**-जे तुह्मांस अनन्यभावेंकरून शरण येतात त्यांचें, **व्यसन**- दुःख-विषयवासनेनें उत्पन्न केली जी भगवंतापासून पराङ्मुखता तज्जनित जे मानसिक क्लेश ते, **स्वयें**

1 **तों** हें एथें पादपूरणार्थक अव्यय जाणावें.

-यें-स्वतः, **वारणें**-दूर करणें, **अवश्य**-अपरिहार्य-अर्थात् हे क्लेश दूर केल्या वांचून तुमची सुटका नाहीं; **हें तुह्मां मुख्य विहित,- हें**-स्वभक्तदुरितनिवारण, तुह्माला, मुख्यत्वेंकरून, विहित- योग्य; ह्मणून **न पुसतां निजोक्ति खरी करा हो,—** नपुसतां- कोणास नविचारितां- अर्थात् कांहीं मनांत आशंका नआणितां, **निजोक्ति**- आपली उक्ति-वाणि- स्वभक्तरक्षणोद्देशक प्रतिज्ञा, **खरी करा हो**- अहो[1] खरी करा- अर्थात् खरी कराच; **तो खर काय,— तो**-तुह्मीं कृष्णावतारीं बाळपणीं ज्यास मारिलें तो, **खर**-खरासुर-नामें राक्षस, **काय**-काय पदार्थ, अर्थात् कांहींच नाहीं; परंतु त्या पेक्षां ही **खरी अधिक,— खरी**- विषयवासनारूपि-णी राक्षसी, **अधिक**- त्या खरा पेक्षां साधुजनास गांजण्यांत अधिक बलवान; अतएव **संहरा हो—** अहो इचा संहार करा- पाहूं नका माराच, असा अर्थ;[2] अथवा, एथें '**अ-हो**' हें आदरार्थी संबोधनरूप अव्यय करून, **संहरा हो**- ह्मणजे मारा अशी मीं अगत्यपूर्वक तुमची प्रार्थना करितों, असा अर्थ समजावा; अथवा, **तो खर काय अधिक?** असा

---

१ अहो हें एथें आदरार्थी अथवा आवश्यार्थी अव्यय.

२ अशा या विषयवासनेचा समूळ नाश करून टाकण्या विषयीं तुकोबानेंहि प्रार्थना केली आहे;—

आशाहेसमूळखाणोनीटाकावी तेव्हांचगोसांवी व्हावेंतेणें।
नाहींतरींसुखेंअसावेंसंसारीं फजीतीदुसरी करूंनये।
आशामारूनियांजयवंतव्हावें तेव्हांचीनिघावें सर्वांतुनी।
तुकाह्मणेजरीयोगाचीतांतडी आशेचीबीबुडी करीआर्धी॥

असा काक्वर्थ करून, तो खर अधिक नव्हे, तर 'खरी अ-धिक — ही खरी अधिक, ह्मणून इला संहरा;' असा एथें अधिकशब्दाची द्विरुक्ति करून पदान्वय केला असतांहि गोड. अथवा, अधिक हें क्रियाविशेषण अव्यय करून त्याचा अन्वय 'संहरा' या क्रियापदाशीं करावा, ह्मणजे 'काय त्या खराला अधिक मारितां? तर तसें करूं नका, या खरीला अधिक मारा;' असा अर्थ करावा.

**खरीकरितसेकशीतवजनींहिसत्तापहा ॥**
**इचावधनंनिद्यबाप्रबळमूर्तसंत्तापहा ॥**
**कथासुरभिचाररस्वहितपुष्कळस्वादुही ॥**
**ह्मणेत्यजुनिकींमलानिजधनापरस्वादुही ॥ ५७ ॥**

मागील केकेंत - विषयवासनारूप खरीचा वध कर-ण्या विषयीं प्रार्थना केली, त्याचें आणखी कारण एथें दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— तव जनीं हि खरी कशी सत्ता करितसे पहा, बा इचा वध निंद्य न, हा प्रबळ मूर्त संताप, कथासुर-भिचा रस स्वहित पुष्कळ स्वादु ही ह्मणे परस्वा त्यजुनि मला निजधना दुही कीं.

सज्जनांस विषयवासनेची गांजणूक किती आहे हें एथें कवि वर्णितात.- **तव जनीं हि खरी कशी सत्ता करि-तसे पहा,**—**तव जनीं** - तुझ्या जनां मध्यें - अर्थात् तु-झ्या भक्त मंडळांत, **हि, खरी** - ही विषयवासनारूप पूर्वो-क्त गाढवी, **कशी सत्ता करितसे** - कश्या प्रकारें, आपली **सत्ता** - प्रभुत्व -अर्थात् प्रजापीडनरूप अधिकार, **करितसे** - चालवित आहे, तें **पहा** - तूं अवलोकन कर - अर्थात् त्याचा विचार कर. अथवा, **हि** हें अव्यय करून साधुजनां-तहि ह्मणजे दुष्ट पापी जनां मध्यें तर ही गाढवी सत्ता करित्ये यांत आश्चर्य नाहीं, परंतु तुझ्या भक्तजनांतहि सत्ता करित्ये, असा अर्थ करावा. तुझ्या भक्तांस इची पीडा फार आहे ह्मणून **बा इचा वध निंद्य न,- बा**- हे बापा, **इचा**- या

गाढवीचा

गाडवीचा, **वध**-हनन, **निंद्य न**- निंद्य नाहीं-अर्थात् स्तुत्य होय; कारण ' **हा प्रबळ मूर्त्त सत्ताप,'** — **हा** - गर्दभीरूप, केवळ ' **प्रबळ** - 'अत्यंत बलिष्ट असा, **मूर्त** - मूर्तिमान, **सत्ताप**,- **सत्**- साधुजन, त्यांस' **ताप** -पीडनरूप संताप, होय; अर्थात् साधुजनांस ही मूर्तिमान अशी मोठी पीडा होय; कशी ह्मणाल तर पहा ' **कथासुरभिचा रस स्वहित पुष्कळ स्वादु ही ह्मणे परस्वा त्यजुनि मला निजधना दुही कीं**,- कथासुरभिचा रस स्वहित पुष्कळ स्वादु, - कथासुरभिचा, - **कथा** - अर्थात् भगवद्गुणकीर्तन हीच कोणी ' **सुरभि** - कामधेनु, इचा, **रस** - **गोरस** - अर्थात् दूध, **स्वहित**- आपल्यास हितकारक[१], आणि ' **पुष्कळ स्वादु** - अति मिष्ट, असतां' **ही ह्मणे**,- ही गाढवी साधुजनास ह्मणत्ये, किं' परस्वा त्यजुनि मला निजधना दुही कीं,- **परस्वा त्यजुनि**,- **परस्वा** - **परस्व** - परकीय वस्तु - अर्थात् तें परकीय दूध, त्यातें, **त्यजुनि**- टाकून, **मला निजधना दुही कीं**,- मी जी, **निजधन** - तुझें धन - तुझी स्वसत्तात्मक वस्तु,

---

१ हित, पाप, इत्यादि कित्येक शब्द शुद्ध नामें असून-हितकारक, पापी, अशीं तत्तद्भावविशिष्ट विशेषणेंहि होतात;—

आपद्युन्मार्गगमने कार्यकालात्ययेषुच.
कल्याणवचनंब्रूया दपृष्टोऽपिहितोनरः

पंचतंत्र

वस्तु, त्या मलाच, दुही कीं[1],- दोह कीं- माझेंच दूध काढ कीं;[2] अर्थात् कथासुरभीचें दूध कशास घेतोस ती परकीय वस्तु, मीं तुझीच, माझें दूध काढ कीं, असें तुझ्या भक्तास ही वारंवार ह्मणत असल्ये, अशी इची गांजणूक आहे; असा अर्थ.

अथवा, कोठे- 'ह्मणेत्यजुनिकांमलानिजधनापरस्वादुही' असा पाठ असतां, मला निजधना त्यजुनि - मी जें तुझें, निजधन. तुझी स्वसत्तात्मक वस्तु, त्या मला, टाकून, परस्वा कां दुही,— परस्वा- परकीय वस्तु जी कथा सुरभि तितें, कां दुही- कशा करितां दोहतोस - अर्थात् तिला दोहूं नको मलाच दोह, असा पदान्वय करून अर्थ करावा. परंतु, एथें 'कां दुही' हें वाक्य ग्रंथभाषेच्या व्याकरणास अनुसरून आहे असें मला वाटत नाहीं. 'दुहीं' हे आज्ञार्थीं रूप होय, स्वार्थीं वर्तमान काळीं द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचें रूप असें बहुधा आढळत नाहीं. ह्म- -णून मला वाटतें कीं हाच पाठ शुद्ध होय.

---

१ दुहीं हें दुहणे या धातूचें ग्रंथभाषेंत आज्ञार्थीं द्वितीय पुरुषाचें एकवचनाचें रूप होय.

२ कीं हें एथें अवधारणार्थीं अव्यय जाणावें. पंढरपूर, सोलापूर, या प्रांतीं - 'तूं जा कीं,' 'तुह्मी बोला कीं,' 'इतकें काम करा कीं,' ह्मणजे जाच, बोलाच, कराच, अथवा, जा तर खरा, बोला तर खरे, करा तर खरे, अशी बोलण्याची रूढि फार आहे.

कथासुरभियाभल्यास्वजननीहुनीवाटती ॥
शिशूंसजरठांसहीनिरखितांरसेंदाटती ॥
दुहोतभलतेसदातरिनलेशहीआटती ॥
स्ववत्समलभक्षितीपरिनसर्वथावाटती ॥ ५८ ॥

मागील दोन केकांत भगवत्कथांस कामधेनूची उपमा कवीनें दिली, परंतु ती गौण, असा आपला अभिप्राय कथित होत्साते या व पुढल्या केकेंत कवि त्याच भगवत्कथेचा स्तव करितात.

**पदान्वय**—या कथासुरभि स्वजननीहुनी भल्या वाटती, शिशूंस जरठांस ही निरखितां रसें दाटती, भलते सदा दुहोत तरि लेश ही न आटती, स्ववत्समल भक्षिती परि सर्वथा न वाटती.

**या कथासुरभि स्वजननीहुनी भल्या वाटती,**— या कथासुरभि - या तुझ्या, कथासुरभि - गुणकथारूप कामधेनु, स्वजननीहुनी - आपल्या आई पेक्षां, मला **भ-ल्या वाटती**, भल्या -अधिक स्नेहाळ, **वाटती** - वाटतात-दिसतात; याचें कारण, या तुझ्या कथाकामधेनु **शिशूंस जरठांस ही निरखितां रसें दाटती,— शिशूंस** - बालांस, जरठांस ही- वृद्धांसहि, **निरखितां**- निरखून- स्नेहार्द्रदृष्टीनें अवलोकून, **रसें** - दुग्धेंकरून - पक्षांतरीं स्नेहार्द्रतेनें, **दाटती** - दाटतात - परिपूर्ण भरतात; आया लहान बालकांसमात्र पाहून अथवा त्यांस स्तनास लावून मग पान्हावतात; परंतु या तुझ्या कथाकामधेनु तर ज्ञाता-

त्यांस हि

-त्यांसहि पाहिल्यानें पान्हावतात; तेव्हां या आई पेक्षांहि अधिक स्नेहाळ झटल्या पाहिजेत; आणखी ‘ **भलते सदा दुहोत तरि लेशही न आटती,— भलते** - कोणीहि, **सदा**- निरंतर, **दुहोत**- या कथाकामधेनूला दोहोत, उपमेयार्थी, **दुहोत**- ह्मणजे भगवद्भक्त भगवद्गुणकथनमननानें अंतःकरणशुद्ध्यादि इष्टफलावाप्ति त्या कथांपासून करून घेऊत, **तरि**- तथापि, **लेशही**- एक लेशभरहि, **न आटती**- आटत नाहींत; उपमेयार्थी, इष्टफलप्रदाना विषयीं असमर्थ होत नाहींत; इतर धेनु भलत्यास दोहूं देत नाहींत, आणि एकदां दोहल्या असतां त्यांचें दूध सरतें, कथाधेनु सर्वांस दोहूं देतात, आणि आटतहि नाहींत; आणखी ‘ **स्ववत्समल भक्षिती परि सर्वथा न बाटती,—स्ववत्समल**-आपल्या, **वत्साचा**- वासराचा, **मल**- शरीरा वरील मळ, अथवा मूत्रादि अंतर्मल, उपमेयार्थी, **स्ववत्समल**- ह्मणजे शरणागतस्वभक्तकृतपाप, त्या धेनु ‘ **भक्षिती** - भक्षितात- चाटून खातात, उपमेयार्थी, तें पाप दूर करितात, **परि**-परंतु- तथापि, **सर्वथा**- कधींहि- अगदीं, **न बाटती**-बाटत नाहींत-मलभक्षणानें अपवित्र होत नाहींत - त्यांच्या दोषानें आपण दोषी होत नाहींत. एथें भगवद्गुणकथा जें उपमेय त्याचें कामधेनु जें उपमान त्या- पेक्षां, वृद्धांस पाहून पान्हावणें, भलत्यानें दोहल्या असतां आणि निरंतर दोहल्या असतांहि नआटणें, स्ववत्समलभ- क्षणानेंहि अपवित्र नहोणें, या धर्मकथनानें आधिक्य वर्णिलें आहे, ह्मणून हा व्यतिरेक अलंकार जाणावा.

**कथांशिउपमादिल्हीसुरभिचीदिसेनीटती ॥**
**परंतुबहुमंदमीह्मणुनिसच्छ्रुतीवीटती ॥**
**कथानिरुपमातयांप्रतिपशूपमाशुद्धतें ॥**
**नव्हेचिनविचारिलेंबुधजनांशिम्यांउद्धतें ॥ ५९ ॥**

भगवत्कथांस कामधेनूच्या उपमेचें गौणत्व प्रकारांतरें-करून कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय** — कथांशि सुरभिची उपमा दिल्ही ती नीट दिसे, परंतु मी बहु मंद ह्मणुनि सच्छ्रुती वीटती; कथा निरुपमा, तयां प्रति पशूपमा तें शुद्ध नव्हेचि, म्यां उद्धतें बुधजनांशि न विचारिलें.

**कथांशि सुरभिची उपमा दिल्ही ती नीट दिसे,** - **कथांशि** - भगवद्गुणकथांस, **सुरभिची** - कामधेनूची, उपमा दिल्ही, ती योग्य दिसती खरी - कित्येकांस ती उपमा बाह्यात्कारीं नीट दिसेल खरी; **परंतु मी बहु मंद ह्मणुनि सच्छ्रुती वीटती,** - परंतु मीं फारच मंदबुद्धि ह्मणून, सच्छ्रुती वीटती, - **सच्छ्रुती,** - **सत्** - साधु-तत्वज्ञानी, त्यांच्या श्रुती-[1] कान, अथवा, सत्-चांगल्या-तत्वज्ञानेंकरून सूक्ष्म झालेल्या अशा, श्रुती- कान, वीटति-विटतात; अर्थात् तत्वज्ञानी पुरुषांचे कान या अशा अप्रशस्त - वेड्यावांकड्या उपमेनें विटून जातात; तत्वज्ञानेंकरून त्यांचें श्रवणज्ञान अतिसूक्ष्म झालें असतें ह्मणून तत्काळ अशा

उपमेचें

---

१ एथें श्रुतिशब्द न्हस्वइकारान्त असतां दीर्घईकारान्त कवींनीं केला आहे तो द्विवचनांत आहे हें जाणविण्या कारितां; असें समजावें.

उपमेचें अप्राशस्त्य त्यांस समजतें, आणि त्यांच्या कानास त्या कर्कश लागतात; अर्थात् ज्यांस सच्छ्रुती नाहींत, जे केवळ शाब्दिक ह्मणजे शब्दार्थवेत्ते त्यांस अशा उपमा नीट दिस-तात; परंतु ज्यांस सच्छ्रुती आहेत त्यांस अशा उपमा प्रशस्त दिसत नाहींत. सच्छ्रुती काय ह्मणून विटतात तें सांगतात ⁄ **कथा निरुपमा,—** भगवद्गुणकथा, केवळ⁄ **निरुपमा-** अ-नुपमेय - उपमेस योग्य नाहींत - अर्थात् स्वतः भगवान् निरुपम तेव्हां त्याचे गुणहि निरुपम, मग ⁄ **तयां प्रति पशूपमा तें शुद्ध नव्हेचि,—तयां** प्रति - अशा निरुपम ज्या कथा त्यांस, **पशूपमा,** - **पशु** - अर्थात् कामधेनु -य-द्यपि स्वर्गस्थांचे मनोरथ पूर्ण करणारी झाली तथापि धेनुत्वें-करून ती पशुच, तिची उपमा देणें ⁄ **तें शुद्ध नव्हेचि,** - तें प्रशस्त नाहींच नाहीं; असें असतां⁄ **म्यां उद्धतें बुधजनांशि न विचारिलें,— म्यां उद्धतें** - स्वबुद्धीच्या अभिमानानें उन्नत झालेला जो मीं त्या म्यां, बुधजनांशि -ज्ञानीजनास-तत्ववेत्तेजनास, **न विचारिलें** - विचारिलें नाहीं - अशी भगवद्गुणकथांस कामधेनूची उपमा द्यावी किंवा नाहीं या विषयीं त्यांचें अनुमत प्रथम घेतलें नाहीं असा अर्थ;¹ अ-र्थात् त्यांचें अनुमत घेतलें असतें तर ते अशी कामधेनूची उपमा द्यावयास नसांगते; अशी एथें कवीनीं आपली विन-यता इंगित केली आहे.

---

१ भगवत्कथा अतिसरस ह्मणून भागवतांत गोपींनीं आपल्या गीतांत वर्णिलें आहे.—

तवकथाऽमृतंतप्तजीवनं । कविभिरीडितंकल्मषापहं ॥
श्रवणमंगलंश्रीमदाततं । भुविगृणंतितेभूरिदाजनाः ॥ ९ ।

भाग०,द०स्कं०,अ०३१,

**असेंहिउपदेशितीगुरुरहस्यमंदारुचे ॥'**
**निजस्तवजसातसाअगुणघेनवंदारुचे ॥**
**ह्मणोनिनिंगमस्तुलाभलतसेंतुलावानितों ॥**
**परंतुत्वद्दयींमहाजनभयासमींमानितों ॥ ६० ॥**

मागील दोन केकांत कामधेनूच्या उपमेचें न्यूनत्व दर्शविलें खरें, परंतु तेणेंकरून आपल्या स्तवनास न्यूनत्व येत नाहीं, तें निरंतर स्वीकारास योग्यच आहे, असा आपला अभिप्राय कथित होत्सांते कवि या केकेंत ह्मणतात.

**पदान्वय—** निजस्तव जसातसा रुचे, वंदारुचे अगुण मघे, असेंहि गुरु रहस्यमंदा उपदेशिती; ह्मणोनि निगमस्तुता भलतसें तुला वानितों, परंतु मीं त्वद्दयीं महाजनभयास मानितों.

**निजस्तव जसातसा रुचे,**- भगवंतास' निजस्तव- आपला स्तव-स्तुति, जसातसा-जसा कोणि करील तसा-जसा कोणी आपल्या बुद्धीच्या शक्ती प्रमाणें करील तसा, रुचे- रुचतो-आवडतो; आणि' **वंदारुचे अगुण मघे,**-वंदारुचे- वंदन करणाराचे[१]- अर्थात् स्तुतिपाठकाचे- अनन्यभावेंकरून शरण जाऊन जो कोणी यथामति भगवंताचें स्तवन करितो त्याचे.

---

१ हा शब्द मुळीं 'वद-अभिवाद स्तुत्योः' या धातू वरून कर्त्रर्थीं आरु प्रत्यय होऊन झाला आहे.

लज्जाशीलेऽपत्रपिष्णुर्वंदारुरभिवादके—

अमर.

त्याचे, **अगुण**- दुर्गुण[1], **नघे**-घेत नाहीं; अर्थात् अशा स्ताव- -काचा दोष नपाहतां त्याणें यथामति आपला जो स्तव तो भगवान् गोड मानून घेतो; **असें हि गुरु रहस्यमंदा उपदेशिती,—असें हि** - वरल्या केकेंत मीं आपलें बुद्धि- -मांद्य प्रकट केलें तथापि वर सांगितल्या प्रमाणें भगवंतास आपला स्तव कोणी यथामति जसातसा केला तरीं रुचतो, आणि तो वंदन करणाराचा दोष घेत नाहीं, असें हि, **गुरु**- ज्ञानी पुरुष-सत्ज्ञानोपदेशक, **रहस्यमंदा**,- रहस्य-तत्वज्ञान- भगवद्भक्तीचें यथार्थ ज्ञान, त्या विषयीं जो **मंद**- अज्ञ- अचतुर, त्याला, **उपदेशिती** - सांगतात; अथवा, एथें '**रह- स्यमंदा**' हा एक सामासिक शब्द नकरितां, **असें हि रहस्य गुरु मंदा उपदेशिती**, - हें वर सांगितलें जें 'वंदारुचे अगुण नघे' ह्मणून **रहस्य** तें, गुरुजन मंदमतीस सांगतात, असा अर्थान्वय करावा; अथवा, एथें **गुरुरहस्य** — उपदेशकां- -चा जो तत्वबोध तें, हें एक पद करून, '**उपदेशिती**' या क्रियापदाच्या कर्त्याचा अध्याहार करावा, आणि **असें** याचा संबंध **गुरुरहस्या** कडेस योजून- 'असें हि गुरुरहस्य मंदा उपदेशिती' असा पदान्वय करावा. **ह्मणोनि निगम-**

स्तुता

---

१ अगुण ह्मणजे अवगुण,दोष,असा एथें अर्थ. नञ्शब्दप्रकरणा मध्यें अ अ० अन् हा आगम अन्यत्व, सादृश्य, विरोध, अप्राशस्त्य, इतक्या अर्थाचा बोधक होतो ह्मणून सांगितलें आहे. एथें गुणाच्या विरुद्ध जो दुर्गुण त्याचा बोधक जाणावा.

अमर.

-स्तुता भलतसें तुला वानितों,— ह्मणोनि- कोणी-
-यथामति कशीहि तुझी स्तुति केली तरीं तूं तिचा स्वीकार
करितोस ह्मणून, निगमस्तुता,- हे निगमस्तुता,-निगम-
वेद, त्यांणीं[1] स्तुत- स्तविजेला, असा जो तूं ( संबोधन ),
-अथवा, निगमस्तुत जो तूं त्या तुला, भलतसें— यथामति-
जसें मला सुचेल तसें, मीं[1] तुला, वानितों- स्तवितों-जीं जीं
पदें माझ्या बुद्धीस समयास सुचतील तीं तीं पदें योजून
मी तुझा स्तव करितों; परंतु मीं त्वद्वर्यी महाजनभया-
-स मानितों, -परंतु - समयास सुचेतील तशा पदांनीं तुझी
स्तुति करितों खरा तथापि, मीं, त्वद्वर्यी - आपल्या मनांत,
महाजनभयास,- महाजन- विद्वान- वैयाकरण नैयायिक
साहित्यशास्त्रज्ञ जे शब्दशास्त्रवेत्ते व अर्थवादी पंडित,
यांचें जें[1] भय— हे माझ्या पद्योजनेस कोणता दोष ला-
विनील न कळे असें जें त्यांज विषयीं भय, त्यास, मानितों-
मनांत बाळगितों; सारांश तत्ववेत्ते ज्ञानी यांचें अथवा
तुझेंहि भय मला वाटत नाहीं, परंतु भलतशा पद्योजनेनें
अशा शाब्दिक पंडितांचें भय माझ्या मनांतून जात नाहीं;
असा एथें ध्वनितार्थ जाणावा.

---

१ तुकोबानेंहि अशीच प्रार्थना केली आहे;—

माझ्याबोबडीयाबोला चित्तद्यावेंगाविठ्ठला ॥
मजहांसतीललोक परिमीगाइननिःशंक ॥

**ह्मणेंस्वकृतिच्याउणेंकिमपिएकवर्णीनहो ॥**
**असेंतुजकधींबरेंविगतशंकवर्णीनहो ॥**
**असेचिअशिआवडीकरिशिकांनअत्यादर ॥**
**स्वभक्तसुरपादपाहरिनसेचिसत्यादर ॥ ६१ ॥**

सुंदर आणि सम्यगर्थवान् अशा शब्दांनीं तुझा स्तव करावा अशी मला इच्छा नाहीं असें त्वां समजूं नये; तशी इच्छा मला आहे, परंतु तीहि पूर्ण करणारा तूंच ह्मणून स्वाभिप्राय प्रकट करीत होत्साते कवि प्रार्थितात.

**पदान्वय**— स्वकृतिच्या एक वर्णीं किमपि उणें नहो ह्मणें, असें तुज विगतशंक कधीं बरें वर्णीन हो; अशि आ-वडी असेचि, अत्यादर कां न करिशि, स्वभक्तसुरपादपा हरि सत्या दर नसेचि.

**स्वकृतिच्या एक वर्णीं किमपि उणें नहो ह्मणें,**— स्वकृतिच्या-आपण केली जी भगवत्स्तुत्यात्मक कृति तिच्या, **एक वर्णीं**- एक वर्णाच्या ठायींहि, **किमपि उणें नहो**- कांहीं न्यून न व्हावें-अर्थात् त्या स्तुतिचें एक अक्षरहि व्यर्थ नसावें, असें-ह्मणें-मीं ह्मणतों; **असें तुज विगतशंक कधीं बरें वर्णीन हो,—असें**- या प्रकारें-त्या माझ्या स्तुतीचा एक वर्णही व्यर्थ नसावा असें, तुज विगतशंक **कधीं बरें वर्णीन हो**-तुला, विगतशंक-निःशंक होत्सातां-अर्थात् मत्कृत स्तुतींत एक वर्णहि व्यर्थ पडल्याची शंका मनांत नधरितां, **कधीं बरें वर्णीन हो**-कधीं बरें हो[1] तुझें वर्णन करीन; **अशि**

आवडी

[1] हो हें पादपूरणार्थक अव्यय सरें, परंतु एथें याचा प्रयोग्य वक्त्याची अनुरता प्रकटनार्थ जाणावा.

**आवडी असेचि,**- अशी- या प्रमाणें यथायोग्य प-दयोजनेनें तुझा स्तव करावा अशी, **आवडी असेचि**- इच्छा तर आहेच आहे; **अत्यादर कां न करिशि,**—मग त्या माझ्या आवडीचा अत्यादर कां करित नाहींस- अर्थात् तो माझा मनोरथ तूं परिपूर्ण कर; **स्वभक्तसुरपादपा हरि सत्या दर नसेचि;**— **स्वभक्तसुरपादपा हरि**- हे स्वभ-क्तसुरपादपा हरि, **स्वभक्तसुरपादपा-स्वभक्त**- आपले भक्त- अर्थात् प्रार्थनापूर्वक जे आपले शरणागत, त्यांचा **सुरपादप सुर**- देव, त्यांचा **पादप**-वृक्ष- देवांचावृक्ष-.अर्थात् कल्पवृ-क्ष- वांच्छित अर्थ पूर्ण करणारा अशा, **हरि**-हे हरि-हेस्वभ-क्तदोषपरिहारका,(हीं दोन्हीं एथें हेतुगर्भ संबोधनें जाणावीं;) **सत्या दर नसेचि,**-सत्याला भय नाहींच; सारांश तुझा स्तव योग्य पदयोजनेनें करावा ही माझी इच्छा जर सत्य अंतःकरणपूर्वक आणि यथार्थ आहे, तर मग तिच्या याथा-र्थ्यास भय कोणतें,-शंका कोणती, तूं ती पूर्ण कां करित ना-हींस,- तीहि माझी इच्छा तूं परिपूर्ण कर, असा अर्थ.

**ध्रुवस्तवानिंआवडीधरिह्मणोनिअत्यादरें ॥**
**तुह्मींकरुनिदाविलीशिवुनिगल्लसत्यादरें ॥**
**तसेंमजकराकरांबुजधराशिरींमावरा ॥**
**वराभयपरापराक्रमपटोमनाआवरा ॥ ६२ ॥**

अशी भगवंताचा स्तव करण्याची आवडी कोणी मनांत धरिली, ह्मणजे ती इच्छा त्याणें केव्हां पूर्ण केली, हें उदाह- -रणानें कथित होत्सातें कवि ह्मणतात.

**पदान्वय—** ध्रुव स्तवानिं आवडी धरि, ह्मणोनि तुह्मीं दरें गल्ल शिवुनि अत्यादरें सत्या करुनि दाविली, तसें मज करा, शिरीं करांबुज धरा, मावरा वराभयपरा पराक्रमपटो मना आवरा.

पूर्वी **ध्रुव स्तवानिं आवडी धरि,**-ध्रुव-उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुवनामा तुमचा महा भक्त त्याणें, **स्तवानिं**-तुमच्या स्तवना विषयीं, **आवडी**- अभिरुचि- मनापासून अवडती इच्छा, **धरि**- धरिली; **ह्मणोनि तुह्मीं दरें गल्ल शिवुनि अत्यादरें सत्या करुनि दाविली,**— ह्मणून, तुह्मीं, **दरें**- शंखानें- आपल्या हातांत जो शंख वागवितां त्याणें, **गल्ल**- गाल - अर्थसंदर्भानें त्या ध्रुवबालकाचे गाल, **शिवुनि** - स्पर्शून, **अत्यादरें**- मोठ्या प्रेमानें, **सत्या करुनि दाविली,**- **सत्या**-खरी-अर्थात् ती त्या ध्रुवाची आवड खरी, करून दाखविली; तात्पर्य जेव्हां त्या ध्रुवबालकानें तुमच्या स्तवना विषयीं स्वोत्कंठा प्रकट केली, तेव्हां तुह्मींहि त्या बालकाचे गाल आपल्या हातांतील शंखानें स्पर्शून मोठ्या प्रेमानें ती

त्याची

त्याची आवड योग्य आहे ह्मणून दाखविलें; अर्थात् ती त्या-ची इच्छा तुह्मीं पूर्ण केली; ( अथवा, एथें अत्यादरें या पदाचा अन्वय 'सत्याकरूनि दाविली' या पदां कडेस नलावितां शिवुनि या धातुसाधित अव्यया कडेस लावावा ) लोकांतहि मुलांच्या गालास स्पर्श करून उत्तेजन देण्याचा व्यवहार प्रसिद्ध आहे, ह्मणून एथें गल्लस्पर्शनानें ध्रुवाचें बालकत्व इंगित होतें; यास्तव कवि ह्मणतात; **तसें मज करा,** - जसें ध्रुवास केलें तसें मला करा; **शिरीं करांबुज धरा,** -शिरीं- माझ्या मस्तकीं, **करांबुज**-हस्तकमळ-अर्थात् आपला वरद हस्त, **धरा**- ठेवा; एथें ध्रुवा प्रमाणें मीं बालक नाहीं ह्मणून माझें गल्लस्पर्शन अयोग्य, यास्तव माझ्या मस्तकीं आपला वरद हस्त ठेवा, असा कविहृद्गतार्थ दिसतो. एथें स्पर्शनरूपानें व्यवहारसादृश्यार्थ 'तसें' या सर्वनामाचा प्रयोग जाणावा. **मावरा वराभयपरा पराक्रमपटो मना आवरा,** - **मावरा**- हे मावरा, **मा**- लक्ष्मी,[1] तिचा वर- पति, हे लक्ष्मीपते, अथवा, **म**-ब्रह्मा,[2] त्याची शक्तिरूप पत्नी **मा**- ब्राह्मी-सरस्वति, तिला आहे वर ज्या पासून असा; पूर्वोक्त केकांत यथार्थ पदांनीं स्तवन करण्या विषयीं कवीची प्रार्थना आहे ह्मणून एथें भगवंताच्या ठायीं सरस्वतीवरदत्वगुणारोपण

प्रशस्त

---

१ इंदिरालोकमातामाक्षीरोदतनयारमा

अमर.

२ अकारोविष्णुरुद्दिष्टउकारस्त्वमहेश्वरः ।
मकारउच्यतेब्रह्माप्रणवेनत्रयोमताः ॥

दुर्गादास.

प्रशस्त होय; 'लक्ष्मीपते' या विशेषणरूप संबोधनानें कवीनें पदलालित्येंकरून जी स्वकाव्यरचनेची शोभा तद्विषयक जें प्रभूचें दातृत्व तें सुचविलें; अथवा, **मावरा,** - मा - लक्ष्मी- शोभा - अर्थात् पदलालित्येंकरून काव्यरचनेची शोभा, व- वरुण-[1] रसात्मकदेवता- अर्थात् अजहल्लक्षणेनें करूणादि नव रस, आणि **र**- अग्नि-[2] तेज- प्रकाश- अर्थात् बुद्धिप्रकाश- अंतःप्रकाश, एतद्रूप जो तूं त्याची संबुद्धि;[3] **वराभयपरा,**- हे वराभयपरा, **वर**- वांछितमनोरथपूरक आशीर्वचन, तेणेंकरून जें 'अभय-निश्चितत्व, त्या विषयीं 'पर- तत्पर- तत्प्रदाना विषयीं तत्पर; या विशेषणरूप संबोधनानें कवीनें प्रभूचें आपल्या सत्काव्यरचनाविषयक चिंतेचें परिहारकत्व सुचविलें; **पराक्रमपटो**-हे पराक्रमपटो, **पराक्रम**-मज सारख्या मंदमतीस बुद्धिप्रदानरूप जो उपक्रम, त्या विषयीं **पटु**- कुशल- दक्ष, असा तूं त्याची संबुद्धि; या विशेषणरूप संबोधनानें

---

१ वःसांत्वनेचवातेचवरुणेचनिगद्यते.

एकाक्षरीकोश.

२ रःस्मृतःपावकेतीक्ष्णेपुंसिराःस्वर्णवित्तयोः

३ गीतेंतहि ह्मटलें आहे;—

कीर्तीःश्रीर्वाक्चनारीणांस्मृतिर्मेधाधृतिःक्षमा

अ० १०, श्लो० ३४

वरुणोयादसामहं

—— श्लो० २९.

तेजस्तेजस्विनामहं

—— श्लो० ३६.

संबोधनानें कवीनें पराक्रम या शब्दाच्या योजनेनें आपलें मंदमतित्व ध्वनित करून प्रभूचें सर्वशक्तित्वहि सुचविलें; अथवा, **पराक्रमपटो**- **पर**-शत्रु-सत्काव्यरचनेनें भगवत्स्तवनास प्रतिबद्धक जीं नानाप्रकारचीं विघ्नें तद्रूप, त्यांचा जो **आक्रम** - आक्रमण- घाला घालून नाश करणें, त्या विषयीं **पटु**- कुशल,- अर्थात् हे विघ्नहारका; असा अर्थ करावा. **मना, आवरा**-इतकेंहि न कराल तर **मना**-या माझ्या मनाला, **आवरा**- आटोपा; अर्थात् सुंदर व यथार्थ अशा पदरचनेनेंच तुझा स्तव करावा ह्मणून जो माझ्या मनांत तरंग उठला आहे, तो तरी आवरा; तो आवरण्याची शक्ति प्रभुच्या ठायीं आहे हें कवीनें 'पराक्रमपटु' या विशेषणानेंहि एथें स्पष्ट सुचविलें आहे. एथें कवीनें शेवटीं 'मना आवरा' या आपल्या अभिप्रायानें सुंदरपदरचनेनेंच भगवत्स्तवनाची जी इच्छा तिचें किंचित् वैयर्थ्यहि इंगित केलें आहे असें मला वाटतें.

**करांबुजअसोनसेंउचितत्यासमीपामर ॥**
**प्रणामकरितीपदाप्रतिहिसन्मुनीसामर ॥**
**पदाब्जरजहीजगत्त्रयनमस्क्रियाभाजन ॥**
**प्रसादचतुराकसातरिकरावराहाजन ॥ ६३ ॥**

मागल्या केकेंत आपल्या मस्तका वर वरदहस्त ठेवावा ह्मणून कवीनें प्रभूची प्रार्थना केली, परंतु तितक्या महत्प्रसादास मी पात्र नाहीं असा आपला अभिप्राय दर्शवित होत्साते कवि प्रार्थितात.

**पदान्वय**- करांबुज असो, त्यास मी पामर उचित नसें, सामर सन्मुनी पदा प्रति हि प्रणाम करिती; पदाब्जरज ही जगत्त्रयनमस्क्रियाभाजन, चतुरा कसा तरि प्रसाद करा, हा जन वरा.

**करांबुज असो**, - **करांबुज** - हस्तकमल - माझ्या मस्तका वर तुह्मीं आपला वरद हस्त ठेवावा ह्मणून म्यां ज्या विषयीं आपली प्रार्थना केली तें तुमचें हस्तकमल, **असो**- अर्थात् त्या तुमच्या हाताची गोष्ट तर सद्यः एकी कडे राहो; कारण- **त्यास मी पामर उचित नसें,- त्यास**- त्या तुमच्या हस्तकमलास, **मी पामर** - मी कुत्सितजन, **उचित**- योग्य, **नसें**- नाहीं; अर्थात् एवढ्या षड्गुणैश्वर्यवान् प्रभूनीं आपला हात माझ्या मस्तका वर ठेवावा इतकें माझ्या पामराचें पुण्य नाहीं; परंतु- **सामर सन्मुनी पदा प्रति हि प्रणाम करिती,- सामर,- अमर**- देव, त्यां सहित- त्यांनीं युक्त होत्साते,

सन्मुनी

**सन्मुनी** - नारदसनकसनंदनादि जे महा मुनी - अर्थात् सर्व देवगणा सुद्धां नारदादि महामुनी, **पदा प्रति हि** -तुम--च्या पायासहि, **प्रणाम करिती** - नमस्कार करितात; सारांश तो आपला चरणकमलहि इतका पूज्य आहे कीं देवां सुद्धां नारदादि सन्मुनी ज्यास नमस्कार करिता-त; तेव्हां अर्थात् तो आपला चरण माझ्या मस्तका वर ठेवा असा एथें विवक्षितार्थ जाणावा. चरणकमलहि राहूं द्या **पदाब्जरज हीं जगत्त्रयनमस्क्रियाभाजन**, - पदा-ब्जरजही- पदाब्ज- चरणकमल, तत्संबंधी जो **रज**-रजःकण- धूलिकण, तोही, - **जगत्त्रयनमस्क्रियाभाजन**-**जगत्त्रय** - तीनलोक-भूस्वर्गादि-अर्थात् सर्व जगत्, त्याची अर्थात् जगत्त्रयानीं कर्तव्य जी-**नमस्क्रिया**-नमस्कार, त्यास **भाजन**- पात्र; अर्थात् तुमच्या पदसंबंधीं रजःकणही सर्व विश्वास पूज्य होय. ( एथें 'होय' या क्रियापदाचा अध्याहार जाणावा; ) सारांश तुह्मीं आपला चरणकमलहि राहूं द्या, परंतु तत्संबंधी एक धूलिकण जरीं माझ्या मस्तका वर ठेवाल तरीं मीं कृतार्थ होईन असा एथील कवित्द्गतार्थ जाणावा. शेवटीं उपसंहार करित होत्साते कवि ह्मणतात **चतुरा कसा तरि प्रसाद करा**,- चतुरा- हे चतुरा--हे वर देण्या विषयीं कुशला, कसा तरि आतां प्रसाद करा; हे वर तीन प्रकार सांगितले यांतून कोणत्याहि एका प्रका-रचा, अथवा जो आपल्या मनास योग्य दिसेल तो, प्रसाद मला द्या; आणि **हा जन वरा**,- **हा जन**- कवि ह्मणतात हा जो मीं जन त्या मला, **वरा**- माझा स्वीकार करा, असा अर्थ.

या

या केकेंत प्रथम तीन चरणांत हस्तकमलापासून पदाब्ज-रजा पर्यंत वर्णनीय अर्थांचा उत्तरोत्तर न्यूनीभाव दर्शवून त्याच्या त्याच्या महिमेचा उत्कर्ष वर्णिला आहे, आणि तो स्वोत्कर्षास कारणहि मानिला आहे, ह्मणून एथें हा सारालंकारांमिश्रित प्रौढोक्ति अलंकार जाणावा.

मज जवळ सद्यः ज्या दोन प्रती आहेत, त्यांत या केकेच्या चौथ्या चरणाचा पाठ वर लिहिल्या प्रमाणें आहे. परंतु मला वाटतें तो पाठ-'**प्रसाद चतुरा कसें तरि करा वरा हा जन**' असा असावा; ह्मणजे यांत'**प्रसाद-**-चतुरा-' हे प्रसाद करण्या विषयीं चतुरा- कुशला; कोणास कसा वर द्यावा, कोण कोणत्या प्रसादास पात्र, हें तारतम्य जाणण्या विषयीं चतुर, असें एकपद करून संबोधन केलें असतां, आणि 'कसेंतरि करा वरा हा जन,' -कसें तरि करून माझा स्वीकार करा, ह्मणजे तुह्मास योग्य दिसेल तो कोणताहि प्रसाद देऊन एकदां माझा स्वीकार कराच करा, असा अगत्यवाद दर्शविला असतां, अर्थगौरव अधिक होतें; ह्मणून असा पाठ असल्यास तो मला अधिक प्रशस्त दिसतो.

तुह्मींकरुनिदाविलाध्रुवकृतार्थजैसादरें ॥
तसेंचिजरियोजिलेंतुमचियामनेंसादरें ॥
असोविहिततेंकरांपरिबरोबरीत्यासवें ॥
नसेउचिततोमहाप्रबळवंदिजेवासवें ॥ ६४ ॥

मागील केकेंत जो उपसंहार केला तोच स्पष्ट करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**- तुह्मीं दरें जैसा ध्रुव कृतार्थ करुनि दाविला, तसेंचि तुमचिया सादरें मनें जरि योजिलें; असो विहित तें करा, परि त्या सवें बरोबरी उचित नसे, तो महा प्रबळ, वासवें वंदिजे.

**तुह्मीं दरें जैसा ध्रुव कृतार्थ करुनि दाविला,**- तुह्मीं, आपल्या हातांतील **दरें** - शंखानें- अर्थात् शंखस्पर्शनानें, ज्या प्रकारें ध्रुव, **कृतार्थ** - सिद्धमनोरथ, असा **करुनि-दाविला,**-करून दाखविला;-ज्या प्रकारें तुह्मीं ध्रुवबा-लकाची इच्छा परिपूर्ण केली, ह्मणजे तुह्मीं त्यास अढळ स्थान दिलें; अर्थात् त्याची संसृति बंद करून त्यास अविनाश सुखस्थानीं बसविलें; **तसेंचि तुमचिया सादरें मनें जरि योजिलें,**- **तसेंचि**- त्या ध्रुवा प्रमाणें अढळस्थान मला देण्या करितां, **तुमचिया सादरें मनें,**- तुमच्या, **सादरें**- प्रीतियुक्त- दयायुक्त अशा, **मनें**- मनानें, **जरि योजिलें**- जर योजिलें असेल; मलाहि तसें ध्रुवा सारखें अढळ स्थान द्यावें ह्मणून तुह्मीं आपल्या दयायुक्त अंतःकरणानें जर योजना केली असेल; तर **असो विहित तें करा,**- तर असो, **विहित**- योग्य, तें करा, तुह्मास जें मज विषयीं

हितकारक

हितकारक वाटेल तें करा; **परि त्या सवें बरोबरी उचित नसे,- परि-** परंतु, **त्या सवें-** त्या ध्रुवाशीं, बरोबरी करणें मला ह्मणून योग्य नाहीं; अर्थात् तुह्मी सदय होऊन जर तशी कृपा मज वर करित असलां तर तें तुमचें स्वातंत्र्य आहे; असा कविस्हृद्गतार्थ एथें ध्वनित होतो. मला कां योग्य नाहीं ह्मणून पुसाल तर एका **तो महा प्रबळ,- तो-** ध्रुव, **महा प्रबळ-** मोठा शक्तिवान- भक्तिवैराग्यरूप जी महच्छक्ति तद्युक्त; ह्मणून **वासवें वंदिजे,- वासवें-** इंद्रानें,[1] **वंदिजे-** वंदिजेतो- वंद्य होय; अथवा, **महाप्रबळ** हें ध्रुवाचें विशेषण नकरितां इंद्राचें विशेषण केलें तरी चालेल. अर्थात् इंद्रानें वंदन करायास योग्य जो ध्रुव, त्याची बरोबरी करणें मला योग्य नाहीं; तुह्मी सदय होऊन जर त्याच्या पदा प्रमाणें अढळ पद मला देत असलां, ह्मणजे जन्ममरणाच्या परिभ्रमणापासून मला मुक्त करित असलां, तर अशी मज दीना वर महत्कृपा करण्यास तुह्मी स्वतंत्र अहां, असा एथें कवीचा ह्रद्गतार्थ जाणावा.

---

१ सुत्रामागोत्रभिद्वज्रीवासवोवृत्रहावृषा.

अमर.

कितीवयकसेंतपप्रखरकायविश्वासतो ॥
ध्रुवध्रुवखरास्तवाउचितहोयविश्वासतो ॥
कशींतुळितसांतुह्मींप्रकटमेरुशींमोहरी ॥
प्रसादकरितांउणेंअधिकनाठवाहोहरी ॥ ६५ ॥

ध्रुवाचें वर्णन चालवून कवि स्वाभिप्राय प्रकट करितात.

**पदान्वय**—किती वय, तप प्रखर कसें, तो विश्वास काय, ध्रुव ध्रुव खरा, तो विश्वास स्तवा उचित होय, तुह्मीं प्रकट मेरुशीं मोहरी कशी तुळितसां, हरी प्रसाद करितां अधिक उणें नाठवा हो.

**किती वय**,-त्या ध्रुवबालकाचें वय, किती- केवढें अल्प; **तप प्रखर कसें**,-[1] तप- त्याचें तप- तपश्चर्या, प्रखर- तीव्र- कठीण, कसें; **तो विश्वास काय**,- तो-त्या ध्रुवाचा, विश्वास-परमेश्वराच्या ठायीं एकनिष्ठ भाव, काय[2] कसा-केवढा निश्चयात्मक; ( एथें 'किती वय' इत्यादि तिन्हीं वाक्यांत 'होय' अथवा 'होता' या क्रियापदाचा अध्याहार जाणावा.

---

१ तपश्चर्येंत इंद्रियनिग्रहादि दुःसह क्रियावलंबन असतें ह्मणून तपास प्रखर ह्मणजे उग्र कठीण ह्मणायाचें.

२ एथें **काय** हें आश्चर्यद्योतक अव्यय जाणावें - विक्रमराजाचें वर्णन करित असतां जर कोणी ह्मटलें, कीं - ' तो राजा काय , त्याची नीति काय, आणि त्या वेळचे लोक तरी काय,' ह्मणजे, पूर्वसंबंधेंकरून तो राजा, त्याची नीति, आणि त्या काळची प्रजा, परम स्तुत्य होती, असा अर्थ; तसाच एथें **काय** या शब्दानें अर्थ जाणावा.

जाणावा. ) **ध्रुव ध्रुव खरा,**-ध्रुव-ध्रुव बालक, ध्रुवें[1]-शाश्वत-अचल- मनोवृत्तिचांचल्यरहित - निश्चयवान, **खरा**- एतद्गुण विशिष्ट होता यांत किमपि संशय नाहीं; ह्मणूनच ' **तो विश्वास स्तवा उचित होय,** - **तो** - ध्रुव, **विश्वास** - साऱ्या जगास- सर्व लोकांस असा अर्थ, **स्तवा**- स्तुतीस, **उचित**- योग्य- पात्र, होय; अर्थात् पांच वर्षांचा बालक असून भगवंताच्या ठायीं इतकी दृढ त्याची निष्ठा, आणि इतकें उग्र त्याचें तप, ह्मणून सारें विश्व त्याची स्तुति करितें; असा ध्रुव थोर योग्यतेचा असतां ' **तुह्मीं प्रकट मेरुशीं मोहरी कशी तुळितसां,**-' कवि प्रभुस ह्मणतात' तुह्मीं, **प्रकट**-स्पष्ट[2]-इतक्या उघड्या रीतीनें, **मेरुशीं**-मेरु पर्वता बराबर - अर्थात् मेरूपम जो ध्रुव त्या बराबर, **मोहरी** - राईचा दाणा-अर्थात् कवि ह्मणतात राई प्रमाणें यःकश्चित् अल्प जो मीं त्या मला, **कशी तुळितसां**-कशी तुळतां; अर्थात् मागल्या केकेंत सांगितल्या प्रमाणें जसा ध्रुव कृतार्थ केला तसें जर तुह्मीं मला कृतार्थ करणार, तर तुह्मीं राईचा पर्वत करणार, असें मला दिसतें; आणि या प्रमाणें राईचा पर्वत करणें हें तुमचेंच सामर्थ्य होय; असा एथें कवित्त्वद्गतार्थ ध्वनित होतो. याच अर्थाचा उपसंहार करित होत्साते कवि शेवटीं आपलें श्रद्धावचन ह्मणून दाखवितात' **हरी प्रसाद करितां अधिक उणें नाठवा हो,**— हरी - हे हरी-

हे

---

१ शाश्वतस्तुध्रुवोनित्यसदातनसनातनाः अमर.

२ हें एथें क्रियाविशेषण जाणावें.- 'तुळितसां' या क्रियापदाशीं याचा संबंध, 'प्रकटंयथास्यात्तथा' असा एथें अर्थ.

हे मच्चिंताहारका, **प्रसाद करितां**- प्रसाद करितांनां- स्वभक्ता वर अनुग्रह करितांनां, **अधिक उणें नाठवा हो**,- हा अधिक, तो उणा, अथवा याचा अपराध अधिक, त्याचा उणा, असें कांहीं, **नाठवा हो**- आठवित नाहीं हो- तुह्मी आपल्या मनांत आणित नाहीं हो.[1] अथवा, **हो हरी**- अहो हरी, **प्रसाद करितां उणें अधिक नाठवा**, असा पदान्वय करावा. एथें अर्थांतरन्यास अलंकार जाणावा.

यांत कवीनें ध्रुवा बराबर स्वतुलनेचें अनौचित्य कथनानें आपला अत्यंत नम्रीभाव प्रकट करून पुनः प्रभूचें कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुंसमर्थत्वहि दर्शविलें आहे.

---

[1] 'हो हें एथें पादपूरणार्थ अव्यय असून येणेंकरून वक्त्याचा अभिप्रेतार्थ संशयरहित असा ध्वनित होतो. ० 'तुह्मी कोणास मारित नाहीं हो,' ह्मणजे तुह्मी इतके दयालु अहां कीं कोणी मारास योग्य जरी अपराध केला तरी तुह्मी त्यास मारित नाहीं असें मी पूर्णपणीं जाणतों असा अर्थ. तसेंच-'मी जातों हो' ह्म० तुह्मी निश्चय जाणा मी जातों, असेंच हो या शब्दयोजनेनें एथें अर्थगौरव जाणावें.

**प्रभुत्वतरिहेंचकींकरुनिदेंकृपादानतें ॥**
**स्वसाम्ययदुपार्जनेंमिरविजेंस्वपादानतें ॥**
**प्रसादमगकायतोजरिनिवारिनालाघवा ॥**
**कसेंदशमुखानुजाविसरलांअहोराघवा ॥ ६६ ॥**

मागल्या केकेंत आपल्या भक्तां वर प्रसाद करितांनां प्रभु अधिक उणें मनांत आणित नाहींत, ह्मणून जो आपला अभिप्राय कवीनीं प्रकट केला, त्याच अर्थाचें एथें समर्थन करित होत्सातें ते ह्मणतात.

**पदान्वय—** प्रभुत्व तरि हेंच, कीं कृपा करुनि तें दान दे, यदुपार्जनें स्वपादानतें स्वसाम्य मिरविजे, जरि लाघवा निवारिना मग तो प्रसाद काय;- अहो राघवा दशमुखानुजा कसें विसरलां.

**प्रभुत्व तरि हेंच,—** प्रभुत्व - स्वामित्व - श्रेष्ठत्व, तर, **हेंच** - यालाच ह्मणावें, **कीं कृपा करुनि तें दान दे,**-कीं कृपा करून तें दान देतें - कृपेनें तें प्रभुत्व असें देणें देतें कीं; **यदुपार्जनें स्वपादानतें स्वसाम्य मिरविजे, — य-**-दुपार्जनें -ज्या दानाच्या ’ उपार्जनें - उपार्जनानें - प्राप्ती-नें, ( करणी तृतीया,-) **स्वपादानतें,- स्वपाद**-आपला चरण- अर्थात् भगवच्चरण, त्यास जो ’ **आनत** - साकल्येंकरून -सर्वभावेंकरून **नत** - नम्र, त्याणें, अथवा, स्वपादा- आ-पल्या चरणास - अर्थात् भगवच्चरणास, जो ’ **नत**- नम्र त्याणें, ( कर्तरि तृतीया, ) **स्वसाम्य**- आपल्याशीं जें **साम्य**- समानता, बरोबरी, **मिरविजे** - मिरविजेतें - मिरविलें जातें;

अर्थात्

अर्थात् तोच प्रभु ह्मणावा कि जो आपल्या शरणागता वर कृपा करून त्यास असें देणें देतो कीं, ज्या देणगीच्या योगानें त्यां आश्रितानें आपल्या बरोबरीची योग्यता मिरवावी; एथें 'स्वपादानतें मिरविजे' या उभय शब्दयोजनेनें त्या आश्रि-तानें ती आपल्या प्रभूनें दिलेली जी आपल्या बरोबरीची योग्यता, ती भूषणास्पद मानून तेणेंकरून प्रभूच्या ठायीं आपलें पादानतत्व ह्मणजे नम्रोभाव नसोडितां त्याचें गौरव करित असावें, असा एथें कविन्दद्गतार्थ ध्वनित होतो. याच अर्थाचें दढीकरण करित-होत्साते कवि आणखी ह्मणतात– **जरि लाघवा निवारिना मग तो प्रसाद काय,**—जरि-जर, **लाघवा**-लघुत्वास-हलकेपणास- अर्थात् स्वभक्ताच्या लघुत्वास, **निवारिना**- निवारित नाहीं- दूर करित नाहीं-घालवून टाकित नाहीं-नाशित नाहीं, **मग**- तर मग, **तो प्रसाद काय**- तो प्रसाद ह्मणून कसा मानावा- तो प्रसादच नव्हे, असा अर्थ; अर्थात् आपल्या शरणागताच्या लघुत्वास दूर करून त्याची योग्यता जर वाढवित नाहीं तर मग तो प्रसाद कशाचा, तो प्रसादच नव्हे, असें समजावें; परंतु असाहि प्रसाद पूर्वी तुह्मीं केला असें स्मरण देत होत्साते कवि ह्मणतात– **अहो राघवा दशमुखानुजा कसें विसरलां,**- **अहो राघवा**- अहो रघुवंशोद्भवा रामचंद्रा, ( हें प्रभूस रामावताराचें स्मरण देण्या करितां संबोधन होय, ) **दशमुखानुजा,**- **दशमुख**-रावण, त्याचा **अनुज**-कनिष्ठबंधु-बिभीषण, त्याला, **कसें विसरलां**- त्याचें स्मरण तुह्मास कसें नाहीं ? रावणाचा वध केल्या नंतर आपल्यास शरण आला जो बिभीषण

त्यास

त्यास लंकेच्या राज्यासनावर स्थापून त्यास तुह्मीं आपली योग्यता दिली, ही आपली रामावतारींची कीर्ति जगप्रसिद्ध असतां ती या प्रसंगीं तुह्मीं कशी विसरलां? अथवा एथें 'अहो' हें आश्चर्यबोधक संबोधनार्थीं अव्यय करून, राघवा- त्या रामचंद्राला, आणि दशमुखानुजा- बिभीषणाला, कसें विस-रलां; अर्थात् ज्या राघवानें आपल्या योग्यतेस बिभीषणास चढविलें त्या राघवाला, आणि त्यास सर्वभावेंकरून शरण आला जो बिभीषण त्याला, कसें विसरलां? असा एथें पदान्वय केला तरी चालेल. एथें तिसऱ्या चरणांत अर्थांतरन्यास अलं-कार जाणावा, आणि चौथ्यांत स्मरण अलंकार जाणावा.

असोहरिकसातरींविमलभावज्याचाकरा ॥
तयावरिदयापचेवरअसाचिद्याचाकरा ॥
वृथाचिगमतेंदिलेंबहुहिजैंनदासाजिरे ॥
पुसोनिअधिकारद्यासुकरतेसदासाजिरे ॥ ६७ ॥

मागील केकेंत स्वभक्ता विषयीं प्रभूचें औदार्य वर्णिलें, तथापि पुनः स्वयोग्यतानुरूपच सेवकांस वर दिल्यानें त्यांत त्याचें कल्याण आहे, असा नम्रतापूर्वक स्वाभिप्राय प्रकट करित होत्साते कवि प्रार्थितात.

पदान्वय— हरि, ज्याचा कसा तरीं विमल भाव असो, तया वरि दया करा, पचे असाचि वर चाकरा द्या; जें दासा न जिरे बहु हि दिलें वृथाचि गमतें, सदा सुकर साजिरें तें अधिकार पुसोनि द्या.

हरि[1] - हे हरि, ज्याचा कसा तरीं विमल भाव असो,— ज्याचा- ज्या सेवकाचा, कसा तरीं भाव असो, परंतु तो विमल- शुद्ध- सप्रेमांतःकरणपूर्वक असो; अथवा, कसा

१ केठें 'हरिच्या' ठिकाणीं 'बरि' असा पाठ आहे; तसा पाठ असतां 'बरि' हें अव्यय केलें पाहिजे. ' कसा तरि असो परंतु विमल बरि भाव असो; ह्मणजे विमल बरिक भाव असो, अशी अर्थयोजना करावी. परंतु बरिक या पादपूरणार्थ अव्ययाच्या ठिकाणीं 'बरि' या शब्दाचा प्रयोग कोठें विशेषकरून माझ्या आढळण्यांत नाहीं, ह्मणून 'हरि' हाच पाठ एथें ठेविला आहे.

कसा तरीं- कसेंहि करून, विमल भाव असो;[1] सारांश कोणत्याहि रीतीनें तो तुमचें भजन करू परंतु तें शुद्धांतःकरणानें करू; ह्मणजे मग ' **तया वरि दया करा,** ' त्या वर तुह्मीं दया करितां; आणि ' **पचे असाचि वर चाकरा द्या,—** **पचे**- पचन होई, असाच **वर**-कृपादान, **चाकरा**-आपल्या सेवकास, देतां; सारांश ज्या आपल्या दानाचा तो सेवक योग्य रीतीनें विनियोग करायास समर्थ होईल, तेंच दान तुह्मीं त्यास देतां. अथवा, एथें - **असो** ह्मणजे मागल्या केकेंत जें 'प्रसादमगकायतोजरिनिवारिनालाघवा' ह्मणून सांगितलें तें सर्व असो, ती गोष्ट सांप्रत तशीच राहूं द्या, असें ' **असो** ' हें अव्यया सारिखें पद मानून, कसातरी ज्याचा भाव शुद्ध त्या वर दया करा, आणि त्याला पचे असाच वर द्या, असा 'करा' आणि ' द्या ' हीं दोन प्रार्थनेच्या अर्थी आज्ञार्थीचीं रूपें मानिलीं असतांहि प्रस्तुत अर्थास व्यत्यय येत नाहीं. अथवा, **ज्याचा कसा तरीं भाव विमल करा,—** ज्या आपल्या सेवकाचा, **भाव**- श्रद्धा, कोणत्याहि प्रकारें तुह्मीं, **विमल**- शुद्ध, **करा**- करितां; **तया वरि दया पचे,—** त्या सेवका वरच तुमची दया पचत्ये; ह्मणजे त्यासच ती दया हितकारक होत्ये; ह्मणोनि ' **असाचि चाकरा वर द्या,—** **असाचि**- पचे असाच, आपल्या सेवकास वर द्या; अर्थात् ज्याचा भाव शुद्ध नाहीं, त्याचें कल्याण होत नाहीं. जो

ज्या

---

[1] जसें- 'तो कसा तरी एकदां जाऊ,' 'ती मुलगी कशी तरी आपल्या सासरीं नांदो,' ह्मणजे कसेंहि करून-कोणत्याहि उपायानें, असा अर्थ; तद्वत् एथें अर्थ जाणावा.

ज्या भावनेनें परमेश्वरास पाहतो त्याच भावनेनें तो त्यास दिसतो. [1] आणखी अर्थांतरन्यासेंकरून कवि ह्मणतात ' **जें दासा न जिरे बहु हि दिलें वृथाचि गमतें,**— जें दासाला जिरत नाहीं- जें जिरविण्याची शक्ति त्यांच्या अंगीं नाहीं, तें जरीं पुष्कळ दिलें तरीं, **वृथाच गम-** -तें- व्यर्थ दिलें असें वाटतें; ह्मणोन ' **सदा सुकर साजिरे** [2] **ते अधिकार पुसोनि द्या,**— सदा- निरंतर, सुकर- करा यास सोईवार- नीट करितां येतील- अर्थात् नीट चाल- -वितां येतील, आणि ' साजिरे- चांगले- अथात् हितकारक, असे जे ते ' अधिकार - पदव्या - अर्थात् सलोकतासमीपतादि ज्या चार मुक्ति, त्यांतून कोणतीही देणें झाल्यास ' **पुसोनि द्या**-पुसोनि- विचारून- विचार करून- स्वदासाची योग्यता पाहून, मग ' द्या; ह्मणजे त्यांस त्याचें हित आहे असा अर्थ.

---

१ हाच अर्थ आनंदतनयानें पुढल्या श्लोकांत फार सरस वर्णिला आहे;-

सीतिलास्मरसाधनूसिहरसाराजांदिसेवीरसा ।
मूढांलानरसाजनानृवरसाभक्तांसिमाहेरसा ॥
देवांईश्वरसारिपूंसिगरसाज्ञात्यांसिचित्सारसा ।
ऐसासर्वरसांसिहेतुपरिसाजोसूर्यत्वन्सारसा ॥

सीतास्वयंवर.

२ साजिरें असा जो नपुंसकलिंगीं पाठ आहे तो मला प्रशस्त दिसत नाहीं.

**प्रसन्नबहुहोतसांपरिकरालहोबावरें ॥**
**शिवापरिवरासवेंत्हृदयहेंनहोबावरें ॥**
**असावृककृतघ्नहेंनकळलेंकसेंहोहरा ॥**
**भलाजगविलातुह्मींभवमहाहिचामोहरा ॥ ६८ ॥**

पात्रतेचा विचार नकरितां जर वर दिला तर तो वर-ग्राहकास तर काय परंतु वर देणारासहि अनर्थक होतो, असें दृष्टांतानें कथित होत्सांत मागील श्लोका वरून कवि देवास ह्मणतात.

**पदान्वय**— प्रसन्न बहु होतसां, परि वरें शिवा परि कराल हो बा, हें त्हृदय वरा सर्व बावरें न हो, वृक असा कृतघ्न हें हरा कसें हो न कळलें. तुह्मीं भवमहाहिचा मोहरा भला जगविला.

एकदां शुद्धांतःकरणानें तुह्मांस शरण गेलें ह्मणजे तुह्मीं आपल्या दयेच्या ओघानें **प्रसन्न बहु होतसां**, - **प्रसन्न** संतुष्ट- आपल्या सेवकां वर केव्हां मीं उपकार करीन ह्मणून उत्सुक, **बहु होतसां**- फारच होतां,- होत असतां; **परि वरें शिवा परि कराल हो बा**,-परि-परंतु-न जाणों, **वरें** वरानें- वरदानानें, **शिवा** परि- शिवा सारिखें- जसें महादेवानें वृकासुराला वरदान देऊन केलें तसें, कराल **हो बा**[१] पहा कदाचित् तसें कराल हो, सांभाळा. **हें त्हृदय वरा सर्व बावरें नहो**,—**हें** -हें माझें, त्हृदय - अंतःकरण-मन, वरा

१ एथें हो, बा हीं पादपूरणार्थीं निषधार्थसूचक अव्ययें जाणावीं. जसें-'तुह्मीं तेथें जाल हो,' 'तुह्मीं कदाचित् त्यांस असें बोलाल हो बा,' ह्मणजे कदाचित् तुह्मीं जाल बोलाल तर तसें करूं नका, असा एथील भावार्थ.

**वरा सर्वे** - तुमच्या वरा बराबर- तुह्मीं वर देतांच असा अर्थ,[१] **बावरें नहो,- बावरें**- वेडें-भांबावल्या सारिखें, **नहो**-न होऊ; सारांश महादेवाच्या वरदानानें जसें वृकासुराचें मन बावरलें तसें तुमच्या वरदानानें हें माझें अंतःकरण बावरें नहोऊ असा अर्थ; **वृक असा कृतघ्न हें हरा कसें हो न कळलें,**—' वृक- तो वृकासुरनामा दैत्य, **असा** - या प्रकारचा, **कृतघ्न**- कृतोपकार विसरून उलटें आपल्या हितकर्त्यास अपकार करणारा, **हें हरा कसें हो न कळलें,**- हें त्या महादेवाला कसें समजलें नाहीं हें मोठें आश्चर्य होय; असो परंतु **तुह्मीं भवमहाहिचा मोहरा भला जगविला,**— तुह्मीं, त्या काळीं **भवमहाहिचा मोहरा,- भवमहाहिचा,- भव**- प्रपंच, हाच कोणी **महा**- मोठा, **अहि**- सर्प, त्याचा, अर्थात् प्रपंचरूप महासर्पाचा, **मोहरा**- सर्पविषाची बाधा दूर करणारा औषधरूप मणि-अर्थात् प्रपंचसर्पा विषयीं विषापहारक मणिरूप महादेव, **भला जगविला** -भला वांचविला-त्या वृकासुरास वर दिल्यानें महादेवाचाच घात होत होता, परंतु तुह्मीं त्यास त्या काळीं त्या दैत्यापासून भलें संभाळिलें; सारांश कुपात्रीं वर दिल्यानें तो वरग्राहक त्या वरदानानें उन्मत्त होतो, तसें मात्र मज विषयीं करूं नका; ज्या अनुग्रहानें माझें हित होईल तोच अनुग्रह मज वर करा असा अर्थ. यांत कवीनीं भगवंताच्या दयेचा अतिशय दर्शवून आपला तद्ग्रहणार्थ पात्रते विषयींचा संशयहि ध्वनित केला. हा एथें दृष्टान्त अलंकार जाणावा.

---

१ 'तो' चाबकाच्या फटक्या बराबर मेला, ह्मणजे चाबकाचा फटका बसतांच मेला, असा अर्थ- तसा एथें सर्वे या अव्ययाचा अर्थ समजावा.

**भजेसुदृढनिश्चयेंद्विजकुमारकक्षीरधी ॥**
**तयाकरितुह्मींचद्यामदनमारकक्षीरधी ॥**
**उदारपणतेंबरेंसुखविजेंसुपात्रासदा ॥**
**दिलेंअमृतपन्नगातशिखळांकुपात्रासदा ॥ ६९ ॥**

वरल्या श्लोकांत कुपात्रीं दयेचा परिणाम सांगितला. यांत सुपात्रीं दया वर्णित होत्साते पुनः पात्रापात्रविवेचन दर्शवित असतां कवि ह्मणतात.

**पदान्वय**— क्षीरधी द्विजकुमारक सुदृढनिश्चयें भजे, तुह्मांच तया करि मदनमारक क्षीरधी द्या, जें सुपात्रा सदा सुखवि तें उदारपण बरें, पन्नगा अमृत दिलें, तशि खळां कुपा त्रासदा.

**क्षीरधी द्विजकुमारक सुदृढनिश्चयें भजे,**— क्षीरधी,- क्षीर-दूध अथवा खीर, त्या विषयीं-अर्थात् तत्संबंधी विषयीं आहे धी- बुद्धि- मन- इच्छा,[१] ज्याची तो ( बहुव्रीहि समास ), सारांश श्रीमंतांच्या मुलांस जशी नित्य खीर मिळत्ये तशी मला एकदां तरि द्रोणभर मिळावी ह्मणून ज्यास इच्छा उत्पन्न झाली असा, अथवा, क्षीरधी - क्षीरविषयक आहे धी - बुद्धि ज्याची असा होत्सातां, असा अर्थ करावा, द्विजकुमारक, द्विज - ब्राह्मण - अर्थसंदर्भानें द्रोणाचार्य, त्याचा कुमारक[२] - लहान मुलगा- अर्थात्

---

१ बुद्धिर्मनीषाधिषणाधीः प्रज्ञाशेमुषीमतिः
अमर.

२ एथे कुमार शब्दा वरून क्षुद्रार्थी क प्रत्यय होऊन कुमारक ह्मणजे लहान मुलगा, अथवा गरीब पोरगा, अशा अर्थानें हा शब्द झाला आहे.

अर्थात् अश्वत्थामा, **सुदृढनिश्चयें**, - **सुदृढ** - अत्यंत दृढ, **निश्चय**- मनाचा निर्धार- ईश्वर मला दूध देईलच देईल, असा मानसिक निश्चय, त्याणें, ( करणी तृतीया ), **भजे**- तुला भजला-शरण आला. **सुदृढनिश्चय** असा पाठ असतां- 'सुदृढ आहे निश्चय ज्याचा' असा बहुव्रीहि करून तें **सारें** 'द्विजकुमारक' याचें विशेषण करावें; अथवा, **क्षी-रधी**- क्षीरविषयक धी- बुद्धि तितें, **भजे** - भजला - अर्थात् खीर मिळावी ह्मणून इच्छा केली, असा अर्थान्वय केला असतांहि प्रशस्त. तेव्हां **तुह्मींच तया करिं मदनमारक क्षीरधी द्या**,-तुह्मींच-अर्थात् तुह्मां शिवाय इतर कोणी ना- -हीं स्वतः तुह्मी, **तया करिं**-त्याच्या[1] हातीं-त्या अश्वत्थामा बालकाच्या हातीं - अर्थात् त्याच्या स्वाधीन, **मदनमार-क**,-**मदन** - काम[2] -अर्थात् मनोरथ, त्याचा **मारक**- ना- -शक - नाश करणारा - अर्थात् यथेच्छ तृप्ति करून म- -नोरथ राहूं न देणारा, असा **क्षीरधी**[3] - क्षीरसागर, **द्या**- दिला;

---

१ पहा केका २३ वी, टीप १, पृ० १११.

२ मदनोमन्मथोमारःप्रद्युम्नोमीनकेतनः। कंदर्पोदर्पकोऽनंगः कामःपंचशरःस्मरः ॥

अमर.

३ उदधि, पयोधि, वारिधि, जलधि, या प्रमाणें क्षीरधि- क्षीरसमुद्र. उदन्वानुदधिःसिंधुःसरस्वान्सागरोऽर्णवः । रत्नाकरोजलनिधिर्यादःपतिरपांपतिः ॥ तस्यप्रभेदाःक्षीरोदोलवणोदस्तथापरे । यांत क्षीरधि यांतील शेवटल्या वर्णास एथें प्रासानुरोधानें दीर्घत्व झालें आहे.

हें ग्रंथभाषेंत भूतकालाचें रूप जाणावें.

दिला; ह्मणून कवि ह्मणतात मीं असें ह्मणतों कीं ' **जें सुपात्रा सदा सुखवि तें उदारपण बरें,** - जें -अर्थात् जें उदारपण, सुपात्रा - सुपात्रातें - वरदानग्रहणार्थ जो योग्य त्यातें, सुखवि - सुखवितें - अर्थात् सुखी करितें, सुखप्रद होतें,[1] अथवा, जें उदारपण, सुपात्रा - सुपात्रा कारणें, सुख - हर्ष - अर्थात् कामनातृप्तिजन्य जो अल्हाद त्यातें, ( ही कर्मणि प्रथमा ) वि तें[2] - उत्पन्न करितें, तें उदारपण, - तें - तसें पूर्वोक्त प्रकारचें, उदारपण -दातेपण, बरें - कल्याणकारक, असें जाणावें[3]; असें जर

नहोईल

---

१ एथे पंतानें आपलें किंचित् काव्यानर्गलत्व दाखवून स्वेच्छाचारानें 'सुखविणें' ह्म० सुख देणें, असा मराठींत स्वतंत्र धातु करून त्याचें हें वर्तमानकाळाचें रूप योजलें आहे असें दिसतें. दुखविणें, हर्षविणें, असे जर-दुःख. हर्ष, या मूळ शब्दां वरून धातु होतात, तर सुख शब्दा वरून आपल्या मनोहर मयूर कवीनें तसा नवा धातु योजून या प्रकारेंक महाराष्ट्र वाणीस नीटनेटकी केली येणें करून हें त्यांचें कृत्य निंदार्ह नहोतां उलटें स्तुत्यार्ह होतें असें मला वाटतें. या माझ्या विचारास कोणी अनुमोदन न देईल तर एथें पुढें दुसरी जी वैकल्पिक अर्थयोजना केली आहे, तीस तरि ते आपलें मूल्यवान अनुमोदन देतील असा आपला भरवसा दर्शवायास मीं एथें धैर्यावलंब करितों.

२ या प्रमाणें 'वि' धातूचा अर्थप्रयोग आपल्या कवीनें व इतर कवींनींहि केला आहे.- पहा- केका ४, टीप१, पृ०३५. आणखी मुकुंदराज ह्मणतात

सूर्यतमातें ज्याला तेणेंचितोआवरला
तैसाप्रपंचघडला आत्मयासीजी

वि० सि० प्र० ७, ओ० १९.

सुपात्रीं उपकार केला असतां तो लौकरच फलप्रद होतो ह्मणून पुढल्या श्लोकांत कालीदासानें फार सरसरीनें वर्णिलें आहे;-

अध्व.

नहोईल तर अर्थांतरन्यासेंकरून कवि पक्षांतराचें स-मर्थन करितात ' **पन्नगा अमृत दिलें तशि खळीं कृपा त्रासदा**, - **पन्नगा** - सर्पाला, अमृत, **दिलें** - पाजिलें, **तशी** - त्या सारिखी, **खळीं**, - खळ - दुष्ट - स्वभावतः अपकारक, त्याच्या ठायीं, **कृपा** - दया, **त्रासदा**-त्रासदेणारी - नाशकारक, जाणावी. सर्पाला दूध पाजणें, आणि दुष्टा वर दया करणें, हे दोन्ही व्यापार सारिखेच नाशकारक होत; सारांश जसें महादेवानें वृकासुरास वरदान देऊन त्याचा लोभ वाढविला, तसें नकरितां, तुह्मीं पूर्वीं आ-पल्या दयापूर्वक औदार्यानें अश्वत्थाम्यास क्षीरसमुद्र दे-ऊन त्याची जशी तृष्णा नाहींशी केली, तशी मज वर दया करून माझीहि तृष्णा नाहींशी करा,' असा वर मला द्या, असा एथें कविरुद्गतार्थ जाणावा.

---

अध्वक्लांतंप्रतिमुखगतंसानुमांश्चित्रकूट-
स्तुंगेनत्वांजलदशिरसावक्ष्यतिश्लाघमानः।
आसारेणत्वमपिशमयेस्तस्यनैदाघमाग्नि
सद्भावार्द्रःफलतिनचिरेणोपकारोमहत्सु ॥ १७ ॥

मेघदूत.

**अतिप्रियसुखप्रदप्रथमतूंमुदंभोदया ॥**
**मयूरत्हदयातुझीक्षणविटोनशंभोदया ॥**
**उदारपणवानिलेंअजिगुरूपहासाबळें ॥**
**कसेंकरिललेंकरूंनिपटहेंपहासाबळें ॥ ७० ॥**

मागील श्लोकांत शिवाच्या दृष्टांतेंकरून प्रभूचें औदार्य वर्णिलें खरें, परंतु तसें केल्यानें शिवविष्णुविषयक भेददृष्टीचें अनुमान होतें; ह्मणून तें वर्णन सरस नव्हे, असा आपला भावार्थ दर्शवित होत्साते "शिवविष्णु एक" जाणून एथें कवि शिवाची प्रार्थना करितात.

**पदान्वय,—** तूं प्रथम अतिप्रिय, सुखप्रद, मुदंभोद, शंभो तुझी दया या मयूरत्हदया क्षण न विटो, अजि गुरूप-हासा बळें उदारपण वानिलें, निपट साबळें लेंकरूं कसें करिल हें पहा.

**तूं प्रथम अतिप्रिय, सुखप्रद, मुदंभोद, — तूं-** (कवि प्रभूस ह्मणतात ) तूं **प्रथम**- पहिला- मूळीं- आरंभीं, ( हें एथें क्रियाविशेषण होय ), **अतिप्रिय**-अत्यंत प्रियकर-अत्यंत प्रेमास्पद- भक्तांस अत्यंत प्रेमेंकरून भजनीय, **सुख-प्रद**- सुखदेणारा- स्वभक्तांस स्वर्गसुखादारभ्य आकैवल्य सर्व सुखकोटीतें यथेच्छ देणारा, आणि **मुदंभोद,- मुत्**-आनंद, याचा[1] **अंभोद**- मेघ -अर्थात् आनंदघन, असा आहेस; [ एथे 'आहेस' या क्रियापदाचा अध्याहार जा-णावा

[1] अंभस् ह्मणजे उदक, त्यातें देणारा, अर्थात् मेघ; जलद, वारिद, पयोद, नीरद, या शब्दां प्रमाणें.

णावा ] **ह्मणून शंभो तुझी दया या मयुरत्हृदया क्षण न विटो,**— शंभो- हे शंभो[1]- हे महादेवा, ( एथें कवीनें शिवत्वेंकरून प्रभु विष्णूची भावना करून हें संबोधन दिलें आहे ), **तुझी दया**- तुझें भक्तवात्सल्य, **या मयूरत्हृदया,**- **या**- हें जें त्या, **मयूरत्हृदया,- मयूर**- मोर, त्याचें जें हृदय- अंतःकरण, त्या कारणें, पक्षांतरीं हें जें मयूर कवीचें अंतःक-रण, त्या कारणें, **क्षण**- क्षणभर हि, **न विटो** - नकांटाळो; अथवा, अति प्रकट-उज्वलित जी तुमची दया ती, **न विटो**- मदपराधेंकरून मंदप्रभा नहोऊ; अथवा, सुफलदायक जी तुमची दया ती, मदापराधेंकरून अल्पफलप्रद नहोऊ; असा अर्थ. अथवा, एथें प्रथम चरणांत 'अतिप्रिय' आणि 'सुखप्रद' हीं पृथक् विशेषणें नकरितां 'मुदंभोद' याचीं विशेषणें करावीं; ह्मणजे **अतिप्रिय**- मनोहर,**सुखप्रद**- अ-ल्हादकारक, असा **मुदंभोद**- आनंदघन, तूं आहेस ह्मणून त्या तुज आनंदघनाची दया मयूरत्हृदया विषयीं नविटो. मेघाची कृपा मयूरा विषयीं न्यून होणें असंभाव्य ह्मणून एथें हा असंभव अलंकार जाणावा. **अजि गुरूपहासा बळें उदारपण वानिलें,— अजि**- अहो[2] **गुरूपहासा,**- **गुरु**- मोठा, जो उपहास- थट्टा- विनोद, त्या सार्खी, अथवा, **गुरु** - गुरुजन- महाजन, त्यांणीं केला जो उपहास त्या

---

१ शंभुशब्दाचें संस्कृत नियमा प्रमाणें संबोधन. पहा माझें महाराष्ट्र-व्याकरण आवृ०३, नि० २७९ वा. पृ०११५.

२ अजि हें एथें विस्मयार्थी अव्यय जाणावें. अथवा पादपूरणार्थ अव्यय मानिलें तथापि विशेष दोष येणार नाहीं.

त्या साठीं, **बळें- बळेंकरून - उगीच-** कारण नसतां, **उदा-**
-रपण- औदार्य - अर्थात् तुझ्या शिवाचें औदार्य, **वानिलें**
-वर्णिलें; सारांश ( कवि ह्मणतात ) म्यां जें वरल्या केकांत
शिवाचें औदार्य दृष्टांतरीतीनें काकदृष्टिन्यायेंकरून वर्णिलें
तें मोठें उपहासास्पद होय; अथवा तें पाहून कित्येक थोर
चिकित्सक जन माझा उपहास करितील खरा, कारण त्या
वर्णना वरून शिवाचें गौरव नहोतां उलटी त्याची वरदाना
विषयीं चातुर्यन्यूनतात्मक विगर्हता इंगित होत्ये; परंतु
**निपट साबळें लेंकरूं कसें करिल हें पहा,—** निपट-
केवळ, **साबळें-** बावळें-भोळें- अर्थात् अज्ञ, असें लेंकरूं,
**कसें करिल-** मूर्ख लेंकरानें आणखी कसें वर्णावें, **हें पहा-**
याचा आपणच विचार करा; सारांश कवि ह्मणतात मीं
अज्ञ बालक असल्या मुळें शिवाचें वास्तव वर्णन कसें करा-
वें याचें मला योग्य ज्ञान नाहीं.

**तुह्मांहरिहरांतज्यादिसतसेदिसोवास्तव ॥**
**प्रबुद्धह्मणतीनसेतिळहिभेदमीयास्तव ॥**
**ह्मणेमुनियथार्थजेंस्वमतवाणितीशैववतें ॥**
**नवैष्णवदुराग्रहीपरममुख्यहींदैवतें ॥ ७१ ॥**

शिव आणि विष्णु यां मध्यें वास्तव भेद नाहीं असा आपला भावार्थ कथित होण्यासाठी कवि या व पुढल्या केकेंत ह्मणतात.

**पदान्वय**— तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे दिसो, प्रबुद्ध ह्मणती वास्तव तिळहि भेद नसे, यास्तव जें स्वमत शैव वाणितो तें यथार्थ, न दुराग्रही वैष्णव, मी मनि ह्मणें, हीं दैवतें परम मुख्य.

**तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे दिसो,**— तुह्मां हरिहरांत,- तुह्मी जे वास्तव अभिन्न, हरि- विष्णु आणि हर- शिव, यां मध्यें, **ज्या दिसतसे दिसो** - ज्या कोणास दिसत असेल तर त्यास दिसो, अर्थात् संदर्भे करून भेद; परंतु **प्रबुद्ध ह्मणती वास्तव तिळहि भेद नसे,**— प्रबुद्ध- ज्ञानी- तत्ववेत्ते, ह्मणती- ह्मणतात-, उपनिषद्भागवतादि अभेदवर्णनपर ग्रंथांत सांगतांना असें सांगतात, कीं वास्तव वस्तुतः- तत्वदृष्ट्या, तिळहि भेद नसे -तिळभरहि भेद नाहीं; अर्थात् तत्वदृष्ट्या तुह्मां हरिहरां मध्यें किमपि भेद नाहीं;[1] **यास्तव जें स्वमत शैव वाणितो तें यथार्थ,**—

ह्मणून

---

[1] याच प्रमाणें तुकेश्वरानें सभापर्वांत ह्मटलें आहे;-
**शैवह्मणतीशंकरस्थाणु ॥ तोचीवैष्णवींबोलिजेविष्णु ॥**
**शाक्तीगणेशअथवाभानु ॥ नामेंयाचींजाणपां ॥ २४ ॥**
अ० १०.

ह्मणून, **जें-** असें जें अभेदात्मक, **स्वमत-** आपलें मत, **शैव -** शिवोपासक - तांत्रिकमतरहस्यवेत्ते, **वर्णिती -** वर्णितात- प्रतिपादितात, **तें-** तेंच मत, **यथार्थ-** सत्य; **न दुराग्रही वैष्णव,—** दुराग्रही- हट्टवादी, **वैष्णव-** विष्णूपासक; अर्थात् तत्वार्थ नजाणतां केवळ स्वमताभिमानी वैष्णव जें शिवनिंदापर आपलें मत प्रतिपादितात तें, **न-** यथार्थ नाहीं; असें[१] **मी मनि ह्मणें,-** मी आपल्या मनांत ह्मणतों- अर्थात् मी असें समजतों; पुनः कवि उक्तार्थाचें मंथन करून सारांशरूपानें सांगतात[२] **हीं देवतें परम मुख्य,—हीं** - विष्णुशिवात्मक, **दैवतें, परम मुख्य** -केवळ आद्य होत. अथवा, एथें 'दुराग्रही' या पादाचा अन्वय 'शैव' आणि 'वैष्णव' या उभय शब्दांशीं करून 'दुराग्रही शैव आणि वैष्णव जें स्वमत वर्णितात तें यथार्थ न,'- दुराग्रहानें शैव आणि वैष्णव परस्परनिंदात्मक जें स्वमत वर्णितात तें

त

---

१ श्रीमद्भगवच्छंकराचार्यांनींहि असेंच केवळ परब्रह्मपर शिवाचें स्तवन केलें आहे;-

अजंशाश्वतंकारणंकारणानां शिवंकेवलंभासकंभासकानां ।
तुरीयंतमःपारमाद्यंतहीनं प्रपद्येपरंपावनंद्वैतहीनं ॥ ७ ॥
नमस्तेनमस्तेविभोविश्वमूर्ते नमस्तेनमस्तेचिदानंदमूर्ते ।
नमस्तेनमस्तेतपोयोगगम्य नमस्तेनमस्तेश्रुतिज्ञानगम्य ॥ ८ ॥
त्वत्तोजगद्भवतिदेवभवस्मरारे त्वय्येवतिष्ठतिजगन्मृडविश्वनाथ ।
त्वय्येवगच्छतिलयंजगदेतदीश लिंगात्मकेहरचराचरविश्वरूपिन्
॥ ११ ॥ वेदसारशिवस्तव.

२ मुक्तेश्वरांनींहि या अलिकडल्या दुराग्रही वैष्णवांचें व शैवांचें थोडक्यांत दृष्टांतरूपानें सरस वर्णन करून दाखविलें आहे;-

वैद्य.

तें यथार्थ नाहीं, 'हीं दैवतें परम मुख्य'- हीं शिवविष्णुरूप उभय दैवतें केवळ आद्य होत, असें 'मीं मानिं ह्मणें'-( कवि ह्मणतात )मीं आपल्या मनांत समजतों, असा अर्थान्वय करावा. यद्यपि वाक्यरचने वरून पूर्वान्वय प्रशस्त दिसतो, तथापि तेणें-करून कदाचित् कवि कडेस शैवमतप्रवणता दिसेल तर ती या मागील अर्थान्वयानें दूर होत्ये, ह्मणून कवीचा मुख्य अर्थ असाच असावा असें मला वाटतें.

---

चैद्यकौरवएकपंक्तीं ॥ ह्रस्तमेळवुनियांहिस्तीं ॥
क्षुद्रबुद्धीअवलोकितीं ॥ कृष्णद्वेषीदुरात्मे ॥ ७४ ॥
काशीविश्वेश्वराचेंलिंग ॥ सुवर्णकमळींपूजिलेंसांग ॥
जेंदेखतांपावतीभंग ॥ महापर्वतपापांचे ॥ ७५ ॥
तेंनूतनपाखांडीवैष्णवां ॥ देखतांचिसंतापउपजेजिवा ॥
जेवींकांपूर्वजांचाठेवा ॥ हिरोनिनेलातस्करीं ॥ ७६ ॥
नातरीबिंदुमाधवप्रतिमा ॥ शृंगारिलीदेखोनिअधमा ॥
केशकपाळींजंगमा ॥ शिरच्छेदनासारिखे ॥ ७७ ॥

सभा० प०, अ० १.

**ह्मणोंक्षणपुरांतकक्षणमुरांतकब्राह्मणा ॥**
**मलाजरिंह्मणालबातारिविशंकलुब्राह्मणा ॥**
**तुह्मांशिवशिवातुह्मींभजतसांशुकव्यासहा ॥**
**सदर्थवदलेपुरातनकथाननव्यासहा ॥ ७२ ॥**

मागील ककेचा भावार्थ पुढें चालू.

**पदान्वय—** क्षण पुरांतक क्षण मुरांतक ह्मणें, बा मला ब्राह्मणा जरि ह्मणाल तरि विशंक लुब्रा ह्मणा, तुह्मां शिव शिवा तुह्मीं भजतसां, हा सदर्थ शुक व्यास वदले, पुरा-तन कथा न नव्या, सहा.

**क्षण पुरांतक क्षण मुरांतक ह्मणें,— मीं ✓ क्षण -** क्षणभर - एक वेळ, पुरांतक,-पुर-त्रिपुरासुर, त्याचा ✓ अं-तक - नाशक - अर्थात् पुरारि - त्रिपुरारि - शिव, **क्षण**-एक वेळ, **मुरांतक**, - मुर -मुरनामा दैत्य त्याचा ✓ अंतक-नाशक - अर्थात् मुरारि - विष्णु, **ह्मणें** - ह्मणतों; सारांश कवि भगवंतास ह्मणतात कि मीं एक वेळ शिव ह्मणून आणि एक वेळ विष्णु ह्मणून हाका मारितों; ह्मणून✓ **बा मला ब्राह्मणा जरिं ह्मणाल तरि विशंक लुब्रा ह्मणा,-बा**-हे बापा, हुजगत्तात प्रभो, **मला ब्राह्मणा जरिं ह्मणाल**-मला ब्राह्मणाला जरीं तुह्मीं ह्मटलें, **तरिं विशंक लुब्रा ह्मणा**-**तरिं**- तथापि, **विशंक**- शंकारहित होत्साते- निःसंशय, **लुब्रा** - वाचाळ - मध्येंच ढवळाढवळ करणारा, **ह्मणा**, ह्मणत असल्यास ह्मणा; कारण✓ **तुह्मां शिव शिवा तुह्मीं भजतसां,—** तुह्माला शिव आणि शिवाला तुह्मीं

भजत

भजत अहां- ह्मणजे तुमच्या रूपेंकरून शिव आणि शिवा च्या रूपेंकरून तुह्मींच अहां, अर्थात् तुह्मीं आणि शिव एकच अहां; **हा सद्दर्थ शुक व्यासं वदले,- हा-** असा, **सदर्थ-** वास्तवार्थ, शुक आणि व्यास, वदले - पुराणांत सांगून गेले; **ह्मणून पुरातन कथा न नव्या,—** या प्रकारच्या पुरातन कथा प्रसिद्ध आहेत, कांहीं नव्या नाहींत; यास्तव सह्मा,- सहन करा-या तुमच्या कथा तुह्मीं आपल्या पाहून घ्या; अथवा, मी जें एकदां तुह्मांस पुरांतक ह्मणून स्तवितों, आणि एकदां मुरांतक ह्मणून स्तवितों, हें माझें लुब्रेपण आतां सहन करा; असा एथील कविच्छन्नार्थ दिसतो.

---

**तुझाचिअवतारतोसुतपराशराचावळे ॥**
**तदुक्तिसजनप्रभोजरिनिजेमधेंचावळे ॥**
**तरित्रिभुवनेश्वरातवविशुद्धनामावली ॥**
**मुखींप्रकटहोयजीकरिसुखीजनामावली ॥७३ ॥**

मागल्या केकेंत व्यासवचनाचें प्रामाण्य सांगितलें, ह्मणोन त्या व्यासाची प्रशंसा कथित होत्साते कवि भगवन्नाममाहात्म्य या व पुढील दोन केकांत वर्णितात.

**पदान्वय—** पराशराचा सुत तो तुझाचि अवतार, प्रभो तदुक्तिस जन वळे; त्रिभुवनेश्वरा जरि निजे मधें चावळे तरि तव विशुद्ध नामावली मुखीं प्रकट होय; जी मावली जना सुखी करि.

**पराशराचा सुत तो तुझाचि अवतार,** -पराशराचा सुत- व्यास, तो तुझाचि **अवतार**-तो व्यास तुझाच अवतार होय[१]; ह्मणूनच **प्रभो तदुक्तिस जन वळे,— प्रभो**- हे समर्था, **तदुक्तिस**- त्याच्या **उक्तीस**- वाणीस, जन-सर्व- -लोक, **वळे**- वळतात- अनुसरितात; **त्रिभुवनेश्वरा जरि निजे मधें चावळे तरि तव विशुद्ध नामावली मुखीं प्रकट होय,—** त्रिभुवनेश्वरा - हे त्रैलोक्यपते - हे जगत्त्रयनायका, **जरि निजे मधें चावळे,**- जरीं तो व्यास निद्रेंत, **चावळे**- बरळला, **तरीं तव विशुद्ध नामावली मुखीं** प्रकट

---

१ व्यास हा विष्णूचा अवतार ह्मणून पुराणांत सांगितलें आहे;-

**व्यासायविष्णुरूपायव्यासरूपायविष्णवे ।**
**नमोवैब्रह्मनिधयेवासिष्ठायनमोनमः ॥**

प्रकट **होय,**- तरीं, **तव**- तुझी, **विशुद्ध**- अत्यंत पवित्र, **नामावली**- नामश्रेणि, त्या व्यासाच्या' **मुखीं**- मुखांत, **प्रकट होय**-प्रकट होत्ये; ती तुमची पवित्र नामावली कशी ह्मणाल तर'**जी मावली जना सुखी करि**-जी, **मावली**- माता- आई, **जना**- सर्वलोकांस-जे लोक तुझीं पवित्र नामें घेऊन तुझें एकनिष्ठेनें. भजन करितात त्या सर्वांस, **सुखी करि**- सुखी करित्ये - संसारतापत्रयापासून सोडवून तुझें अक्षय पद देत्ये. एथें निर्जेत चावळणें, आणि त्यांत भग-वन्नामश्रेणीच्या सार्थकतेचा प्रादुर्भाव होणें, या उभय-क्रियांचा विरोध असतां त्याचें विधान आहे, ह्मणून हा विरोधाभास अलंकार होय.

**तुझेंकुशलनामजोनरहळूहळूआकळी ॥**
**दुरत्ययअसामहाखळहिह्याकळी ॥**
**हरीव्यसनपापहेंबहुकशासकायाधवा ॥**
**परीत्वरितभेटवीतुजहियोगमायाधवा ॥ ७४ ॥**

मागील केके वरून नाममाहात्म्य चालू.

**पदान्वय—** जो नर तुझें कुशल नाम हळूहळू आकळी, दुरत्यय असा महा खळ हि हा कळी त्यासि भी, हें व्यसन पाप हरी, बहु कशास, कायाधवा परी योगमायाधवा तुज हि त्वरित भेटवी.

**जो नर तुझें कुशल नाम हळूहळू आकळी.-** जो, **नर**- मानव, तुझें, कुशल- पुण्यकारक- कल्याणकारक, नाम, हळूहळू- चित्ताची एकाग्रता करून अभ्यासानें शनैःशनैः, **आकळी**-आकलन करितो, अर्थात् घेतो; अथवा पाठांतरीं- **तुझें कुशल नाम वा हळूहळू मना आकळी,— वा**-हे बापा, तुझें कल्याणकारक नाम, हळूहळू या मनाला, **आकळी**- आकलन करितें; अर्थात् जो कोणी तुझें नाम घेतो त्याच्या मनाचें आकलन तें तुझें नाम हळूहळू करितें; ह्मणजे त्या मनाची एकाग्रता करून तुझ्या ठायीं त्यास निमग्न करितें; आणखी तें नाम कसें पुसाल तर, **दुरत्यय— असा महा खळ हि हा कळी त्यासि भी,—** दुरत्यय- ज्याचा पार उतरायास कठीण-दुर्गम-दुःसाध्य, अथवा, ज्याचा नाश होणें कठीण- अर्थात् प्रबळ असा, **महा खळहि**- मोठा दुष्ट असतांहि, हा **कळी**- कलियुगांत जनांस पापप्रव-

-ण

-ण करणारी देवता, **त्यासि**- त्या तुझें पवित्र नाम घेणारास, **भी**-भितो; या भगवंताच्या नामा पुढें माझें काहीं चालावयाचें नाहीं ह्मणून तें नाम घेणाराची तो कळी भीति वागवितो; भय वागवायाचें कारण **हें व्यसन पाप हरी,— हें**— तुझें नाम, **व्यसन**- दुःख- अर्थसंदर्भानें कलिकृत दुःख, आणि **पाप**- पातक- अर्थसंदर्भानें त्या कलीनेंच करविलेलें पातक- कलिमल, **हरी**- हरण करितें- अर्थात् दूर करितें; **बहु कशास,**— फार काय सांगावें; **कायाधवा परी योगमायाधवा तुंज हि त्वरित भेटवी,—काया-** धवा,- कायाधव- कयाधूचा[1] पुत्र- अर्थात् प्रऱ्हाद, त्या, **परी**- सारिखा, **योगमायाधवा,**- **योगमायाधव,**- **योगमा-** या,- जी मूलप्रकृति, तिचा धव- स्वामी- अर्थात् परम पुरुष, अशा, तुज- तुला, हि, त्वरित-शीघ्रतेनें- उशीर नला- वितां, **भेटवी**- भेटवितें; सारांश तुझ्या नामानें पूर्वी प्रऱ्हादास जसें तुला भेटविलें, तसें तें तुझ्या नामघेणाराचें दुःख व पाप दूर करून आणखी त्यास तुझी प्राप्ति करून देतें; असें तुझ्या नामाचें माहात्म्य आहे असा अर्थ.

---

१ प्रऱ्हादाच्या आईचें नांव.

**तुह्मांसमचिहेंगुणेंअणुउणेंनसेनामहा ॥**
**दिसेअधिकहीतसागुणतुलाअसेनामहा ॥**
**सदैवभलत्यासहीसुलभआणखीगायका ॥**
**छळीनअधोगतिक्षणाहिदेजगन्नायका ॥ ७५ ॥**

मागील केकेहून नाममाहात्म्य चालू.

**पदान्वय—** हें नाम गुणें तुह्मां समचि, अणु उणें नसे, हा महा गुण अधिक ही दिसे, तसा तुला असेना, सदैव भल-त्यास ही सुलभ, आणखी जगन्नायका गायका न छळी, क्षण हि अधोगति न दे.

**हें नाम गुणें तुह्मां समचि,—** हें, तुझें कल्याणकार-क' नाम, गुणें-गुणांनें, अर्थात् स्वभक्तोद्धारकत्वरूप जो गुण त्याणें, तुह्मां समचि- तुमच्या बरोबरच होय; **अणु उणें नसे,— अणु-** अणुमात्र, उणें नसे- उणें नाहीं,- अर्थात् स्वभक्ताचा उद्धार करण्या विषयीं तिलमात्रहि तुमच्या पेक्षां असमर्थ नाहीं; किंबहुना' **हा महा गुण अधिक ही दिसे,— हा महा गुण-** हा आपल्या गायकाचा उ-द्धार करण्याविषयींचा मोठा गुण, **अधिक ही दिसे,-** अ-धिक समर्थहि दिसतो; **तसा तुला असेना,—** तसा गुण तुला नाहीं; अर्थात् गायकाचा उद्धार करण्या विषयीं तु-झ्या पवित्र नामाचें सामर्थ्य जसें आहे तसें तुझें नाहीं; कारण' **सदैव भलत्यास ही सुलभ,—** तुझें नाम' सदैव- निरंतर, आणि' **भलत्यास ही—** कोण्हासहि-

अधिकारभेद नराखितां कोणत्याहि जातीस अथवा व्यक्ती स, सुलभ- सुखेंकरून प्राप्त;[1] अर्थात् तूं तसा सदैव आणि भलत्यास सुलभ नाहींस; **आणखी जगन्नायका गायका न छळी,**—आणखी, **जगन्नायका**-हे जगन्नायका- हे जगदीशा, **गायका न छळी,**-**गायका**-जो तें तुझें नाम गातो त्यास, **न छळी**- छळित नाहीं; अर्थात् तूं आपल्या भक्तांचा विश्वास पहाण्या करितां त्यांस छळतोस, तसें हें तुझें नाम छळित नाहीं; आणि **क्षण हि अधोगति न दे,**— **क्षण हि** -क्षणभर हि, तें तुझें नाम गायकास **अधोगति**- अर्थात् अ-सद्गति, देत नाहीं; ह्मणजे क्षणभरहि तें त्यास अधोगतीस जाऊं देत नाहीं; अर्थात् आपल्या भक्तांची परीक्षा पहाण्या क-रितां, अथवा त्यांचा गर्व उतरावया करितां, जसें त्वां कांहीं कालमर्याद बलीस खालीं पाडिलें, तसें तूं त्यांस खालीं पाडितोस, तद्वत् तें तुझें कल्याणकारक नाम गायकास खालीं पाडित नाहीं, उद्धारच करितें; ह्मणून तुझ्या पेक्षां तुझ्या नामाचा गुण अधिक असा अर्थ. एथें हा व्यतिरेक अलं-कार जाणावा.

---

1 कोणी प्राकृत कवीनें ह्मटलें आहे;—

भलतियाजीवाला नामचितारितें ॥ धृ ॥

**छळींनृपबळीबळीतांरचतोनसेआटला ॥**
**गमेबहुभलामलानसकळांसहीवाटला ॥**
**परीक्षककरीतसेंजडाहिसोसितेंहेमही ॥**
**नकेवळविरोचनात्मजतरेपदेंहेमही ॥ ७६ ॥**

मागील केकेंत परीक्षणार्थ तुह्मीं आपल्या भक्तांस अधो-गतिहि देतां असें कवींनीं शेवटीं विधान केलें तें एथें उदाहरणानें स्पष्ट करित होत्साते ते ह्मणतात.

**पदान्वय**— बळीनृप बळी तरिच तो छळीं आटला नसे, मला बहु भला गमे, न सकळांस ही वाटला, जड हि हेम ही परीक्षक करी तसें सोसितें; पदें केवळ विरोचनात्मज न तरे, हे मही.

**बळीनृप बळी तांरच तो छळीं आटला नसे,**— **बळीनृप**- विरोचनाचा पुत्र जो दानशूर बळीराजा, **बळी**- बलवान- महा समर्थ, **तांरच तो छळीं आटला नसे**,- **तांरच**- तरच- बळी होता ह्मणूनच, तो, **छळीं**- त्याचा तुह्मीं वामन अवतारीं इतका छळ केला असतांहि तो त्या छळांत, **आटला नसे**- आटला नाहीं- न्यून झाला नाहीं- अर्थात् कसास बराबर उतरला. एथें आटणें या धातूच्या प्रयोगानें कवींनीं छलनतापाचें अत्यंत प्राखर्य सुचविलें. अर्थात् बळी शिवाय इतर कोणी जर त्या वामनाच्या छळाच्या आंचेंत असता तर तो आटूनच गेला असता, असा एथील भावार्थ जाणावा. **मला बहु भला गमे,**— [ कवि ह्मणतात ] मला, तो बळी बहु

भला-

भला- मोठा सामर्थ्यवान्, असा‸ गमे- दिसतो; **न सकळांस ही वाटला,**— सर्वांसहि वाटला, न- नाहीं काय ? अर्थात् जसा मला सामर्थ्यवान् दिसला, तसा सर्वांसहि तो सामर्थ्यवान् दिसला; अथवा, **मला बहु भला गमे,**— मला मोठा सामर्थ्यवान् दिसला ?- ह्मणजे मलाच मोठा सामर्थ्यवान् दिसला काय ? असा काक्वर्थ करून, **न**— नाहीं- अर्थात् मलाच दिसला असें नाहीं, तर‸ **सकळांस ही वाटला,**— इतर सर्वांसहि तसाच वाटला, असा पदान्वय करावा. कदाचित् तुह्मीं ह्मणाल कि माझ्या कसास बळी उतरला यांत काहीं महदाश्चर्य नाहीं, कारण‸ **जड हि हेम ही परीक्षक करी तसें सोसितें,**— **जड हि**- जड असतांहि, **हेम ही-हेम**- सोनें, ही, अथवा, **जड**- लोहकाष्ठादि जे जड पदार्थ तेहि, आणि **हेम ही**- मूल्यवान सुवर्णहि, **परीक्षक करी तसें सोसितें,**- **परीक्षक**- लोहार, सोनार, आदिकरून जे लोह काष्ठ अथवा सुवर्ण यांची परीक्षा पहाणारे त्यांतून कोणी कारागीर तो, जसें‸ **करी**-करितो-अर्थात् तापविण्याची लवविण्याची अथवा सांधण्याची जसजशी त्या त्या पदार्थावर क्रिया करितो, तसें- त्या त्या क्रियानुरूप, **सोसितें**- तें सुवर्णादि जड सहन करितें- तो तो पदार्थ तसतसा विकृत होतो; परंतु या बळीच्या परीक्षणांत महदाश्चर्य ह्मणून हेंच आहे कि यांत‸ **पदें केवळ विरोचनात्मज न तरे,**— **पदें**- पायानें- अर्थात् वामनावतारीं बळीपासून त्रिपाद भूमिदानाच्या ग्रहणांत भगवंताच्या पदन्यासानें, **केवळ**- नुसता,

**छळींनृपबळीबळीतरिचतोनसेआटला ॥**
**गमेबहुभलामलानसकळांसहीवाटला ॥**
**परीक्षककरीतसेंजडाहिसोसितेंहेमही ॥**
**नकेवळविरोचनात्मजतरेपदेंहेमही ॥ ७६ ॥**

मागील केकेंत परीक्षणार्थ तुह्मीं आपल्या भक्तांस अधो-गतिहि देतां असें कवींनीं शेवटीं विधान केलें तें एथें उदाहरणानें स्पष्ट करित होत्साते ते ह्मणतात.

**पदान्वय**— बळीनृप बळी तरिच तो छळीं आटला नसे, मला बहु भला गमे, न सकळांस ही वाटला, जड हि हेम ही परीक्षक करी तसें सोसितें; पदें केवळ विरोचनात्मज न तरे, हे मही.

**बळीनृप बळी तरिच तो छळीं आटला नसे,**— **बळीनृप**- विरोचनाचा पुत्र जो दानशूर बळीराजा, **बळी**- बलवान- महा समर्थ, तरिच **तो छळीं आटला नसे**,- **तरिच**- तरच- बळी होता ह्मणूनच, तो, **छळीं**- त्याचा तुह्मीं वामन अवतारीं इतका छळ केला असतांहि तो त्या छळांत, **आटला नसे**- आटला नाहीं- न्यून झाला नाहीं- अर्थात् कसास बराबर उतरला. एथें आटणें या धातूच्या प्रयोगानें कवीनीं छलनतापाचें अत्यंत प्राखर्य सुचविलें. अर्थात् बळी शिवाय इतर कोणी जर त्या वामनाच्या छळाच्या आंचेंत असता तर तो आटूनच गेला असता, असा एथील भावार्थ जाणावा. **मला बहु भला गमे,**— [ कवि ह्मणतात ] मला, तो बळी बहु

भला-

भला- मोठा सामर्थ्यवान्, असा' गमे- दिसतो; **न सकळांस ही वाटला,**— सर्वांसहि वाटला, न- नाहीं काय ? अर्थात् जसा मला सामर्थ्यवान् दिसला, तसा सर्वांसहि तो सामर्थ्यवान् दिसला; अथवा, **मला बहु भला गमे,**— मला मोठा सामर्थ्यवान् दिसला ?- ह्मणजे मलाच मोठा सामर्थ्यवान् दिसला काय ? असा काक्वर्थ करून, **न**— नाहीं- अर्थात् मलाच दिसला असें नाहीं, तर' **सकळांस ही वाटला,**— इतर सर्वांसहि तसाच वाटला, असा पदान्वय करावा. कदाचित् तुह्मीं ह्मणाल कि माझ्या कसास बळी उतरला यांत काहीं महदाश्चर्य नाहीं, कारण' **जड हि हेम ही परीक्षक करी तसें सोसितें,**— जड हि- जड असतांहि, हेम ही-हेम- सोनें, ही, अथवा, जड- लोहकाष्ठादि जे जड पदार्थ तेहि, आणि **हेम ही**- मूल्यवान सुवर्णहि, **परीक्षक करी तसें सोसितें,**- **परीक्षक**- लोहार, सोनार, आदिकरून जे लोह काष्ठ अथवा सुवर्ण यांची परीक्षा पहाणारे त्यांतून कोणी कारागीर तो, जसें' **करी**-करितो-अर्थात् तापविण्याची लवविण्याची अथवा सांधण्याची जसजशी त्या त्या पदार्थां वर क्रिया करितो, तसें- त्या त्या क्रियानुरूप, **सोसितें**- तें सुवर्णादि जड सहन करितें- तो तो पदार्थ तसतसा विकृत होतो; परंतु या बळीच्या परीक्षणांत महदाश्चर्य ह्मणून हेंच आहे कि यांत' **पदें केवळ विरोचनात्मज न तरे,**— **पदें**- पायानें- अर्थात् वामनावतारीं बळीपासून त्रिपाद भूमिदानाच्या ग्रहणांत भगवंताच्या पदन्यासानें, **केवळ**- नुसता,

विरोचनात्मज

**विरोचनात्मज**- विरोचनाचा पुत्र- **बळी, न तरे**- तरला नाहीं, परंतु **हे मही, हे**- ही, **मही**- पृथ्वी; अर्थात् ही पृथ्वी-हि तरली असा एथें अन्वय. सारांश तुह्मांस भुमिदान केल्यानें दाता बळी तरला इतकेंच नाहीं, परंतु दानरूपजी पृथ्वी तीहि तरली; दात्याचा उद्धार होऊन त्या बराबर दानाचाहि उद्धार झाला हें महदाश्चर्य होय. बळीच्या मस्तकावर वामनाचा पदन्यास होऊन तो बळी पाताळीं बसविला, तेव्हां अर्थात् त्यास अधोगति दिली, असा आपला इंगितार्थ वरील केकेच्या संबंधानें सुचवून, त्या अधोगतींत त्याचा उद्धारहि भगवंतानें केला असा कवीनीं आपला भावार्थ एथें प्रदर्शित केला आहे.

**असानकरिताजरींछळतरींप्रभोतोभली॥**
**सुकीर्तिकशिपावताकविसभाजिणेंशोभली॥**
**पदींउपजतीनदीकशिंकशात्रिलोकीसती॥**
**अशाअतुलमौक्तिकावलिविणेंबरीदीसती॥७७॥**

मागील केकेंत वामनकृत बलीछल सांगितला, यांत तो छल सत्कीर्तिलाभास आणि त्रैलोक्यकल्यणास कारणभूत ह्मणून कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** जरीं असा छळ न करिता तरीं प्रभो क-विसभा जिणें शोभली (अशी) भली सुकीर्ति तो कशि पा-वता, पदीं नदी कशि उपजती, अशा अतुलमौक्तिकावली विणें त्रिलोकीसती कशी बरी दीसती.

**जरीं असा छळ न करिता तरीं प्रभो कविसभा जि-णें शोभली (अशी) भली सुकीर्ति तो कशि पावता,** —जर तो वामन असा त्या बळीचा छळ नकरिता, तरीं प्रभो कविसभा जिणें शोभली (अशी) भली सुकीर्ति **तो कशी पावता,—तरीं**- तर, **प्रभो**- हे महाराज, **कविसभा जि-णें शोभली, कविसभा,- कवि-** ग्रंथकार- पुराणादि इति-हास करणारे- व्यासादि, अथवा, **कवि-** ज्ञानी- व्यास शुकसनकादि, यांची **सभा**- मंडळी- समाज, **जिणें**- ज्या बलीच्या सत्कीर्तीनें, (करणी तृतीया), **शोभली**- शोभा पावली- शोभायमान झाली, अर्थात् त्यांच्या काव्यास जिणें शोभा आणिली, अशी **भली.सुकीर्ति तो कशी पावता,- भली**- सुंदर- निर्मळ- निर्दोष, अशी **सुकीर्ति**- सत्कीर्ति-सद्यश, **तो**- बली, कशी मिळविता? **अर्थात्** कधीं मिळं-विताना.

-विताना. आणखी, जर तो वामन त्या बळीचा असा छळ नकरिता तर **पदीं नदी कशि उपजती,— पदीं**- भगवत्पदन्यासांनीं, **नदी** - भागीरथी, **कशी**, **उपजती**- उत्पन्न होती, अर्थात् नहोती; अथवा, **पदीं** - भगवत्पादाच्या ठायीं, **उपजती** - उत्पन्न होती; असा **पदीं** हें सप्तम्यंत प-द करून अर्थान्वय करावा. आणि **अशा अतुल मौक्ति-कावलि विणें त्रिलोकीसती कशी बरी दिसती,- अशा** - भागीरथीरूप, **अतुल**- अनुपम, **मौक्तिकाव-लि**, - **मौक्तिक** - मोतीं, त्याची **आवलि** - पंक्ति अ-र्थात् मोत्यांचा हार, **त्या विणें**-त्या वांचून, **त्रिलोकीसती**,- **त्रिलोकी**- स्वर्गभूपातालात्मिका, **सती**- साध्वी स्त्री,( कर्म-धारय) **कशी**, **बरी**- सुंदर- अर्थात् कल्याणकारिणी, अशी **दिसती** - दृष्टिगोचर होती; सारांश जर वामन त्या बळीच्या निष्ठेची अशी परीक्षा नकरिता, तर त्या बळीची सत्कीर्ति झाली नसती, आणि त्रैलोक्यास पावन करणारी अशी भा-गीरथीहि उत्पन्न नहोती. तात्पर्य हेंच कीं भगवान समय-विशेषीं आपल्या भक्तांची परीक्षा पहाण्यांत त्यांचा छळ क-रितो त्यांतहि जगाचें कल्याण करण्याचा उद्देश असतो. एथें त्रिलोकीच्या संबंधानें **आवलि** या शब्दप्रयोगानें स्वर्गा-स शोभविणारी मंदाकिनी, पृथ्वीस शोभविणारी भागीरथी, आणि पातालास शोभविणारी भोगावती, अशा भागीरथीचें त्रिविधरूपाचें ग्रहण ध्वनित होतें. यांत त्रिलोकीस स्त्रीत्व कल्पून भागीरथीच्या त्रिविधरूपास मौक्तिकाच्या तिपदरी हाराची कल्पना करून, उपमान उपमेयाचें अभेदरूपानें वर्णन केलें आहे; ह्मणून एथें हा रूपक अलंकार जाणावा.

नकोछळअधीरमींतशिनकीर्तिहोचामरें ॥
नृपाशिउचितेंवृथामिरविलींजरींपामरें ॥
अकीर्तिचअसोरुचेतुजकशीव्रजींकांबळी ॥
असेंनसमजाकसेंवरिलहारिलाकांबळी ॥ ७८ ॥

बळी समर्थ होता म्हणून वामन अवतारीं तुमचा असा दारुण छळ त्याणें सहन केला, आणि तशी सत्कीर्तिहि त्याणें मिळविली; मीं तर केवळ असमर्थ, मीं अशा परीक्ष-णास पात्रहि नाहीं,. आणि अशी तीव्र परीक्षणार्जित की-र्तिहि मला नको, तें काम समर्थानेंच करावें, असा आपला अभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— छळ नको, मीं अधीर, तशि कीर्ति नहो, चामरें नृपाशि उचितें, पामरें जरीं मिरविलीं वृथा, अकीर्तिचं असो, तुज व्रजीं कांबळी कशी रुचे, असें कसें न समजा, बळी हारिला कां वरिल.

**छळ नको,- छळ-** बळीची निष्ठा पहाण्या करितां जो वामनानें त्याची परीक्षा केली तसा छळ, मला नको; **मीं अधीर,** - मीं धैर्यवान् नाहीं - तशा तुमच्या परीक्षेस उतरेन असा मला भरवंसा नाहीं; **तशी कीर्ति नहो,- त-शी** - त्या बली सारिखी , कीर्ति , **नहो** - न होऊ; कदा-चित् तुह्मीं ह्मणाल किं 'जर तुला तसें धैर्य नाहीं तर तुझी तशी कीर्ति होणार नाहीं, त्यास तशी कीर्ति नझाली तर नहोऊ; परंतु तसा 'छळ नको' असा एथें अर्थान्वय समजा-वी;

वा; कारण **चामरें नृपार्शां उचितें,— चामरें**- चवऱ्या, **नृपार्शीं**- राजांसच, **उचितें**-[1] योग्य, होत; **पामरें जरीं मिरविलीं वृथा,— पामरें**- पामरानें- दरिद्र्यानें, **जरीं मिरविलीं**- जरीं तीं चामरें, **मिरविलीं**- आपल्या वर वारून घेवविलीं, तरीं, **वृथा**- व्यर्थ, होत; अर्थात् दरिद्र्यानें जरीं आपल्या वर चवऱ्या वारून घेवविल्या तरीं त्या त्यास भूषणास्पद नहोतां उलट्या उपहासास्पद होतात; सारांश बळीची कीर्ति बळीसच योग्य. **अकीर्तिच असो,**— मला आपली **अकीर्तिच**- कीर्तीचा अभाव- अथवा अपकीर्तिच असो; अर्थात् माझी अपकीर्ति झाली तरी होऊ; **तुज व्रजीं कांबळी कशी रुचे,**—तुला व्रजभूमींत कांबळी कशी आवडली? अर्थात् तुला गोकुळांत गवळ्यां बराबर जशी कांबळी आवडली, तशी मला आपली अकीर्तिच असो; एथें कवीनें कांबळीच्या उपमेनें एक तर मुख्य इष्टार्थ अपकीर्तिची मूल्यहीनता, दुसरें तिचें कृष्णवर्णत्व ध्वनित केलें; ह्मणून एथें ही कांबळीची उपमा मोठी सरस होय. आणखी कवि ह्मणतात कि इतकी अपकीर्तिहि त्यां पत्करिली, या वरून तुह्मीं **असें कसें न समजा,**- असें कसें समजत नाहीं, कीं **बळी हारिला कां वरिल,— बळी**- बळवान् जो

---

१ एथें संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें कवीनीं 'उचित' या विशेषणाचें 'चामरें' या विशेष्याच्या अनुरोधानें अनेकवचन साधलें आहे. असा संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें विशेष्यविशेषणाचें लिंगवचन एकरूपानें साधण्याचा प्राकृत काव्यांत कोठकोठे प्रचार आढळतो.

जो आहे तो, हारिला-अपजयाला-निर्भर्त्सिनेला, कां वरिल-कां स्वीकारील? अर्थात् कदापि स्वीकारणार नाहीं; [1] किंबहु-ना जो बळी नसेल तोच स्वीकारील; सारांश मीं बलहीन आहें ह्मणूनच ही अपकीर्ति स्वीकारितों, आणि अशी पड घेतों; हें तुह्मी 'कसें नसमजा' असा एथें अर्थान्वय जाणावा. यांत कवीनें वामनकृतछलसहिष्णुत्वनिमित्तानें बळीचें सामर्थ्य सुचवून अकीर्तिस्वीकृतीनें आपलें भगवत्परीक्षणानर्हत्व-हि प्रदर्शित केलें. एथें उपमेय कीर्ति आणि उपमान चामर यांचें मूल्यवत्ताधर्मानें आणि शुभ्रत्वधर्मानें सादृश्य, अकीर्ति आणि कांबळी यांचें एतद्विरुद्धधर्मांनीं सादृश्य, वर्णिलें आहे, ह्मणून हा उपमा अलंकार जाणावा.

---

१ बलवान् अथवा मानी पुरुष जे असतात त्यांजवर कितीहि संकट पडलें तथापि आपल्या महत् पदास लघुत्व देणारें असें अनुचित कर्म ते कदापि आचरित नाहींत; अर्थात् असें लघुत्व त्यांस कदापि सहन होत नाहीं. या विषयीं भर्तृहरि ह्मणतात;—

क्षुत्क्षामोपिजराकृशोपिशिथिलप्राणोपिकष्टांदशा-
मापन्नोपिविपन्नदीधितिरपिप्राणेषुनश्यत्स्वपि ।
उन्मत्तेभविभिन्नकुंभकवलग्रासैकबद्धस्पृहः
किंजीर्णंतृणमत्तिमानमहतामग्रेसरःकेसरी ॥

नीतिशतक, श्लो० ३३.

छळालकृपणासिकांअजिदयानिधेकापिती ॥
भटासिभटसंगरींपरिनकातरादापिती ॥
करालतितुकीकृपाबहुअहोशरण्यातमीं ॥
बुडोनिशरणागतश्रमतसेंअरण्यातमीं ॥ ७९ ॥

मागील ककेच्या शेवटीं कवीनें आपलें बलहीनत्व ध्वनित केलें तेंच ते एथें स्पष्ट करितात.

**पदान्वय**— अजि दयानिधे कृपणासि कां छळाल, भट संगरीं भटासि कापिती, परि कातरा न दापिती, अहो शरण्या कराल तितुकी कृपा बहु, मीं शरणागत अरण्यात तमीं बुडोनि श्रमतसें.

**अजि दयानिधे कृपणासि कां छळाल**,— अजि- अहो, **दयानिधे**,- **दयानिधि**- दयेचा निधि- दयेचें भांडार (षष्ठीतत्पुरुष, त्याचे संबोधन), हे दयानिधे- हे दयासागरा, **कृपणासि**- दीनास- अर्थात् मज सारिख्या बलहीनास, **कां छळाल**-तुह्मीं कशा करितां छळाल, अर्थात् कदापि छळणार नाहीं, कारण **भट संगरीं भटासि कापिती**,— भट- योद्धे,[1] संगरीं- लढाईंत, **भटासि कापिती**- योद्ध्यास कापितात; अर्थात् शूर असतात ते लढाईंत शूरासच तलवारीनें मारितात; **परि कातरा न दापिती**,—परंतु, **कातरा**- भित्र्याला, **न दापिती**- दाबित नाहींत; अर्थात् त्यांजवर आपलें शूरत्व दाखवून त्यांस पाडाव करित नाहींत; सारांश

---

१ भटायोधाश्चयोद्धारःसेनारक्षास्तुसैनिकाः
अमर

सारांश, बळीहि समर्थ, आणि त्याच्या निष्ठेची परीक्षा पाहणार तुह्मीहि समर्थ; तेव्हां त्याचा जो छळ तुह्मीं केला तो त्यासच योग्य; मज सारिखा दीन तशा छळास पात्र नाहीं, असा मागल्या चार केकां वर कटाक्ष ठेवून एथें कवीची दृष्टांतोक्ति जाणावी. ह्मणून 'अहो शरण्या कराल तितुकी कृपा बहु,-अहो शरण्या-रक्षणस्थाना-निर्भयस्थाना-अर्थात् हे माझ्या रक्षका- हे भय हारका, तुह्मीं कराल तितकी कृपा फार; अर्थात् मज वर तुह्मीं कितीहि थोडी कृपा केली तरी ती मला फारच होय. या विधानेंकरून कवीनें आपलें कार्पण्य आणि प्रभूचें दयानिधित्व सिद्ध केलें; जसें एकाद्या अत्यंत दरिद्र्यास महान् श्रीमानानें कितीहि अल्प दान दिलें तरी तें त्यास फारच, तद्वत्. असा दीन असून आणखी कवि ह्मणतात' मीं शरणागत अरण्यात तमीं बुडोनि श्रमतसें,- मीं शरणागत- मीं जो तुह्मांस शरणागत-शरण आलेला, तो मीं' अरण्यात[१]- या संसाररूप अरण्यांत, आणखी' तमीं- अंधारांत- अर्थात् अज्ञानरूप अंधःकारांत, बुडोनि - बुडून, श्रमतसें - श्रम पावत आहें. सारांश, या संसाररूप अरण्यांत, त्यांत आणखी अज्ञानरूप अंधःकारांत, बुडून दुःख पावत आहें, आणि तुह्मास शरणहि आलों आहें, अशा मला तुह्मीं दयानिधि आणि दीनवत्सल असतां कदापि छळणार नाहीं असा अर्थ. यांत कवीनें भगवंताचें दयालुत्व आणि भक्तवात्सल्य दर्शवून आपलें बलहीनत्व आणि भगवत्परीक्षणानर्हत्व ध्वनित केलें. हा दृष्टांत अलंकार होय.

---

१ एथें प्रासा करितां अनुस्वाराभाव जाणावा.

**मुखासिजंवपातलींश्रमअरण्यऐशींपदें ॥**
**निजस्मृतिसजाहलींविषयतींतवश्रीपदें ॥**
**गुरूक्तिसकरावयासफलजानकीजीवना ॥**
**धरासुरतपःफलेंत्वरितधांवलींजीवना ॥ ८० ॥**

मागील केकेच्या शेवटीं ‘श्रमतसेंअरण्यात मीं’ ह्मणून जें ह्मटलें त्या वरून रामावतारीं स्वानुरक्त जे आपले स्वकीय त्यांच्या कार्यार्थ स्वतः आपण फार श्रम घेतले असें भगवंतास स्मरण देऊन तदवतारवृत्तांतपूर्वक कवि प्रार्थितात.

**पदान्वय**— जंव श्रम अरण्य ऐशीं पदें मुखासि पातलीं, तीं तव श्रीपदें निज स्मृतिस विषय जाहलीं, जानकीजीवना जीं धरासुरतपःफलें गुरूक्तिस सफल करावया वना त्वरित धांवलीं.

**जंव श्रम अरण्य ऐशीं पदें मुखासि पातलीं,**— जंव- ज्या काळीं, श्रम आणि अरण्य, ऐशीं पदें- असे शब्द, मुखासि पातलीं- माझ्या तोंडीं आलीं; अर्थात् मागील केकेंत शेवटल्या चरणांतील श्रम आणि अरण्य हे शब्द माझ्या तोंडीं येतांच; **तीं तव श्रीपदें निज स्मृतिस विषय जाहलीं,**— तीं तुझीं, श्रीपदें,- श्री- मंगलरूप- कल्याणकारक, पदें- चरण, निज स्मृतिस- माझ्या स्मृतिला, विषय झालीं- विषयभूत झालीं; अर्थात् ते तुझे मंगलरूप चरण मला आठवले. अथवा, एथें- ‘तंव तीं श्रीपदें’ असा पाठ करून- जंव श्रम अरण्य ऐशीं पदें मुखासि पातलीं, तंव- त्या काळीं, तीं- तीं जीं तुमचीं प्रसिद्ध श्रीपदें, असा

अर्थान्वय

अर्थान्यव करावा. ते कोणते चरण पुसाल तर ऐका[1]

**जानकीजीवना जीं धरासुरतपःफलें गुरूक्तिस सफल करावया वना त्वरित धांवलीं,**- जानकीजीवना- हे जानकीच्या प्राणवल्लभा- सीतापते- हे रामचंद्रा, या संबो- -धनेंकरून कवीनें प्रभूस अकस्मात् आपल्या रामावताराचें स्मरण देऊन पुढील प्रार्थनेच्या अवधारणास सावध केलें, **जीं धरासुरतपःफलें,**— **जीं**- जीं तुमचीं श्रीपदें, **धरासुरतपःफलें,**-धरा-पृथ्वी, तिजवरील[1] सुर-देव,-भूदेव- अर्थात् ब्राह्मण, त्यांणीं केलें जें[1] **तप**- तपाचरण, त्याचीं जीं **फलें** -परिपाक- तद्रूप, अर्थात् ब्राह्मणांनीं तप करून प्राप्य जी वस्तु तद्रूप, अशीं तुमचीं श्रीपदें[1] **गुरूक्तिस सफल करावया वना धांवलीं,**— गुरूक्तिसः- गुरु- पिता- त्याच्या[1] उ- क्तिस- वचनास- अर्थात् दशरथाच्या वचनास, सफळ क- रण्या करितां, वना- अरण्यास-अरण्यां कडे, धावलीं; सारांश रामावतारीं दशरथाचें वचन सिद्धीस नेण्या करितां जे तुझे मंगलरूप पाय अरण्या कडे धांवले, ते पाय मागील केकेंत चवथ्या चरणांतील श्रम आणि अरण्य हे शब्द माझ्या मुखीं येतांच मला आठवले. हा एथें स्मरण अलंकार होय.

---

१ असा पाठ असल्यास अधिक प्रशस्त होय असें मला वाटतें.

**तईंप्रभुवरातसेंसदयकांअसेंआजहो ॥**
**विचारुनिपहाबरेंनिजमनींमहाराजहो ॥**
**वनोवनिंफिरापिशापरिह्मणाअहोरात्रहा ॥**
**नसेंकुशलभाषणींपरिअसेंकृपापात्रहा ॥ ८१ ॥**

रामावतारवृत्तांतकथनपूर्वक प्रार्थना चालू.

**पदान्वय**—प्रभुवरा तईं तसे सदय, आज असे कां हो, हो महाराज निजमनीं विचारुनि पहा बरें, वनोवनिं फिरा, पिशा परि अहोरात्र हा ह्मणा, हा भाषणीं कुशल नसे, परि कृपापात्र असे.

**प्रभुवरा तईं तसे सदय,—** प्रभुवरा- हे महा प्रभो, तईं- रामावतारीं त्या अरण्यवासांत, **तसे** त्या प्रका-रचे, सदय- दयायुक्त; अर्थात् त्या काळीं अरण्यवासाचे कष्ट भोगून स्वकीयां वर आपली दया प्रकट केली; आणि **आज असे कां हो,—** आज, मज विषयीं **असे**- अ-र्थात् असे उदासीन, कां हो; आज मज विषयींच आपलें इतकें औदासिन्य कां असावें बरें; **हो महाराज निजमनीं विचारुनि पहा बरें,—** अहो महाराज आपल्याच मनांत विचार करून पहा बरें, कि मज विषयीं आपण इतके उदासीन असावें काय; जे आपण त्या समयीं **वनो-वनिं फिरा,-** रानोरान फिरत असा; आणि **पिशा परि अहोरात्र हा ह्मणा,—** पिशा परि- वेड्या सारिखे, अहोरात्र, **हा**- हाय हाय, **ह्मणा**- ह्मणत असा; सारांश वेड्या सारिखे रानोरान रात्रदिवस हाय हाय ह्मणत फिरत असा,

असा, याची आतां सर्व आपल्या मनांत आठवण करा. कवि आपल्या विषयीं ह्मणतात- **हा भाषणीं कुशल नसें,**- हा-. हा मीं तर भाषणांत, कुशल- चतुर, नाहीं; **परि कृपापात्र असे,**— परंतु कृपापात्र आहें; सारांश आपलें चरित्र कसें वर्णावें हें चातुर्य माझ्या अंगीं नाहीं, केवळ आपल्या कृपेस मात्र पात्र आहें, ह्मणून मज वर आपण कृपा कराच करा असा अर्थ.

समागमतुझाघडोह्मणुनिजाह्लेलाकडें ॥
तपोनिधितसेमुनित्यजुनिजोडिलींमाकडें ॥
अयुक्तबहुज्याजनास्तवघडेपडेसाकडें ॥
तदुक्तिहुनिआमुचेंबहुतबोलणेंवाकडें ॥ ८२ ॥

मागील केकेंत शेवटीं कवीनीं मीं भाषणांत कुशल नाहीं ह्मणून सांगितलें, यांत मज पेक्षांहि भाषणचातुर्य्यहीनां वर आपण कृपा केली आहे असा स्वाभिप्राय दर्शवित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय-** तुझा समागम घडो ह्मणुनि तपोनिधि लाकडें जाहले, तसे मुनि त्यजुनि माकडें जोडिलीं, ज्या जना स्तव अयुक्त बहु घडे, साकडें पडे, तदुक्तिहुनि आमुचें बोलणें बहुत वाकडें.

**तुझा समागम घडो ह्मणुनि तपोनिधि लाकडें जाहले,**—कविप्रभुस ह्मणतात॑ तुझा समागम घडावा ह्मणून, तपोनिधि- तपाचें भांडार-तपोराशि- अर्थात् महान् तपस्वी, तपश्चर्या करितां करितां॑ **लाकडें जाहले**-अर्थात् लांकडा सारिखे शुष्क झाले; ज्यांचीं शरीरें वाळून लांकडा सारिखीं रोड आणि शुष्क झालीं; **तसे मुनि त्यजुनि माकडें जोडिलीं,**- तसे- त्वत्प्राप्त्यर्थ दारुण तप करून लांकडा सारिखे शुष्क झालेले, **मुनि**-तपस्वी, **त्यजुनि**- टाकून- त्यांनां तसेच तपाचरणांत निमग्न ठेवून, रामावतारीं तुह्मीं॑ **माकडें**- वानरें, **जोडिलीं**- मिळविलीं. मग॑ **ज्या जना स्तव अयुक्त बहु घडे** -ज्या जनास्तव,-ज्या वानररूप जनास्तव-अर्थात्

ज्या

ऱ्या वानरां साठीं, तुह्मा कडून-अयुक्त-अयोग्य- जें नव्हा-वें तें- अर्थात् तुमच्या योग्यतेस अनुचित असें कर्म, बहुत, घडलें; आणि, **साकडें पडे,**- तुह्मांस केव्हां केव्हां त्यां सा-ठीं-साकडें- अवघड- संकट, हि-पडलें; **तदुक्तिहुनि आ-मुचें बोलणें बहुत वाकडें,**-तदुक्तिहुनि- अशा वानरां-च्या भाषणा पेक्षां, आमचें बोलणें फार वांकडें वाटतें; एथें कवीनें लावून बोलल्या सारिखें दाखविलें, अर्थात् वानरां पे-क्षां तर आमचें बोलणें वांकडें नसेल, मग अशा वानरां वर आपण कृपा केली, आणि मीच कसा आपल्या कृपेस पात्र नसावा; असा एथें पूर्वसंबंध जाणावा.

**जगत्त्रयमनोहराबलगुणैकरत्नाकरा ॥**
**ह्मणेकनकरंकुथ्यामजमहाप्रयत्नाकरा ॥**
**प्रियाहिअशिजाहलीतुजकुकार्यआज्ञापिती ॥**
**सुधात्यजुनिकामुकप्लवगअंगनाज्ञापिती ॥ ८३ ॥**

रामावतारीं सीतेनेंहि भलताच छंद घेतला तोहि त्वां पुरविला, असा आणखी वृत्तांत कथित होत्सातां कवि ह्मण--तात.

**पदान्वय—** जगत्त्रयमनोहरा बलगुणैकरत्नाकरा ह्म-णे महा प्रयत्ना करा, मज कनकरंकु द्या, प्रियाहि तुज अ-शि कुकार्य आज्ञापिती जाहली; कामुक प्लवग सुधा त्यजु-नि अंगनाज्ञा पिती.

**जगत्त्रयमनोहरा बलगुणैकरत्नाकरा ह्मणे महा प्रयत्ना करा,—** जगत्त्रयमनोहरा,- जगत्त्रय- लोकत्र-य, त्यास- **मनोहर-** सुंदर- अर्थात् सर्व त्रैलोक्यास रमणीय दिसणारा- अथवा, बलगुणेंकरून सर्व त्रैलोक्याच्या मनाचें हरण करणारा, अशा तुज, आणखी- **बलगुणैकरत्नाकरा,- बल-** सामर्थ्य, आणि- **गुण-** ऐश्वर्यादि षड्गुण[1], यांचा- **ए-क**-मुख्य, **रत्नाकर**-खाण अथवा समुद्र, अर्थात् बलगुणाची मुख्य खाण- उत्पत्तिस्थान, जो तूं त्या तुज, **ह्मणें**-पुढील सं-दर्भानें ती तुझी प्रिया सीता ह्मणाली, कीं- **महा प्रयत्ना क-रा**

१ भगवंताच्या षड्गुणाचें नांव भग

ऐश्वर्यस्यसमग्रस्यधर्मस्ययशसःश्रियः ।
ज्ञानवैराग्ययोश्चैवषण्णांभगमितीरितं ॥

-रा- मोठा प्रयत्न करा, आणि' **मज कनकरंकु द्या,** मला, कनकरंकु,- **कनक-** सुवर्ण- अर्थात् सुवर्णा सारिखा, **रंकु-** हरिण विशेष,[1] द्या; ह्मणून' **प्रियां हि तुज अशि कुकार्य आज्ञापिती जाहली,— प्रिया-** तुझी प्रिया- जानकी, ही, **तुज-** असा जगत्त्रय मनोहर आणि सर्वगुणैकरत्ना-कर जो तूं त्या तुज- अशि, **कुकार्य-** कुत्सित कार्य- अर्था-त् हरण धरण्याचें कुत्सित काम, **आज्ञापिती जाहली-** सांगती झाली; अथवा, ' जगत्त्रयमनोहरा, आणि **बलगुणै-करत्नाकरा'** हीं दोन संबोधनें करावीं, ' ह्मणजे हे 'जगत्त्रय-मनोहरा, हे बलगुणैकरत्नाकरा, महा प्रयत्ना करा, आणि' मज कनकरंकु द्या ( असें ती जानकी ) ह्मणे, ' असा इष्ट असल्यास अर्थान्वय करावा. सारांश तूं त्रैलोक्यसुंदर आणि सकलबलगुणाचा निधि असा भ्रतार सन्निध असतां, यःक-श्चित् सुवर्णकांतीच्या हरणाच्या चर्मानें लोभाविष्ट होऊन तो पळणारा हरण मोठा दीर्घ प्रयत्न करून धरून मला द्या, ह्मणून तुझी प्रिया जानकी तुला अशी निंद्य आज्ञा करिती झाली. कवि ह्मणतात हें ठीकच आहे, कारण' **कामुक प्रकट सुधा त्यजुनि अंगनाज्ञा पिती,— कामुक-** कामी- स्त्रैण पुरुष, आहेत ते' **प्रकट-** प्रत्यक्ष, **सुधा-** अमृत, टाकून, **अंगनाज्ञा,-** अंगना- **स्त्री,** तिची' **आज्ञा, पिती-** पितात-अर्थात् ग्रहण करितात; एथें 'सुधा' आणि **'अंगनाज्ञा'**

या

---

1 **कृष्णसाररुरुन्यंकुरंकुशंबररौहिषाः**

' **अमर.**

या दोन पदांची अन्योन्यदृष्टि आहे ह्मणून सुधेशीं अंगनाझे-
-च्या संबंधानें पिणें या क्रियेचा प्रयोग जाणावा. सुधापान
टाकून अंगनाज्ञा पिती असा अर्थान्वय. अर्थात् अमृतास ए-
कीकडे ठेवून स्त्री जें सांगेल तें करितात. सारांश, सीतेच्या
प्रेमा स्तव आपणास स्त्रैण [1] व्हावें लागले. हा अर्थांतरन्यास
अलंकार होय.

---

१ या आपल्या कवीनें अशा स्त्रैण पुरुषाचें पराधीनत्व दृष्टांतरूपानें
ग्रंथांतरीं सरस वर्णिलें आहे:

शिरजोरबायकोचा शणजसाशांतदादलावाहे
धीवर्तवीतजीवा सतद्धेदेवाशिरादलावाहे ॥

**स्वदाससमर्यांजपेतरिनदेवराचाकरी ॥**
**चुकेनपरिसार्थकश्रमनदेवराचाकरी ॥**
**वदेहिभलतेंचितेतिसचिकोपटाकापुसा ॥**
**असेंमृदुह्मणोनिबामजनधोपटाकापुसा ॥ ८४ ॥**

आणखी त्या जानकीचा शोच्य वृत्तांत कवि सांगतात.

**पदान्वय**—स्वदास समर्यां जपे तरि वरा न दे, चाकरी न चुके परि देवराचा श्रम सार्थक न करी, ते भलतेंचि हि वदे, कोप टाका, तिसचि पुसा, बा मृदु असें ह्मणोनि मज कापुसा न धोपटा.

**स्वदास समर्यां जपे तरि वरा न दे,**— स्वदास- हनुमान, **समर्यां**- समयास- वेळे वर, **जपे**- जपत असे- तिच्या आज्ञे प्रमाणें करायास तत्पर असे, तथापि ती जानकी- **वरा**- आशीर्वचनाला, **न दे**- देईना; सारांश, हनुमान सीतेच्या आज्ञे प्रमाणें चालायास वेळोवेळ बहुत जपला तथापि तिणें बहुकालपर्यंत त्यास वर दिला नाहीं; तसेंच आणखी- **चाकरी न चुके परि देवराचा श्रम सार्थक न करि,**—**चाकरी न चुके**-चाकरी चुकला नाहीं, अर्थसंदर्भानें लक्ष्मण चुकला नाहीं, **परि**- तथापि, तिणें त्या- **देवराचा**- दिराचा, श्रम, **सार्थक**- सफळ, **न करि** - केला नाहीं; कधींहि सेवा करण्यांत चुकला नाहीं तथापि त्या लक्ष्मणास तिणें श्रमाचें फळ दिलें नाहीं; इतकेंच नाहीं परंतु- **ते भलतेंच हि वदे,**- **ते**-ती जानकी, त्या लक्ष्मणास- **भलतेंच**

-तेंच-नाहीं तसें अयोग्य, हि-आणखी, वदे-बोलली; [1]अशी रामावताराची तुमची कथा आहे ह्मणून तद्वृत्तांतस्मरणानें कदाचित् तुह्मांस कोप आला असेल तर तो **कोप टाका**,- **कोप**- राग, **टाका**- टाकून द्या, आणि **तिसचि पुसा**,- **तिसचि**- तिलाच- त्या जानकीलाच, **पुसा**- अशी तूं स्वदासा विषयीं निष्ठुर कां झालीस ह्मणोन तिला तिच्या निर्दयतेचें कारण पुसा; **बा मृदु असें ह्मणोनि मज कापुसा न धोपटा**,— परंतु **बा**, **मृदु असें**- मी मऊ आहें, **ह्मणोन**, मज

---

१ ज्या काळीं जानकीचा छंद पुरविण्या करितां सुवर्णमृग धरायास रामचंद्र त्याच्या मागें वनांत गेले, आणि तिणें त्यांची मार्गप्रतीक्षा फार वेळ केली, तथापि ते परत आले नाहींत, त्या काळीं अधीर होऊन तिणें लक्ष्मणास रामचंद्राचा शोध करावा ह्मणून सांगितलें. लक्ष्मण विनयपूर्वक तीस ह्मणाला- आतां रामचंद्राहि गेले, आणि मलाहि आपण जा ह्मणोन सांगतां, तर अशा घोर अरण्यांत आपल्यास आश्रमीं एकटी टाकून बाहेर जाणें मला योग्य नाहीं, असें आज्ञोल्लंघना सारिखें लक्ष्मणाचें भाषण ऐकून जानकीस क्रोध येऊन ती त्यास ह्मणाली- तर मग रामचंद्राच्या पश्चात् माझा अभिलाष तुला इष्ट आहे असें अनुमान होतें- या दुरुत्तरानें विद्धांतःकरण होऊन लक्ष्मण जानकीस तशी आश्रमीं एकटी टाकून रामाच्या शोधार्थ वनांत गेला, ती जानकीची स्वाश्रमीं एकटी असण्याची संधि पाहून रावणानें तिचें त्या अवसरीं हरण केलें, अशी रामायणांत कथा प्रसिद्ध आहे. त्या अवसरींचें जें लक्ष्मणा प्रत सीतेचें दुरुत्तर तें एथें कवीनें सुचविलें आहे. हा प्रसंग एका कवीनें साकीं लिहिलेल्या सुरस पदांत सीतेच्या मुखानेंच वर्णिला आहे;—

षड्गुणतरुआराम सबांधवराम कपींद्रा सुखी असे कीं॥ धृ०॥
कनककुरंजनपाठींश्रमला—
सौमित्राम्यांदुर्वाक्यंछळिलेंत्याचाहापरिणाम भोगितें—

मज कापुसा- मला कापसाला, न धोपटा- धोपटूं नका; सारांश, अशा जानकीच्या आचरणाच्या कथमानें कदाचित् तुह्मांस क्रोध आला असेल तर तो टाका, आणि तिलाच तिच्या अशा आचरणाचें कारण पुसा; मीं मऊ कापूस तुमच्यां हातीं सांपडलों ह्मणोन मला धोपटूं नका. हाहि अर्थांतरन्यास अलंकार होय. एथें कवीनीं लडिवाळपणानें प्रभूची प्रार्थना केली आहे असें समजावें. आणखी हें जानकीचें स्वदासविषयककारुण्याभावकथन- प्रपंचात्मिका जी माया, तद्रूपा जी जानकी, तिचें सेवन ह्मणजे प्रपंचानुसरण, त्याचें वैय्यर्थ्यद्योतनार्थक रूपक होय, असा मला वाटतें एथें कविन्हृद्गत भावार्थ असावा. आणखी या केकेंत कवीनें चारी चरणांत यमक फार सरस सधिलें आहे.

**नजेंप्रियसदोषतेंप्रियसदोषहीचांगलें ॥**
**स्वतोकपितरांरुचेजरिहिकर्दमीरांगलें ॥**
**तुलाचिधरिपोटिशींकशितदायशोदाबरें ॥**
**जरींमळविशीरजोमलिनकायतूंअंबरें ॥ ८५ ॥**

मागील केकेंत स्वकीयदोषा विषयीं जी प्रभूची दुर्लक्षता दाखविली, तोच भावार्थ दृष्टांतरांनीं कृष्णावतारलीलाकथनद्वारा सांगतात.

**पदान्वय**— जें प्रिय न तें सदोष, प्रिय सदोष हि चांगलें, जरि स्वतोक कर्दमीं हि रांगलें पितरां रुचे, जरीं तूं रजोमलिनकाय अंबरें मळविशी, तदा तुलाचि यशोदा कशि बरें पोटिशीं धरि.

**जें प्रिय न तें सदोष,**— जें- जें कांहीं- जी वस्तु, **प्रिय न**- आवडती नाहीं, **तें**- ती वस्तु **सदोष**- दोषयुक्त; अर्थात् जी वस्तु कोणास प्रिय नसत्ये, ती त्यास दोषयुक्त दिसत्ये, तिची कांहीं तरीं व्यंगता तो बळेंच काढतो; आणि **प्रिय सदोष हि चांगलें,**- **प्रिय**- जी वस्तु आवडती, ती जरीं **सदोष**- दोषयुक्त असली तथापि, **चांगली**- निर्दोष; अर्थात् प्रिय वस्तु सदोष असली तथापि ती निर्दोष अशी दिसत्ये; यास दृष्टांत **जरि स्वतोक कर्दमीं हि रांगलें पितरां रुचे,**— जरीं, **स्वतोक**- आपलें लेंकरूं, **कर्दमीं हि**- चिखलांतहि, रांगलें, तथापि **पितरां**- आईबापांस, **रुचे**- आवडतें; त्यांत आणखी कवि प्रभूस ह्मणतात तुह्मीं आपलेंच उदाहरण घ्या **जरीं तूं रजोमलिनकाय अंबरें मळ-**

विशी-

**विशी,—** जरीं तू, **रजोमलिनकाय,-** **रज-** धूळ, तिणें मलिन- मळलेलें आहे, **काय-** शरीर, ज्याचें असा, असतां **अंबरें-** वस्त्रें, मळविशी- मळवित होतास; अर्थात् गोकुळांत बाळपणीं तूं धुळीनें शरीर मलीन करून त्या मलीन शरीरानें वस्त्रें मळवित होतास; तथापि **तदा तुलाचि यशोदा कशि बरें पोटिशीं धरि,—** तदा-वस्त्रें मळवित होतास तेव्हां, तुलाच, तुझी आई यशोदा, कशी बरें पोटाशीं धरित होती; सारांश जसें हें, तसेंच आपण एकदां ज्याचा अंगीकार करून आपलेंसें ह्मटलें मग त्याजपासून जरीं अपराध घडला तरीं आपण त्याज वर अनुग्रह करितां, असा एथील कविमनोगतार्थ जाणावा.

तुझेकथितिगोपिकाविविधतीसबोभाटते ॥
सुखप्रदगुणस्तवापरिसजाहलेवाटते ॥
क्षमानकरिएकदातरिहिफारखोडीकरा ॥
नदेचिभयताडनोद्यमसमेतसोडीकरा ॥ ८६ ॥

मागील केकेंतला भावार्थ आणखी दृष्टांतेंकरून कवि वर्णितात.

**पदान्वय**—तुझे विविध बोभाट तीस गोपिका कथिति, ते गुणस्तवा परिस सुखप्रद वाटते जाहले; एकदा क्षमा न करि तरि हि फार खोडी करा, ताडनोद्यम भय न देचि, समेत करा सोडी.

**तुझे विविध बोभाट तीस गोपिका कथिति,** कवि प्रभूस ह्मणतात, तुझे विविध बोभाट - तुझे त्या काळीं बाळपणींचे, विविध- नानाप्रकारचे, बोभाट-गिल्हे, तीस - त्या यशोदेस, गोपिका - त्या गोकुळांतल्या गौळणी, कथिति - सांगतात - सांगत होत्या; **ते गुणस्तवा परिस सुखप्रद वाटते जाहले,** - ते - तुझे बोभाट, गुणस्तवा परिस - तुझ्या गुणाच्या स्तवना पेक्षां, सुखप्रद - सुखदायक - आल्हादकारक असे, त्या येशोदेस वाटते झाले; अर्थात् त्या गोपिकांनीं जरीं नानाप्रकारचे तुझे गिल्हे केले तरीं त्या यशोदेस तुझ्या गुणाची प्रशंसा ऐकण्या पेक्षां त्या तुझ्या लहानपणींच्या खोडीचे बोभाट ऐकून अधिक आनंद होत असे; अत्यंत स्नेहाळु आई असली ह्मणजे तीस मुलांच्या खोडीपासूनहि मोठा हर्ष होत असतो.

बाळपणीं

बाळपणीं तुह्मीं मोटें खोडकर होतां असा अपला अभि-
-प्राय सुचवित होत्साते कवि आणखी ह्मणतात ' **एक-**
**-दा क्षमा नकरि तरि हि फार खोडी करा,**-ती यशो-
दा एकदांहि तुमची क्षमा करित नसे, तरिंहि तुह्मीं फार खोडी
करित असा; आणि ' **ताडनोद्यम भय न देचि,**- ताड-
नोद्यम, - तिचा ' ताडनोद्यम, - ताडन - मारणें, त्याचा ',
उद्यम- उद्योग, अर्थात् मारण्याचा उपक्रम, तुह्मांस भयच देत
नसे; अर्थात् ती यशोदा तुह्मांस मारूं लागे तरीं तुह्मीं भीत
नसा; मग ' **समेत करा सोडी,** - समेत - त्या ताडनो-
द्यमा ' बरोबर- लागलीच, **करा** - आपल्या हातास,
**सोडी**- ताडनोद्यमापासून मुक्त करित असे. अर्थात् नमारि-
तां ती अपला हात आटोपून घेई. अथवा, **करा सोडी**- ह्म-
णजे ताडनोद्यमा पूर्वीं बांधलेले जे तुमचे हात त्यांस मोकळे
करी. मुलांस मारण्याचें भय दाखविण्यां करितां त्यांचे हात
प्रथम दोरीनें बांधतात, हाच ताडनोद्यम, यासहि प्रभू बाल-
कृष्ण भीत नसत, तेव्हां मग ती ते हात मोकळे करित असे,
असा अर्थ समजावा.

जरींह्मणसिबांधिलेंतरींनकष्टवीलेंकरा ॥
विचारजशिकष्टवातशिनकष्टवीलेंकरा ॥
यथेष्टपुरतेंजरींप्रथमदामकांसांधिती॥
नतीप्रबळगोपिकातुजतुझीदयाबांधिती ॥ ८७ ॥

कदाचित् तुह्मीं ह्मणाल कि यशोदेनें मला बांधलें तर खरें, त्यास याहि आशंकेचें समाधान करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** बांधिलें जरीं ह्मणसि, तरि न कष्टविलें, विचार करा, जशि कष्टवा तशि लेंकरा न कष्टवी, प्रथम दाम जरीं यथेष्ट पुरतें, कां सांधिती, ती गोपिका प्रबळ न, तुझी दया तुज बांधिती

**बांधिलें जरीं ह्मणसि,—** यशोदेनें शेवटीं मला बांधिलें तर खरें असें जरीं तूं ह्मणशील; **तरि न कष्टवीलें,—**तरीं तिणें तुला कष्टविलें नाहीं; उलटा आणखी **विचार करा-** तुह्मीच आपल्या मनांत विचार करून पहा; कि **जशि कष्टवा तशि लेंकरा न कष्टवी,-** जशी, तुह्मास बांधितानां तुह्मीं तीस कष्टवा - कष्टविलें - थकविलें, तशी, ती तुह्मा **लेंकरा न कष्टवी-** तसें तिणें आपल्या लेंकरास कष्टविलें नाहीं; कारण **प्रथम दाम जरीं यथेष्ट पुरतें,-** प्रथम- पहिल्यानेंच, तें **दाम-** दावें, जरीं- जर, **यथेष्ट-** पाहिजे तसें, **पुरतें-** बांधायास पुरें होतें; तर मग **कां सांधिती,-** ती त्यी दांव्यास दुसरें दावें लावून आणि मग त्यास तिसरें याप्रमाणें अनेक दांवीं लावून **कां सांधिती?**-अर्थात् तिणें तीं सांधिलीं

धिलीं नसतीं; ह्मणून ज्या पेक्षां अशीं अनेक दावीं तीस सां-धावीं लागलीं, त्या पेक्षां तुह्मीच तुह्मास बांधविण्यांत तिला कष्ट दिले. कदाचित् ह्मणाल कि इतकें जरीं त्यां तीस थकविलें तरी शेवटीं तिणें मला बांधिलें तर खरें; त्यास ऐका'**ती गो-पिका प्रबळ न,**— ती गोपिका- ती गौळण- यशोदा, **प्रबळ**- बांधायास समर्थ, **न** - नाहीं; तर' **तुझी दया तुज बांधिती,**- तुझी दयाच तुला बांधित्ये; अर्थात् यशोदेचा बांधण्याचा प्रयत्न व्यर्थ जातोसा पाहून शेवटीं तुलाच तिज-विषयीं दया येऊन जेव्हां त्वांच आपल्यास बांधून घेतलें, ते-व्हां ती तुला बांधायास समर्थ झाली; अर्थात् तूं कोणत्याहि उपायानें कोणाच्यानेंहि बांधला जात नाहींस, परंतु तुझ्या दयेनेंच तूं बांधला जातोस; तात्पर्य हेंच कीं तूं अत्यंत दयालु आहेस; असा एथील ध्वनितार्थ जाणावा.

---

१ वामन पंडितानें हें कृष्णाचें उखलबंधन फार सरस वर्णिलें आहे; आणि त्यांतहि असाच भावार्थ प्रकट केला आहे, कीं जो सर्व विश्वातें व्यापून उरला आहे, जो आकाशाचेहि पलीकडेस, ज्यास सर्व जगज्जननी मायाहि आटोपूं शकत नाहीं, असा सर्वातीत भगवान् असतांहि तो भक्ति-प्रेमरसनेनें व स्वदयेनें बांधला जातो.

नआदिनामध्यनअंतजाला । बांधेकसेंकोणतयाअजाला ।
जरींस्वयेंसर्वजगांतमाता । तबांधिनीयत्नकरूनिमाता ॥ ४८ ॥
हेंतत्वनेणोनचिकष्टभारी । माताकरीहेखुणीकैटभारी ।
दयाकटाक्षेंजननीसपाहे । बांधोनघेदाखवितैंकराहे ॥ ४९ ॥
एवंचलक्ष्मीकमलासनाहो । प्रसादऐसाकवणासनाहीं ।
बांधोनिघेगौळणिच्याचहातीं । ब्रह्मारमाकौतुकेंहेंपहाती ॥५३॥
बांधेयशोदाबहुतांउपायीं । यत्नाविणेंवामनत्यासुपायीं ।
प्रेमेंचबांधेअजिआयत्यानें । केलेंनजाणोंतपकायत्यानें ॥ ५४ ॥

तुह्मींहिबळिबांधिलाह्मणुनिआमुचीमायजी ॥
मनांतसहजादयानिपटटाकिलीकायजी ॥
सकोपदिसतीगुरुक्षणभरीचजेंतापलें ॥
जलज्वलनसंगमेंत्यजिनशैत्यतेंआपलें ॥ ८८ ॥

यशोदेचा मला बांधण्याचा प्रयत्न व्यर्थ जातोसा पाहून मला दया येऊन त्यां आपणास बांधून घेतलें, परंतु ज्याकाळीं त्यांच बळीला पाताळीं बांधिला त्या काळीं त्यां तर त्याज वर दया केली नाहीं; या आशंकेचें समाधान करित होत्साते कवि पुढल्या दोन केकांत ह्मणतात.

**पदान्वय—** तुह्मींही बळि बांधिला ह्मणुनि जी आमुची माय सहजा दया मनांत निपट टाकिली कायजी, गुरु क्षणभरीच सकोप दिसती, ज्वलनसंगमें तापलें जें जल तें आपलें शैत्य न त्यजि.

**तुह्मीं हि बळि बांधिला ह्मणुनि जी आमुची माय, सहजा दया मनांत निपट टाकिली कायजी,—** तुह्मीं **हि बळि बांधिला-** जसें यशोदेनें तुह्मांस बांधिलें तसा तुह्मीं हि, **बळी बांधिला,-**पाताळीं बळीला बांधिलें; ह्मणूनि-इतक्या वरूनच-इतक्याच कार्यानें, **जी आमुची माय सहजा दया,** -जी, **आमुची-**आह्मां सारिख्या दीन शरणागतांची, **माय** - माता- आई, **सहजा-** नैसर्गिक - स्वाभाविक, **दया**-तुमची दया, ती **मनांत निपट टाकिली कायजी, -** मनांत - तुह्मीं आपल्या मनांत अर्थात् मनांतून, **निपट** - अगदीं, **टाकिली कायजी** - टाकून दिली, **कायजी-** काय हो; अर्थात्

टाकिली

टाकिली नाहीं हो; सारांश तुह्मीं पाताळीं बळीला बांधून ठेविलें, ह्मणून आह्मां दीन शरणागतांची आई जी तुमची दया ती तुह्मीं आपल्या मनांतून निस्तुक टाकून दिली नाहीं; अर्थात् आह्मां शरणागतां विषयीं तुमच्या मनांत दया आहेच आहे. अथवा, एथें **मायजी**[1] - माता - आई, अशा अर्थी एक शब्द करून, - '**आमची मायजी मनांत सहजा दया**', ती '**निपट टाकिली कायजी**' असा शब्दान्वय करावा. अथवा, यांतहि '**कायजी**' यांतील '**जी**' हें संबंधी सर्वनाम करून - 'जो आंनुची मायजी मनांत सहजा दया (ती) निपट टाकिली काय', असा आणखी इष्ट असल्यास शब्दान्वय करावा. हाच भावार्थ कवि अर्थांतरन्यासेंकरून आणि दृष्टांतेंकरून दृढ करितात. यद्यपि राग आला तथापि- **गुरु क्षणभरीच सकोप दिसती,— गुरु**- श्रेष्ठ- थोर जे आहेत ते, **क्षणभरीच** - क्षणभरमात्र, **सकोप** - सक्रोध- रागें भरले, असे ⁄ **दिसती** - दिसतात - अर्थात् थोरांस राग आला तरीं क्षणभर;[2] यास दृष्टांत ⁄ **ज्वलनसंगमें तापलें जें जल तें आपलें शैत्य नत्यजि,— ज्वलनसंगमें**, - ज्वलन - अग्नि, त्याचा ⁄ **संगम**- योग, तेणेंकरून,- अर्थात् अग्नीच्या योगानें, तापलें जें, **जल**- उदक - पाणी, तें आपलें, **शैत्य** - शीतलता - आर्द्रता, **नत्यजि** - टाकित नाहीं; जरीं अग्नानें पाणी उष्ण झालें, तथापि त्याच अग्नीस विझ-

विण्यास

---

1 आदरार्थी - माई, आई, बाई, यांस जो प्रत्यय लागून- मायजी, आयजी, बायजी, असे शब्द होतात.

२ 'उत्तमस्य क्षणं कोपः' ही ह्मण प्रसिद्ध आहे.

विण्यास जी त्याच्या अंगीं आर्द्रता असती ती तें टाकित नाहीं. सारांश, अग्नीनें तप्त झालें उदक जसें आपलें शैत्य टाकित नाहीं, तसें कारणवशात् थोरांस जरीं क्षणभर कोप आला तरीं ते आपली स्वाभाविक दया टाकित नाहींत.[१] या केकेंत प्रथम दोन चरणांत ‘ दया ’ हें उपमेय, आणि ‘ माय’ हें उपमान, यांचा अभेद दर्शविला आहे ह्मणून एथें हा रूपक अलंकार होय. आणखी बलिबंधनरूप व्यापारानें अनुमित जो भगवत्कोप त्याचें विशेष विधान ‘ गुरु क्षणभरीच सकोप दिसती,’ या सामान्यार्थाच्या विधानेंकरून दृढ केलें आहे, ह्मणून हा अर्थांतरन्यास अलंकार जाणावा; आणि क्षणिक कोप या उपमेयाचा आणि उष्णोदक या उपमानाचा एथे बिंबप्रतिबिंबभाव दिसतो ह्मणून शेवटल्या दोन चरणांत आणखी दृष्टांत अलंकार जाणावा.

---

१ याच अर्थानें नागपत्नींनीं भगवंतास ह्मटलें आहे किं तुमचा कोपहि खलांस अनुग्रहच होतो—

अनुग्रहोऽयंभवताकृतोहिनो
दंडोऽसतांतेखलुकल्मषापहः ।
यद्दंदशूकत्वममुष्यदेहिनः
क्रोधोऽपितेऽनुग्रहएवसंमतः ॥ ३४ ॥

भाग०, स्कं० १०, अ० १६.

**प्रसिद्धतुमचेमहासदयपायजीवांकडे ॥**
**चुकीह्मणुनिहोतिलक्षणहिकायजीवांकडे ॥**
**ननिष्ठुरपिताह्मणेमनिनहोप्रजाटोणपी ॥**
**अपथ्यरुचिरुग्णतोकटुकओखदेंकोणपी ॥८१॥**

या प्रमाणें कोपांतहि तुमची प्रसिद्ध दया पूर्णअंशें-करून मिश्रित असतां मग तुमच्या दयेचाच लाभ कां घेऊं-नये असा अभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** तुमचे पाय महा सदय प्रसिद्ध, जीवां कडे चुकी, ह्मणूनि क्षण हि वांकडे होतिल काय जी, न; निष्ठुर पिता मनिं न ह्मणे प्रजा टोणपी हो, तो कोण अपथ्यरुचिरु-ग्ण कटुक ओखदें पी.

**तुमचे पाय महा सदय प्रसिद्ध,—** कवि भगवंतास ह्मणतात॑ तुमचे पाय, **महा**- मोठे- अत्यंत, **सदय**- दयायुक्त- दयावंत, ह्मणून॑ प्रसिद्ध- प्रख्यात, आहेत; आणि॑ **जीवां कडे चुकी,—जीवां कडे**- आह्मां सारिख्या प्राण्यां कडे, **चुकी**- दोष- अपराध; अर्थात् तुह्मां कडे दया, आणि आह्मां जीवां कडे अपराध; सारांश आह्मीं जीवांनीं अपराध करावे, आणि तुह्मीं दया करून त्या अपराधांची क्षमा क-रावी; **ह्मणून क्षण हि वांकडे होतिल काय जी,—** **ह्मणून**- जीवां कडे चुकी करणें आहे या कारणा स्तव, ते पाय॑ **क्षण**- क्षणभर, **हि**, **वांकडे**- अनहितकारक- जीवांचें कल्याण करण्यास प्रतिकूल, होतील काय हो; **न**;- नाहीं- कदापि

कदापि वांकडे होणार नाहींत; यास दृष्टांत^ **निष्ठुर पिता मनिं न ह्मणे प्रजा टोणपी हो,**— निष्ठुर- निर्दय- जरि^ पिता- बाप, असला तरी तो^ **मनिं न ह्मणे**-आपल्या मनां-त असें ह्मणत नाहीं कीं, **प्रजा**- आपली प्रजा- पुत्रादि, **टोणपी**- निर्लज्ज आणि मूर्ख, अशी^ **हो**- होऊ; अर्थात् निर्दय जरी बाप असला, तरी तो आपला वंश निर्लज्ज आणि मूर्ख व्हावा असें आपल्या मनांत कदापि आणित नाहीं; ह्मणून^ **तो कोण अपथ्यरुचि रुग्ण कटुक ओखदें पी,**— तो^[1] कोण - तो कोणता- असा कोणता, **अपथ्यरुचि**- अपथ्या वर आहे रुचि- आवड ज्याची असा, **रुग्ण**- रोगी, कि जो^ **कटुक**- कडू, **ओखदें**^[1]-औषधें, **पि**-पितो- पील; अर्थात् रोगी असून ज्याची कुपथ्या वर आवड असा कोणता पुरुष मिष्ट रुचकर आणि रोगपरिहारक अशीं पाकादि औषधें टाकून कडू औषधें पील; अर्थात् पिणार नाहीं. या दृष्टांताचें तात्पर्य हेंच कि भगवंता सारिखा दयालु असतां मग त्या दयेचा लाभ नघेतां, बुद्धिपुरःसर भगवंताच्या दंडानें आपलें कल्याण करूं इच्छील असा कोणी या प्रपंचांत विरळा असेल; तस्मात् बळी सारिख्यास दंड करून जरी आपण त्याज वर शेवटीं अनुग्रह केला, तरी मज निर्बला वर दयेनेंच आपण अनुग्रह करावा असा एथें कविन्द्रद्गत भाव जाणावा. हा एथें दृष्टांत अलंकार होय.

---

1 मला असें दिसतें कीं मूळचा 'ओखदा कोण पी' असा पाठ असावा; ह्मणजे 'हो प्रजा टोणपी', या वरील शब्दांच्या अंत्य स्वरां बराबर यांतील अंत्य स्वर मिळून अर्थाही प्रशस्त होतो.

**असंख्यखळसंगरींनिजकरींतुवांमारिले ॥**
**ननिष्ठुरपणेंकृपाकरुनितेभवींतारिले ॥**
**जगज्जनकतूंमुलेंसकळजीवयांभातुकें ॥**
**दटावुनिहिदेशिबाअमृतनेदिजेघातुकें ॥ ९० ॥**

मागील केकेंत सांगितलेल्या कवित्वद्रुतभावार्थाचेंच समर्थन करित होत्साते कवि आणखी ह्मणतात.

**पद्यान्वय**— तुवां निजकरीं संगरीं असंख्य खळ मारिले, निष्ठुरपणें न, कृपा करुनि ते भवीं तारिले, तूं जगज्जनक, सकळ जीव मुलें, दटावुनि हि बा यां भातुकें देशि, घातुकें अमृत नेदिजे.

**तुवां निजकरीं संगरीं असंख्य खळ मारिले,**— **त्वां निजकरीं**- त्वां आपल्या हातांनीं, **संगरीं**- युद्धांत, **असंख्य**- अगणित- पुष्कळ, **खळ**- दुष्ट जन- रावणकंसादि, **मारिले** - मारून टाकिले; परंतु **निष्ठुरपणें न,**— निष्ठुरपणानें नाहीं- अर्थात् निष्ठुरपणानें कोणीहि मारिला नाहीं; तर **कृपा करुनि ते भवीं तारिले,**— कृपा करून उलटे ते, या भवीं- संसारीं- भवसागरीं, तारिले; अर्थात् त्यांच्या अपराधांचा त्यांस यथान्याय दंड देऊन ते मुक्त केले; हें आपल्या दयालुत्वास योग्यच आहे कारण **तूं जगज्जनक,**— तूं, जगज्जनक,- जगत्- विश्व, याचा जनक- पिता- बाप, तूं या जगाचा उत्पन्न कर्ता बाप होस; आणि **सकळ जीव मुलें,**— हे सारे जीव

तुझीं

तुझीं लेंकरें होत; ह्मणूनच ' दटावुनि हि बा यां भातुकें देशि,— दटावुनि हि- बाह्यात्कारें भय दाखवूनहि, बा- बाबा, यां- या जीवरूप लेंकरांस, भातुकें देशि,- भातुकें- उपहार- खाऊ, देशि- देतोस; अर्थात् तीं मुलें घेत नसलीं तथापि भय दाखवूनहि तूं त्यांस खाऊ देतोस; एथें भयप्रद- र्शनविधान भातुक्याचें हितकारकत्वद्योतनार्थ जाणावें; कार- ण ' घातुकें अमृत नेदिजे,-घातुकें- घातकानें-नाशकानें- अर्थात् दुसऱ्याचा घात करण्याची ज्याची बुद्धि आहे अशा पुरुषाध्यानें, अमृत नेदिजे- अमृत देववत नाहीं - दिलें जात नाहीं; अर्थात् घातकी पुरुष अमृत कदापि देणार नाहीं, विषच देईल; असा ध्वनितार्थ. एथें आणखी कवीचा ' अमृत ' या शब्दा वर कटाक्ष आहे असें दिसतें. ' अमृत ' ह्मणजे अन्न,[१] ' अमृत ' ह्मणजे मोक्ष; तूं ज्या पेक्षां दटावून जीवरूप मुलांस भातुकें ह्मणून जें अन्न देतोस, अथवा रावणकंसादि खळांस दंड करून मोक्ष देतोस, त्या पेक्षां तूं त्यांचा घातक नाहींस, उलटा त्यांचा हितकर्त्ता पिता आहेस; यांत संशय नाहीं. एथें ' अमृत नेदिजे घातुकें ' या सामान्य अर्थानें वर सांगितल्या विशेष अर्थाचें समर्थन होतें ह्मणून हा अर्थांतरन्यास अलंका- र होय; त्यांत आणखी हें समर्थन कारणरूपानें केलें आहे ह्मणून हा कारणार्थांतरन्यास असा त्याचा भेद होय.

---

१ तुकोबानेंहि या ब्रह्मरसात्मक अमृतास भगवद्भक्तांचें भोजन ह्मणून वर्णिलें आहे;—

आणीकम्यांकोणायावेंकाकुलती।कोणकामायेतीअंतःकाळीं॥१॥
तुवांमाझीसखीयेसीपांडुरंगे । लवकरीवेगेंवाटपाहें ॥ २ ॥
कायावाचामनेंहेचिआसकरीं ।पाउलेंगोजिरींचितीतसें ॥ ३ ॥
तुकाह्मणेंमाझीपुरवीहेआस ।घालींब्रह्मरसभोजनहें ॥ ४ ॥

**वरिप्रकटशांतिलाधरिपरंतुमीनाबकी ॥**
**गिळीतशितुलाटपेसुकृतबुद्धिहीनाबकी ॥**
**जिणेंगरळपाजिलेंअमृतपाजिलेंतीसतें ॥**
**खळासिनदिसोभलेंपणखरेंभल्यादीसतें ॥ ९१ ॥**

मागील केकेंत अमृत देणारा घातक नव्हे ह्मणून जें शेवटीं सामान्येंकरून विधान केलें, त्याचें दृष्टांता सहित कवि समर्थन करितात.

पदान्वय— वरि प्रकट शांतिला धरि, परंतु बकी मीना गिळी, तशि सुकृतबुद्धिहीना बकी तुला टपे, जिणें गरळ पाजिलें तीस तें अमृत पाजिलें, खळासि भलें न दिसो, पण भल्या खरें दीसतें.

**वरि प्रकट शांतिला धरि,—वरि**-वरवरून-बाह्यात्कारें, **प्रकट**- स्पष्ट- उघड, **शांतिला**- शांतपणाला, **धरि**- धरित्ये; **परंतु बकी मीना गिळी,—** परंतु, **बकी**-बगळी, **मीना**- माशाला, **गिळी**- गिळून टाकित्ये; अर्थात् बाह्यात्कारें शांतपणा दाखवून मासा दृष्टीस पडतांच बगळी जशी त्यास गिळून टाकित्ये; **तशि सुकृतबुद्धिहीना बकी तुला टपे,—**तशी, **सुकृतबुद्धिहीना,**- सुकृत- सत्कर्म- पुण्य, तद्विषयक बुद्धि, तिणें, हीन- रहित,- पुण्यकर्माविषयीं जीस बुद्धि नाहीं.- अर्थात् पापिणी, अशी **बकी**- पूतना, **तुला**, **टपे**- टपून राही,- अर्थात् तुझा नाश करण्या करितां टपे; **जिणें गरळ पाजिलें तीस तें**

अमृत

**अमृत पाजिलें,**— ज्या पूतनेनें तुला विष पाजिलें तिलाच त्वां तें विष अमृत करून पाजिलें; अर्थात् तिला आपण मुक्त केलें; यांत **खळासि भलें म दिसो,**—**खळासि**- कप-टी वंचक जनास, हें आपलें अनुपम औपकारिक कर्म नी-ट नदिसेल तर नदिसो; **पण भल्या खरें दीसतें,**— प-रंतु, **भल्या**- सरळ पुरुषांस- साधुजनास, तें कर्म **खरें**- तुमच्या दयालुत्वास उचित असें, दिसतें. हा एथें विषम अलंकार जाणावा.

---

हें भगवंताचें अत्यंत दयालुत्व भागवतांत सांगितलें आहे;—

अहोबकीयंस्तनकालकूटं जिघांसयापाययदप्यसाध्वी ।
लेभेगतिंधाऽयुचितांशरण्यं कंवादयालुंशरण्यंव्रजेम॥२३॥

स्कं०३, अ०२.

पूतनालोकबालघ्नी राक्षसीरुधिराशना ।
जिघांसयाऽपिहरये स्तनंदत्वापसद्गतिं ॥ ३५ ॥
किंपुनःश्रद्धयाभक्त्या कृष्णायपरमात्मने ।
यच्छन्प्रियतमंकिंनु रक्तास्तन्मातरोयथा ॥ ३६ ॥

स्कं१०, अ०६.

सदाहिहितनायकोंबहु अपायकेलेकरूं ॥
तरींसकृपबापतूंह्मणसिनायकेलेकरूं ॥
कधींनकरिसिप्रभोभजकबालकोपेक्षण ॥
नतूजवरिज्याप्रपशुपपालकोपेक्षण ॥ ९२ ॥

पूर्वोक्त सदयता वर्णित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** सदा हि हित नायकों, बहु अपाय केले करूं, तरीं तूं सकृप बाप लेकरूं नायके ह्मणसि, प्रभो ज्या परी पशुपपाल तूज वरि क्षण न कोपे, भजकबालकोपेक्षण कधीं न करिसि.

**सदा हि हित. नायकों,—** आह्मीं पापीजन, सदा हिं - निरंतर हि, हित- तुह्मीं आमचें हित- कल्याण, सांगत असतां तें नायकों- ऐकत नाहीं; त्याज वर लक्ष देत नाहीं; उलटें **बहु अपाय केले करूं,—** आह्मीं पापी जनांनीं बहु- पुष्कळ, अपाय- अनहितकारक कर्मे- अर्थात् ऐहिक विषयाभिलाषप्रयुक्त जीं न करायाचीं तीं कर्मे, केलीं, आणखीं करूं- त्यांचा पश्चात्ताप नकरितां अद्यापि हि करितच आहों; **तरीं तूं सकृप बाप लेकरूं नायके ह्मणसि,—** तरीं- असे आह्मीं अपराध करित असतां हि, तूं, सकृप- कृपावंत- सदय, असा आमचा बाप, लेंकरूं ऐकत नाहीं असें ह्मणतोस; सारांश आह्मीं इतके दुःसह अपराध करित असतां त्या आह्मांस मोठा दंड करावा तो नकरितां

तुसतें इतकेंच ह्मणतोस कि हें लेकरूं ऐकत नाहीं; तेव्हां तुज सारिखा आणखी आह्मांस दयालु बाप कोण आहे ? पुनः आणखी प्रभूची सदयता दृष्टांतपूर्वक दृढ करित होत्साते कवि ह्मणतात ' **प्रभो ज्या परी पशुपपाल तुज वरि क्षण न कोप,**—प्रभो-हे निग्रहानुग्रह समर्था, ज्या परी-जसा, पशुपपाल, - पशुप - गौळी, त्याचा ' पाल- पालक- अर्थात् नंद, तुज वर एक क्षणभर हि रागें भरला नाहीं; तसें तूं हि ' **भजकबालकोपेक्षण कधीं न करिसि,**— भजकबालकोपेक्षण,-भजक- भजणारा- अर्थात् तुझी सेवा करणारा, जो ' बालक-अज्ञजन त्याचें ' उपेक्षण- उपेक्षा, तूं कदापि करणार नाहींस; सारांश गोकुळांत त्वां बाळपणीं पुष्कळ खोडी केल्या तथापि तुझा पिता नंद तुज वर एकदां-हि रागें भरला नाहीं, तसें आह्मीं कितीहि तुझे अपराध केले तथापि तूं आह्मां अज्ञजनाची उपेक्षा कदापि करणार नाहींस; असा एथील भावार्थ समजावा.

खराजनकतूंजनाइतरकोणहोदेववी ॥
समीहितफळेंजगातवपदाब्जदेदेववी ॥
अशीचकरुणाअसोहरिकधींनभंगोपिता ॥
अशामजअसाधुलाइतरकोणसंगोपिता ॥ ९३ ॥

भगवंताचें सदय पितृत्व वर्णित होत्साते पुनः कवि ह्मणतात.

**पदान्वय—** तूं खरा जनक, इतर कोण हो देव जनावी, तव पदाब्ज जगा समीहित फळें दे देववी; हरि अशीच करुणा असो, पिता कधीं न भंगो, अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता.

**तूं खरा जनक,—** तूंच या विश्वाचा खरा- वास्तव, जनक- उत्पादक- पिता, आहेस; कारण तुज शि-वाय **इतर कोण हो देव जना वी,—इतर कोण हो-** दुसरा कोणता हो, देव, जना- या जनाला, वी- वितो- अर्थात् व्यायास ह्मणजे उत्पन्न करायास समर्थ होतो; सारांश तुज शिवाय दुसरा या जगास कोणी जनक नाहीं; त्वां या जगास नुसतें निर्माण केलें इतकेंच नाहीं तर **तव पदाब्ज जगा समीहित फळें दे देववी,— तव पे-** दाब्ज- तुझें चरणकमल; जगा- या त्वन्निर्मित जनाला- त्वां उत्पन्न केलेल्या प्राणिमात्राला, समीहित फळें- त्यांच्या त्यांच्या कर्मांचीं समीहित- इष्ट- योग्य, अशीं फळें- ऐहिक आमुष्मिक सुखादि, दे- देतो, आणि देववी-

आपण

आपण सूत्रधारा प्रमाणें अंतस्थ दडून राहून इतर मनुष्यदे- -वादिकांस निमित्त करून त्यांज कडून देववितो; इतर प्राकृत जनकाचें असें फल देण्याचें सामर्थ्य नाहीं ह्मणून खरा जनक तो तूंच असा एथाल भावार्थ जाणावा. पुनः प्रार्थ- नापूर्वक क व ह्मणतात **हरि अशीच करुणा असो,—** हरि- हे हरि- हे भक्ततापत्रयनिवारका, अशीच तुझी आह्मा दीना वर करुणा- दया, असो; **पिता कधीं न भंगो,—** बाप कधींहि, न भंगो- नतुटो- अर्थात् तुझा पितृस्नेह नतुटो; माझें पातित्य मनांत आणून जर त्वां हा स्नेह तोडिला तर **अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता,—** अशा मज असाधुला- असा मीं जो असाधु- अभक्त- पापी, त्या मला तुज वांचून इतर कोण संगोपिता- दुसरा कोण, संगोपिता- संगोपन कर्त्ता- रक्षण कर्त्ता; अथवा, संगोपिता ह्मणजे माझ्या दोषा वर आच्छादन घालून क्षमा करणारा आहे; अर्थात् आपल्या लेंकरांचे दोष झांकून त्यांस क्षमा करणारा बापा शिवाय दुसरा कोणी दयालु नाहीं, ह्मणून तो नभंगो असा एथें अर्थान्वय.[1]

---

१ तुकोबानेंहि पुत्रा विषयीं पितृस्नेह कसा असतो हें खालीं सांगित- ल्या अभंगांत सरस वर्णिलें आहे; —

बापकरीजोडीलेंकराचेवोढी आपुलीकरवंडीवाळऊनी ॥ १ ॥
एकाएकींकेलींमगासिचाधणी काडियेवाहूनीभारखांदीं ॥२॥
घालुनीयापाहेडोळांअलंकार ठेवादावीथोरकरूनीयां ॥ ३ ॥
तुकाह्मणेनेदिगांजूंआणिकांसी उदारजिवासीआपुलीया ॥४॥

सुविद्यधनमेळवीवचनआइकेआवरी ॥
प्रपंचभरघेशिरींकरिकृपापितात्यावरी ॥
असाजरिनसेरुचेतरिनतोअभद्रक्षण ॥
तसातुजाचिआवडेकरिसितूंचितद्रक्षण ॥ ९४ ॥

गुणवान पुत्र असला तरच पित्यास आवडतो, ह्मणून पित्यापेक्षांहि भगवान अधिक दयालु असा अभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— सुविद्य धन मेळवी, वचन आइके, आवरी, प्रपंचभर शिरीं घे, त्या वरी पिता कृपा करि; जरि असा नसे तरि तो अभद्र क्षण न रुचे; तसा तुजचि आवडे, तूंचि तद्रक्षण करिसि.

**सुविद्य धन मेळवी,**—सुविद्य- चांगली आहे विद्या ज्यास तो- अर्थात् ज्याणें चांगला विद्याभ्यास केला आहे- विद्वान् असा, आणि ' धन मेळवि- धन मिळवितो-द्रव्य संपादन करणारा असा; अथवा, सुविद्य असून धन मेळविणारा असा; आणि ' **वचन आइके,**- वचन आइके-वचन ऐकतो; अर्थात् बाप जें जें सांगतो, तें तें ऐकून तसतसें करितो असा; आणि ' **आवरी**— आवरितो- अर्थात् आपल्या बापाचे सर्व व्यवहार आवरणारा-संसार खटलें आटोपणारा असा; आ-णि ' **प्रपंचभर शिरीं घे,**- प्रपंचभर- प्रपंचाचा भर-भार- संसाराचें ओझें, शिरीं- माथ्या वर, घे-घेतो; अर्थात् बापाच्या संसाराचें सर्व ओझें आपल्या माथ्या वर घेणारा-

बापाचा

बापाचा संसार पुढें होऊन आपण स्वतः चालविणारा असा; त्या वरी पिता कृपा करि,— अशा गुणवान् पुत्रा वरच बाप कृपा करितो; अर्थात् असा जर गुणवान् पुत्र असला तरच तो बापास आवडतो; परंतु ✓ जरि असा नसे तरि तो अभद्र क्षण न रुचे;— जर असा गुणवान् नसला तर तो, अभद्र - करंटा, ह्मणून ✓ क्षण - क्षणभरहि, न रुचे - त्यास आवडत नाहीं; परंतु बापास जरीं आवडत ना--हीं तरीं ✓ तसा तुजाचि आवडे,— तसा - एतद्गुणर--हित करंटा पुत्र, तुलाच आवडतो; कारण तूं अशा वरहि कृपा करितोस; आणि ✓ तूंचि तद्रक्षण करिसि,— तूंच त्याचें रक्षण करितोस - गुणरहित ह्मणून त्याचा त्याग नकरितां उलटें त्याचें तूं रक्षण करितोस: तस्मात् बापा पेक्षांहि तूं अ-धिक दयालु होस असा एथें ध्वनितार्थ जाणावा. हा एथें व्यतिरेक अलंकार होय.

**पिताजरिंविटेविटोनजननीकुपुत्रींविटे ॥**
**दयामृतरसार्द्रधीनकुलकज्जलेंत्याकिटे ॥**
**प्रसादपटझांकितीपरिपरागुरूचेथिटे ॥**
**ह्मणूनिह्मणतीभलेनऋणजन्मदेचेंफिटे ॥ ९५ ॥**

बापाच्या प्रीती पेक्षां आईची प्रीति अधिक असें विधा-न करित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** पिता जरिं विटे विटो, जननी कुपुत्रीं न विटे, दयामृतरसार्द्रधी त्या कुलकज्जलें न किटे, परा गुरूचे प्र-सादपट झांकिती परि थिटे, ह्मणूनि जन्मदेचें ऋण न फिटे भले ह्मणती.

**पिता जरिं विटे विटो,—** बाप जरीं, कुपुत्रा विष-यीं विटे- विटला- कांटाळला, तरीं विटो- कांटाळो; प-रंतु **जननी कुपुत्रीं न विटे,— जननी**- आई, कुपुत्रीं- कुपुत्रा विषयीं- दुर्गुणी मुला विषयीं, **न विटे**- विटत नाहीं- आपल्या मनांत त्याचा त्रास घेत नाहीं; **दयामृतरसार्द्रधी त्या कुलकज्जलें न किटे,**- दयामृतरसार्द्रधी,- दयारूप जो अमृतरस,-तेणें करून आर्द्र-ओली, आहे धी- बुद्धि, जिची अशी,-अर्थात् दयेनें जिचे अंतःकरण ओलें झालें आहे अशी, सारांश परम दयालु अशी, जी जननी-आई; अथवा, त्या जननीची दयामृतरसार्द्रधी,- दयेनें ओली झालेली जी बुद्धि ती, **त्या कुलकज्जलें,**- तो जो कुलकज्जल- कुळाचें काजळ- आपल्या दुर्गुणानें काजळा सारिखा कुळास काळा डाग लावणारा पुत्र, त्याणें, ( करणी तृतीया ), **न किटे**- म-ळत नाहीं- मलिन होत नाहीं- अर्थात् त्या विषयीं स्वच्छ

ह्मणजे प्रसन्नच असत्ये; **परा गुरूचे प्रसादपट झांकिती परि थिटे,**— **परा गुरूचे,-पर-** पहिला- अर्थात् पहिल्यानें सांगितलेला-मागल्या दोन केकांत सांगितला जो बाप; अथवा, **पर** ह्मणजे श्रेष्ठ, त्या **गुरूचे**- बापाचे, **प्रसादपट,- प्रसाद-** प्रसन्नता, तद्रूप जे **पट**- वस्त्रें- आच्छादनें, अर्थात् प्रसन्नतापूर्वक घातले जे आच्छादनरूप पट ते, **झांकिती-** झांकितात- अर्थात् आपल्या लेंकराचे दोष झांकितात, **परि-** परंतु, **थिटे**- तोकडे- आंखुड; सारांश पित्याचे क्षमापट स्वापत्याचे दुर्गुण झांकितात खरे, परंतु ते झांकायास ते त्याचे क्षमापट आंखूड पडतात; अथवा, एथें **प्रसाद** हा शब्द निराळा करून, '**परा गुरूचे प्रसाद**'- पित्याचे प्रसाद, '**पट झांकिती**'- वस्त्रें झांकितात[1] अर्थात् वस्त्रानें स्वापत्याचे दुर्गुण अथवा अपराध झांकितात; सारांश, पिता स्वापत्याच्या दुर्गुणाची क्षमा करितो खरा, परंतु माते प्रमाणें पूर्ण क्षमा करित नाहीं; **ह्मणून जन्मदेचें ऋण न फिटे भले ह्मणती,** —**ह्मणून**-बापा पेक्षां आई अधिक क्षमाशील आहे या कारणा स्तव, **जन्मदेचें,-जन्मदा-** जन्म देणारी- जननी- आई, तिचें, **ऋण**- रीण, **न फिटे**- फिटत नाहीं, असें **भले**- विचारशील पुरुष, **ह्मणती**-ह्मणतात; एथें पंतानीं **जन्मदा** पद ठेविलें आहे तें इतर सापत्नादि मातांच्या व्यावृत्त्यर्थ. बापाच्या ऋणापासून मुक्ति होत्ये, परंतु आईच्या ऋणा पासून होत नाहीं, ह्मणून विचारी पुरुष जें ह्मणतात तें खरें आहे.

---

१ क्वचित बोलण्याच्या झपाट्यांत 'झांकणे' या क्रियापदाच्या योगानें करण चें कर्म होतें—' पात्रा वर पान झांक' ह्मणजे 'पानानें पात्र झांक' असा अर्थ;— एथें झांकणें ह्मणजे आच्छादन ठेवणें असा एकदेशी अर्थ जाणावा.

विटेलजननीहिकींशतरचीनिमित्तेंविधी ॥
मळेकलियुगींश्रुतीजशिखळींतिचीतेविधी ॥
कदाचिन्नविटेलबातवदयानदीनावरी ॥
जशीजगदघक्षयींकरभवन्नदीनावरी ॥ ९६॥

माते पेक्षांहि भगवान् अधिक दयालु आहे असा स्वाभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय** — जननी हि विटेल कीं, विधी शत निमित्तें रची, जशि कलियुगीं श्रुती मळे तिची खळीं तेवि धी, बा जशी जगदघक्षयीं भवन्नदी कर नावरी, दीना वरी तव दया कदाचित न विटेल.

**जननी हि विटेल कीं,*** — मागील केकेंत सांगितलेली दयामृतरसार्द्रधी अशी जननी- आई, हि, **विटेल कीं**- त्रास पावेल कीं- अर्थात् खचितें त्रास पावेल; कारण **विधी शत निमित्तें रची,**—विधी- विधि-विधाता- ब्रह्मा, अर्थात् प्राक्तन कर्म, शत-शेंकडो, निमित्तें, रची-रचितो; अर्थात् अशी जरी स्वभावतः पुत्रा विषयीं दयालु जननी असल्ये तथापि प्राक्तन कर्म शेंकडों निमित्तें उपस्थित करून तिच्याहि मनांत त्या पुत्रा विषयीं विट आणील; यास दृष्टांत **जशि कलियुगीं श्रुती मळे, तेवि तिची खळीं धी,**- जशी या कलयुगा मध्यें, श्रुती- वेद, **मळे**- मलिन होतात, **तेवि**- तशी, **तिची**- त्या आईची, **खळीं**- त्या खल पुत्रा

विषयीं

---

* एथें 'कीं' हें निश्चयार्थी अव्यय जाणावें.

विषयीं- तो पुत्र खल झाला तर त्या विषयीं, **धी-** बुद्धि, मलिन होत्ये; अर्थात् विटत्ये; यास्तव **बा जशी जगदघक्षयीं भवन्नदी कर नावरी,— बा-** बापा, त्या प्रमाणें, जगदघक्षयीं,- जगत्- विश्व, तत्संबंधी **अघ-** पाप, त्याचा **क्षय-**नाश, त्या विषयीं, **भवन्नदी**-तुमची नदी- अर्थात् भागीरथी, **कर**-हात, **नावरी**-आवरित नाहीं-आटोपित नाहीं; अर्थात् पापाचा क्षय करण्यां विषयीं जशी भागीरथी मागें हटत नाहीं; त्या प्रमाणें **दीना वरी तव दया कदाचित न विटेल,—दीना वरी**-अनाथ जना वर, **तव दया**-तुझी दया, **कदाचित-** कदापि, **न विटेल-** विटणार नाहीं- अर्थात् न्यून होणार नाहीं; सारांश आईहि कदाचित् पुत्रा विषयीं निर्दय होईल, परंतु तुझी दया दीना वर कदापि न्यून होणार नाहीं.

**कृपाचिजननीतुझीसकलजीवदायाद्या ॥**
**तिणेंचिउपदेशिल्याकरितिसर्वदायादया ॥**
**असेंउमजतांभलेनगुरुभावतोटाकिती ॥**
**मतातुजहिगोपिकामगजनासतोटाकिती ॥ ९७ ॥**

भगवद्दया हीच वास्तविक जननी असा स्वाभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय** —तुझी कृपाचि जननी, या सकल जीव दायाद, तिणेंचि उपदेशिल्या सर्व दाया दया करिति, असें उमजतां भले तो गुरुभाव न टाकिती, तुजहि गोपिका मता, मग जनास तोटा किती.

**तुझी कृपाचि जननी,**— कवि भगवंतास ह्मणतात तुझी कृपाचि वास्तविक आई; अर्थात् इतर आया जन्मदेणाऱ्या मात्र, परंतु वास्तविक आई ह्मटली ह्मणजे तुझी कृपाच; आणि **या सकल जीव दायाद,**—**या**- या तुझ्या कृपेला, **सकल जीव**- सर्व हे प्राणिमात्र, **दायाद**- अंशहारी- वारिसदार- वांटेकरी; अर्थात् सकलभूतमात्र तुझ्या कृपेचे वांटेकरी होत; विशेष काय सांगावें **तिणेंचि उपदेशिल्या सर्व दाया दया करिति,**—**तिणेंचि**- त्या तुझ्या कृपेनेंच, **उपदेशिल्या**- उपदिष्ट केल्या होत्सातां- शिकविल्या असतां, **सर्व**- या सृष्टींत ज्या, **दाया**- उपमाता ह्मणून आहेत त्या सर्व, **दया करिती**-आपल्या बालकां वर दया करितात; अर्थात् तुझ्या कृपेचा उपदेश आहे ह्मणूनच इतर सर्व दाया आपआपल्या रक्षणीय बालकां वर दया करितात; सारांश त्यांच्या ठायीं जी दयोत्पत्ति ती त्वत्कृपामूलक; **असें उमजतां**

भले

**भले तो गुरुभाव न टाकिती,—** असें समजत असतां, भले- विचारशील पुरुष, **तो गुरुभाव**-तो जननीभाव-आई पणा, **न टाकिती**, टाकित नाहींत- नाकारित नाहींत- नाहीं ह्मणून ह्मणत नाहींत- ह्मणजे दायांच्या ठायीं मातृभावाचा प्रतिषेध करित नाहींत; अथवा, **गुरुभाव**,- गुरु आई,- तिच्या ठायीं भाव- श्रद्धा- भक्ति, ह्मणजे जननीच्या ठायीं जी आपली मातृविषयक भक्ति, ती टाकित नाहींत; सारांश भगवत्कृपाच श्रेष्ठ इतकें ह्मणून आपल्या आई विषयीं आपला पुत्रधर्म टाकित नाहींत; उलटे ही आमची जननी साक्षात् मूर्तिमंत भगवत्कृपाच होय असें समजून अधिक मातृभक्त होतात; अथवा, **भले**- विचारशील जन, तो आपला गुरुभाव- मातृभाव,- आईपणा- आई सारिखी चित्ताची स्नेहार्द्रता, टाकित नाहींत; हें तुह्मींच पहा कीं **तुज हि गोपिका मता,—** तुज हि- तुलाहि, **गोपिका**- अर्थात् यशोदा, **मता**- मान्य, अशी होती; अर्थात् कवि भगवंतास ह्मणतात किं कृष्णावतारीं त्वांहि यशोदा तुझी- उपमाता असतां तीस जननी मानून तिच्या ठायीं मातृविषयक जी तुझी प्रीति तींत त्वां कांहीं न्यूनता केली नाहीं. एथें **'गोपिका'**या शब्दाचा निवेश पूर्वोक्त दायीपणाचा सूचक जाणावा. **मग जनास तोटा किती,—**मग, जनास-इतर जनास- अशा त्वदितर मातृभक्तांस, **तोटा किती**-तोटा थोडाच; अर्थात् तूं जेव्हां यशोदे विषयीं इतका कनवाळु तेव्हां इतर जन सहाजिक आपल्या आयां विषयीं कनवाळु असतील; मग अशां जनाचा तोटा असलाच तर तो अगदीं थोडा; तेव्हां अर्थात् सर्व हीं तुझीच दया असा एथील भावार्थ मला दिसतो.

भरोनिकुचकुंभजीविषरसेंमुखींदेबकी ॥
प्रभोतिसहिठेविशीजशिमहासुखींदेबकी ॥
नहोतिजननीकशापशुंपदारगाईलया ॥
नपावतिलतत्सुखेंकृतिनकोणगाईलया ॥ ९८ ॥

मागील केकेंत सांगितली जी तुझी उपमाता यशोदा तिच्या विषयीं त्वां आपला पुत्रधर्म प्रकट केला यांत आश्चर्य तर आहेच, परंतु मातेच्या सोंगानें तुझ्या नाशार्थ जिणें तुला विषाचें स्तनपान दिलें अशी जी पूतना तिलाहि त्वां मुक्त केलें यांत विशेष आश्चर्य, असा स्वाभिप्राय कथित होन्सातें कवि ह्मणतात.

**पदान्वय**— प्रभो जी बकी विषरसें कुचकुंभ भरोनि मुखीं दे, तिस हि महा सुखीं ठेविशी जशि देबकी, तत्सुखें पशुपदार जननी कशा नहोति, गाई लया न पावतिल, कोण या कृति न गाईल.

**प्रभो जी बकी विषरसें कुचकुंभ भरोनि मुखीं दे,**— हे **प्रभो**- हे समर्था-हे दयाळो, **जी बकी**-जी पूतना, **विषरसें**-विषयुक्त रसानें-अर्थात् दुग्धानें, **कुचकुंभ**,-आपले[1] कुचकुंभ-कुचरूप कुंभ-घट,-अर्थात् मोठे स्तनें,-भरून, ते स्त

न

[1] स्तनाचें स्थौल्य आणि वर्तुळाकार दाखविण्या करितां त्यांस कलशाची अथवा कुंभाची अथवा कमंडलूची उपमा देण्याचा प्रचार या देशांतील कवीं मध्यें फार आढळतो. शृंगारशतकांत भर्तृहरीनें ह्मटलें आहे,—

सदायोगाभ्यासव्यसनवश्योरात्ममनसो-।

रवि

न तुझ्या मुखीं-मुखांत, दे- देती झाली; एथें आणखी विषरस भरण्यास स्तनाच्या ठायीं कुंभत्वारोप कवीनें सहेतुक योजिला आहे. सारांश आपल्या स्तनांस विष लावून जिणें तुझ्या नाशार्थ ते स्तन बाळपणीं तुझ्या मुखांत घातले अशी जी पूतना; **तिस हि महा सुखीं ठेविशी जशि देवकी,—** तिलाहि, महा सुखीं,- महा सुख - कैवल्य- मोक्ष- सायुज्यता मुक्ति तींत, ठेविशी- ठेविता झालास, जशि देवकी- जशी देवकी ठेविली तशी; सारांश जें कैवल्यसुख साक्षात् जननी देवकीस दिलें तेंच सुख कपटानें दाई होऊन तुझ्या नाशास प्रवृत्त झाली जी पूतना तीसहि दिलें. यांत भगवंताचें अत्यंत दयालुत्व प्रकट होऊन द्वेषबुद्धयाभावहि ध्वनित होतो.[2] आणखी कवि ह्मणतात **तत्सुखें पशुपदार जननी कशा न होति,—** तत्सुखें- त्या कैवल्यसुखानें-, अर्थात् त्वां दिलेल्या कैवल्यसुखानें, पशुपदार, -पशुप-पशु पाळणारे-गोप-गौळी

---

रविच्छिन्नामैत्रीस्फुरतियमिनस्तस्यकिमुतैः ॥
प्रियाणामालापैरधरमधुभिर्वक्त्र विधुभिः ।
सनिश्वासामोदैःसकुचकलशाश्लेषसुरतैः ॥ ९९॥

१ एथें देवकी या शब्दात 'बवयोः सावर्ण्य' या नियमा वरून व च्या स्थानीं ब मानिला असतां वरील चरणांतील शेवटल्या चार वर्णांचे प्रास साधून वर्णव्यत्यरूप दोष येत नाहीं. त्यांत आणखी कृष्णाच्या बालपणीचें लीलास्थान जें गोकुल वृंदावन त्यां मोठया प्रांतांत तर देवकी असेंच ह्मणतात देवकी कोणी ह्मणत नाहीं.

रलयोर्डलयोश्चैवशषयोर्बवयोस्तथा
वदंत्येषांचसावर्ण्यमलंकारविदोजनाः

२ पहा टीप १, पृ० ३०६.

गौळी, यांच्या' **दार- स्त्रिया**-अर्थात् गोपी, गोकुळांत' **ज-
ननी- आया**- अर्थात् तुझ्या आया, **कशा न होति**,- अर्थात्
होतीलच होतील; आणि' **गाई लया न पावतिल**,—गाई-
त्या गोकुळांतल्या गाई, लया- मोक्षास, **न पावतिल**- कशा
न पावतील ? अर्थात् पूर्व संबंधानें पावतीलच पावतील
असा अर्थ; सारांश, नंद यशोदा आणि वसुदेव देवकी यांस
जसें कैवल्यसुख त्वां दिलें, त्याच प्रमाणें सर्व गोकुळाचा-
हि त्वां उद्धार केला, तेव्हां त्यांतील यशोदे प्रमाणें
तुझें लालन पालन करणाऱ्या, गौळणी तुझ्या जननी
कशा न ह्मणाव्या, आणि पशु गाईहि सद्गतीस गेल्या
नाहींत असें तरी कसें ह्मणावें; सारांश सर्व प्राण्या सहवर्तमान
व्रजवासी जन त्वां सद्गतीस नेले;[1] मग' **कोण या कृति
न गाईल**,— कोण या तुझ्या अशा पुण्य, कृति- चरित्रें
गाणार नाहींत? अर्थात् सर्व जन हीं तुझीं अशीं यशस्वी चरित्रें
गातील यांत संशय नाहीं.

---

१ या प्रमाणें भागवतांत सर्व व्रजवासी प्राण्याचें भाग्य वर्णिलें आहे;-

अहोऽतिधन्याव्रजगोरमण्यः ।
स्तन्यामृतंपीतमतीवतेमुदा ॥
यासांविभोवत्सतरात्मजात्मना ।
यत्तृप्तयेऽद्यापिनचालमध्वराः ॥ ३१ ॥
अहोभाग्यमहोभाग्यंनंदगोपव्रजौकसाम् ।
यन्मित्रंपरमानंदंपूर्णंब्रह्मसनातनम् ॥ ३२ ॥

भाग०, स्कं० १०, अ० १४

**अशीतरिकृतज्ञताहरितुझ्याचठायींअगा ॥**
**सख्याअणुचिमानिशीकरुनिसुप्रसादाअगा ॥**
**भुलेसुकविवाग्वधूतवगुणाअनर्घ्यानगा ॥**
**ह्मणेलजनकोणकींयशपुनःपुन्हातेंनगा ॥ ९९ ॥**

मागील केकेंत पशु सुद्धां सर्व व्रजवासी जनांचा भगवं-तानें उद्धार केला ह्मणून सांगितलें, ती भगवत्कीर्ति वर्णित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय—** अगा हरि अशी तरि कृतज्ञता तुझ्याच ठायीं, सख्या सुप्रसादा करूनि अगा अणुचि मानिशी; तव अनर्घ्या गुणा नगा सुकविवाग्वधू भुले, तें यश पुनःपुन्हा कोण जन न गा ह्मणेल कीं.

**अगा हरि अशी तरि कृतज्ञता तुझ्याच ठायीं,-** अगा हरि- हे हरि- हे मनमोहना, 'अशी तरि **कृतज्ञ-ता,- अशी-** बालपणीं गोकुलांत तुझें पालन झालें इत-क्या' वरून त्वां पशु सुद्धां सर्व गोकुल उद्धरिलें अशी, तरीं, तुझी **कृतज्ञता** - प्रत्युपकार करण्याची बुद्धि, **तुझ्याच ठायीं**- तुझ्यांतच, आढळत्ये; अर्थात् तुज शिवाय इतर को-णाच्यानीं असा प्रत्युपकार करवणार नाहीं; कांकीं **सख्या सुप्रसादा करुनि अगा अणुचि मानिशी,—** हे स-ख्या- हे प्राणवल्लभा, **सुप्रसादा करुनि**- सुप्रसादाला करून- मोठा प्रसाद करून- अर्थात् आश्रितांच्या इच्छे पेक्षां त्यांस अधिक देऊन, **अगा**- पर्वताला, **अणुचि**- अणूच- यत्किंचित रजःकणच, **मानिशी**- मानितोस;[1] सारांश आप-ल्या

[1] एथें' अणूचि मानिशी करुनि सुप्रसादा अगा' अशी वाक्यरचना करून

त्या भक्तां वर पर्वता इतका मोठा उपकार करून त्या काहीं-च केलें नाहीं असें आणखी मानितोस. हा तुझा असा अपूर्व गुण पाहून, **तव अनर्घ्या गुणा नगा सुकविवाग्वधू भुले,— तव**- तुझ्या, **अनर्घ्या गुणा नगा,- अनर्घ्या**- अमुल्य- अमोलिक अशा, **गुणा**- गुणरूप, अथवा गुण हाच कोणी त्या, **नगा**-अलंकाराला, **सुकविवाग्वधू,-सुक-वि**- रसज्ञ कवि-व्यासवाल्मीकादि भगवद्गुणवर्णनपरसत्काव्य-कर्ते, अथवा, ज्ञाते, त्यांची, **वाग्वधू,- वाक्**- वाणि, तद्रू-पा जी, वधू - नवरी, **भुले** -भुलत्ये - मोहित होत्ये; अर्थात् या तुझ्या अशा अपूर्व गुणाला सुकवि जे व्यासवा-ल्मीकादि त्यांची वाणि मोहित होत्ये; ह्मणून, **तें यश पुनःपुन्हा कोण जन न गा ह्मणेल कीं,— तें यश-**तें सुकवीच्या वाणीस भुलविणारें, **यश**- तुझी कीर्ति, **पुनःपु-न्हा**-वारंवार, **कोण जन, न गा**-गाऊं नको, **ह्मणेल कीं**- ह्मणेल काय? अर्थात् कोणी ह्मणणार नाहीं; तें तुझें यश वारंवार गा असेंच ह्मणेल. यांत तिसऱ्या चरणांत भग-वद्गुणास अलंकाराची उपमा, आणि सुकवीच्या वाणीस वधूची उपमा, अभेदरूपानें दिली आहे ह्मणून हा रूपक अलंकार होय.

---

करून अर्थयोजना केली असतां ती थोडी अपूर्व अशी होईल. 'सुप्रसादा अगा' या शब्दांत उपमानोपमेयसंबंध दिसतो, विशेषणविशे-ष्यभावसंबंध दिसत नाहीं; असें असतां 'सुप्रसादा' या विशेष्यवाचक शब्दा-चें विशेषणा प्रमाणें सामान्यरूप केलें आहे, किंवा सभक्तिक रूप केलें आहे, हें व्याकरणनियमास विरुद्ध. ह्मणोन सुप्रसादें हें करून या धातु-साधिताचें कर्म करूनं, अगा हें मानिशी या क्रियापदाचें कर्म करावें ह्मणजे या विरोधाचा परिहार होतो. 'तुह्मीं माझ्या पर्णकुटींत येऊन माझ्या झो-पडीस राजमंदिराची शोभा आणिली,' या वाक्या प्रमाणें हें वाक्य जाणावें.

तुह्मींबहुभलेमलाउमजहोयऐसेंकथा ॥
कसारसिकतोपुन्हाजरिंह्मणेलआलीकथा ॥
प्रतिक्षणनवीचदेरुचिशुकाहिसन्यासिया ॥
नमोहितिभवत्कथाअरसिकाअधन्यासिया॥१००॥

मागील केकेच्या शेवटीं कवीनीं भगवद्यशवर्णना विषयीं आपली मनीषा इंगित केली, ती पूर्ण करण्या करितां प्रार्थित होत्साते प्रथमतः पुढल्या चवदा केकांत ते भगवत्कथेची प्रशंसा करितात.

**पदान्वय—** तुह्मीं बहुभले मला उमज होय ऐसें कथा, पुन्हा कथा आली जरिं ह्मणेल तो रसिक कसा, सन्यासिया शुकाहि प्रतिक्षण नवीच रुचि दे, या अरसिका अधन्यासि भवत्कथा न मोहिति.

**तुह्मीं बहु भले मला उमज होय ऐसें कथा,—** **तुह्मी बहु भले-** तुह्मीं फार दयालु अहां, या कारणा स्तव **मला उमज होय ऐसें-** मला उमज होईल असें, **कथा-** सांगा; अर्थात् तुमचें यश कसें वर्णावें तें मला शिकवा. कदाचित् तुह्मीं ह्मणाल कि इतकें वर्णन केलें आतां आणखी माझें काय वर्णन करितोस तर **पुन्हा कथा आली जरिं ह्मणेल तो रसिक कसा,—** **पुन्हा कथा आली-** एकदां वर्णिलेलें तुमचें चरितकथन, मात्स्यानें करणें आलें, असें **जरिं-** जर, **ह्मणेल-** कोणी ह्मणेल, तर **तो रसिक कसा-** तर तो, **रसिक-** रसज्ञ, **कसा-** कसा

ह्मणावा; अर्थात् त्यास रसिक ह्मणूं नये; सारांश जो अरसिक असेल तोच असें ह्मणेल किं एकदां वर्णिलेली भगवत्कथा पुनः वर्णन करणें आली; कारण तुमची कथा अशी रस-भरित आहे किं' **सन्यासिया शुकाहि प्रतिक्षण नवीच रुचि दे,**— **सन्यासिया**- सर्वसंगपरित्यागी अशा, **शुकाहि**- शुक- व्यासपुत्र मुनीलाहि, **प्रतिक्षण**- क्षणोक्षणीं, **नवीच रुचि दे**- नवीच रुचि देती झाली;[१] अर्थात् सन्याशा शुकाला जिणें मोहिलें मग इतरांस मोहील यांत आश्चर्य काय? परंतु' **या अरसिका अधन्यासि भवत्कथा नमोहि-ति,**— **या अरसिका**- ह्या जो तुझी कथा पुनः आली ह्मणणारा अशा, **अरसिका**- त्वत्कथारसानभिज्ञा- तुझ्या कथेची गोडी ज्यास लागत नाहीं अशा, **अधन्यासि**- अधन्याला-करंट्याला, **भवत्कथा**-तुझी कथा, **न मोहिति**- मोहित नाहीं- त्याचें दुष्ट अंतःकरण वंश करित नाहीं; सा-रांश जो रसिक आणि ज्ञानी आहे त्याला तुझे गुणानुवाद वारंवार वर्णावेसे वाटतात, परंतु जो अरसिक दुर्वृत्त आणि हतभाग्य आहे त्यास मात्र ते रुचत नाहींत, असा एथील भावार्थ जाणावा.

---

१ भागवतांतहि भगवत्कथा प्रतिपदीं नवी नवी रुचि देत्ये ह्मणून वर्णिलें आहे;—

वयंतुनचतृप्यामउत्तमश्लोकविक्रमे ।
यच्छृण्वतांरसज्ञानांस्वादुस्वादुपदेपदे ॥

भाग० १; अ० १, श्लो० १९.

कथाश्रवणचत्वरींजरिपुनःपुन्हायेरते ॥
महारसिकतद्रसींविटतिऐकतांयेरते ॥
विलोकुनिविलासिनीजनपुनःपुन्हाकामुका ॥
करीवशनव्हेबुळाविवशघेइनाकामुका ॥ १०१ ॥

भगवत्कथेची प्रशंसा चालू

**पदान्वय**—कथा श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये, महा रसिक तद्रसीं रते, येर ते ऐकतां विटति; विलासिनीजन कामुका पुनःपुन्हा विलोकुनि वश करी; मुका का घेइना, बुळा विवश नव्हे.

**कथा श्रवणचत्वरीं जरि पुनः पुन्हा ये,— कथा**- अर्थात् भगवत्कथा, श्रवणचत्वरीं,- श्रवण- कर्ण, तद्रूप चत्वर- अंगण, त्याच्या ठायीं,- कर्णांगणीं- अर्थात् कर्णप्रदेशाच्या ठायीं, **जरि**- यद्यपि, **पुनःपुनः**, **ये**- आली; सारांश भगवत्कथा जरीं वारंवार श्रवणविषय झाली; तथापि **महा रसिक तद्रसीं रते,—महा** रसिक- मोठा रसज्ञ, परमार्थजिज्ञासु, अर्थांतरीं शृंगारहास्यादि- -रसज्ञ, **तद्रसीं**- त्या भगवत्कथेच्या **रसीं**- त्या कथेच्या कारुण्यादि रसांत, अर्थांतरीं शृंगारादि रसांत, **रते**- रततो- त्या कथारसाची रुचि अनुभवितो, अर्थांतरीं **रमतो**-शृंगारादि रसांत रममाण होतो; परंतु **येर ते ऐकतां विटति;—येर**- तदितर- दुसरे- अर्थात् दुर्वृत्त- पापीजन, अर्थांतरीं शृंगा-

राादिरसानभिज्ञ

१ गृहावग्रहणीदेहल्यंगणंचत्वराजिरे. अमर.

-रादिरसानभिज्ञ- अरसिक; जे ते ऐकतां- ती भगवत्कथा ऐकल्यानें, विटति- विटतात- कंटाळतात; यास दृष्टांत विलासिनीजन कामुका पुनः पुन्हा विलोकुनि वश करी,— विलासिनीजन- शृंगारादिरसाभिज्ञा नायिका, कामुका- कामी- आपल्या ठायीं ज्याचा अत्यंत अभिला-ष आहे अशा नायकाला, पुनः पुनः, विलोकुनि- पाहून- अर्थात् चोर दृष्टीनें अवलोकन करून, वश करी-वश करून घेत्ये- मोहित करून आपलासा करित्ये; परंतु मुका का घेइना,— मुका का घेइना -चुंबन कां करिना- अर्थात् जरीं चुंबनादि हाव केले, तथापि बुळा विवश नव्हे,— बुळा- षंढ, विवश- विशेषेंकरून वश- अर्थात् जसा पाहिजे तसा वश, होत नाहीं; अर्थात् षंढानें जरीं चुंबन केलें तरीं तो विलासिनी जनास वश होण्यास समर्थ होत नाहीं. या दृष्टांताचें तात्पर्य हेंच कि षंढानें चुंबन जरीं केलें तरीं चतुर स्त्रीस जसा त्याच्यानें संतोष करवत नाहीं, तशी अरसिक अश्रद्धालु पुरुषानें भगवत्कथेस जरीं लोकस्फीती करितां मान डोलविली, त-रीं तिची वास्तविक रुचि त्यास नलागून ती त्यास आ-ल्हादकारक होत नाहीं. या केकेंत कथा या उपमेयाचें, आणि विलासिनी नायिका या उपमानाचें, श्रवणविषय होणें, आणि चत्वरीं आविर्भूत होणें, इत्यादि धर्मांचा बिंबप्रतिबिंबभाव फार सुंदर रीतीनें दाखविला आहे, ह्मणून हा दृष्टांत अलंकार होय. तसेंच चत्वरीं पुनःपुनः

येण्यानें

येण्यानें भगवत्कथेच्या पुनःपुनः वर्णनांचें अपूर्वरुचिमदत्वहि ध्वनित होतें.

यद्यपि एथें भगवत्कथेस विलासीनीची उपमा देऊन पुनः पुनः चत्वरागमनादिधर्मेंकरून उपमानोपमेयाचें साधर्म्य वर्णन केलें आहे तें कित्येक रसिकांस अप्रशस्त दिसेल, तथापि एत-द्देशीय कविरुच्यानुरूप ही केका मोठी सरस ह्मटली पाहिजे.

**कथासुपुरुषातुझीवशतशीकरीराधिका ॥**
**जशीतुजजिलास्वयेंह्मणसितूंशरीराधिका ॥**
**तिचेंनघडतांरमात्हृदयवल्लभासेवन ॥**
**प्रभोतुजजसेंतसेंमतिसगेहभासेवन ॥ १०२ ॥**

सत्पुरुषासच भगवत्कथा वश करित्ये ह्मणून मागील कें-केंत सांगितलें, परंतु कशी वश करित्ये हें एथें सदृष्टांत कवि सांगतात.

**पदान्वय—** तुझी कथा सुपुरुषां तशी वश करी, जशी राधिका तुज, जिला तूं स्वयें शरीराधिका ह्मणसि, प्रभो रमात्हृदयवल्लभा तिचें सेवन न घडतां जसें तुज तसें मतिस गेह वन भासे.

**तुझी कथा सुपुरुषा तशी वश करी,**—कवि भगवंतास ह्मणतात⁄ तुझी कथा, सुपुरुषा- सत्पुरुषाला- साधुजनाला, तशी वश करी-त्या प्रकारें, वश-स्वसत्ताक- आपलासा, करित्ये; कोणत्या प्रकारें पुसशील तर⁄ **जशी राधिका तुज,**—ज्या प्रकारें, राधिका-व्रजवासी राधा नामें गोपी, तुज- तुला- अर्थात् तुला वश करिती झाली; ती कोण कशी राधिका पुसशील तर⁄ **जिला तूं स्वयें शरीराधिका ह्मणसि,**—जिला- ज्या राधिकेला, तूं स्वयें- तूं स्वतः, शरीराधिका,— शरीर अर्थात् स्वशरीर.— आपला देह, त्याहून⁄ अधिका- अर्थात् अधिक प्रिय अशी, ह्मणसि- ह्मणत होतास; सारांश, ज्या राधिकेला तूं आपल्या शरीराहूनहि अधिक प्रिय मानित होतास तिणें तुला जसें

वश

वश केलें, तसें तुझी कथा तुझ्या भक्तांस वश करित्ये; तिणें मला कसें वश केलें ह्मणून आणखी जर पुसशील तर ऐक- **प्रभो रमात्हृदयवल्लभा तिचें सेवन न घडतां जसें तुज तसें मतिस गेह वन भासे,— प्रभो-** हे महाराज, **रमात्हृदयवल्लभा-** हे रमात्हृदयवल्लभा, रमात्हृदय- -वल्लभा,- **रमा-** लक्ष्मी, तिचें- **हृदय-** अंतःकरण, त्यास- **वल्लभ-** प्रिय- अर्थात् हे लक्ष्मीप्रिया, या दोन संबोधनांहीं- -करून कवीनें भगवंताचें सर्वैश्वर्य सुचविलें, अर्थात् असा तूं सर्वैश्वर्यवान् प्रभु असतां- **तिचें-** त्या राधिकेचें, **सेवन-** संतोषीकरण, **न घडतां-** अर्थात् तुला घडलें नसतां, **जसें तुज-** जसें तुला, **तसें, मतिस-** या माझ्या अथवा तुझ्या भक्तजनाचा बुद्धीस- मनास, **गेह-** घर[1], **वन-** अरण्य, **भासे-** भासतें; सारांश त्या राधिकेचा मनसंतोष ज्या दिवशीं तुज कडून घडत नसे त्या दिवशीं तुला आपलें घर अरण्या सारिखें विजन अथवा शोकास्पद होत असे; तसें त्वत्कथावर्णन ज्या काळीं सत्पुरुषांपासून होत नाहीं, त्या काळीं त्यानांहि आपली मति अरण्या सारिखी शून्यवत् भासत्ये; अर्थात् आपल्या मतीचा कांहीं सद्व्यय झाला नाहीं असें वाटून ती त्यांची मति त्यांच्या शोकास कारणभूत होत्ये; असा एथील कवित्हृद्गत भावार्थ जाणावा.

---

१ गृहंगेहोदवसितंवेश्मसद्मनिकेतनम्—

अमर.

कथाभुवनमोहिनीअशिनमोहिनीहोयती ॥
हरोअसुरधीहिणेंभुलविलेकितीहोयती ॥
नव्हेनह्मणवेअसोजरिविमोहिलादक्षहा ॥
प्रियाबसविलीशिरींमुनिपर्थीकसादक्षहा ॥ १०२ ॥

पुनः भगवत्कथेचें मोहकत्व कवि वर्णितात.

**पदान्वय**— कथा भुवनमोहिनी, अशी ती मोहिनी न होय, असुरधी हरो, हिणें कितीहो यती भुलविले, जरि दक्षहा विमोहिला असो, नव्हे न ह्मणवे; शिरीं प्रिया बसविली, हा मुनिपर्थी कसा दक्ष.

पुनः कवि ह्मणतात **कथा भुवनमोहिनी,— कथा**- भगवत्कथा- भगवद्वर्णनरूप कथा, **भुवनमोहिनी,- भुव- -न**- अर्थात् त्रिभुवन, त्यास **मोहिनी**- मोहन करणारी- त्रिभुवनास भुलविणारी- सारांश सर्व त्रिभुवनाची मति गुंग करणारी, अशी होय; **अशी ती मोहिनी न होय,— अशी**-अशा प्रकारची भुलविणारी, **ती मोहिनी**-ती प्रसिद्ध समुद्रमंथनसमयीं अमृताचें परिवेषण करणारी मोहिनी, **न होय**- नव्हती; कदाचित् आपण ह्मणाल कि त्या मोहिनीनें तर सर्व दैत्यांस भुलविलें, त्यास **असुरधी हरो,— असुरधी,- असुर**- दैत्य, त्यांची **धी**- मति, **हरो**- हरण करो- तिणें दैत्याची मति हरण केली तर करो; परंतु **हिणें कितीहो यती भुलविले,— हिणें**- या भगवत्कथेनें, कितीहो, **यती**- संन्यासी- योगी, भुलविले; अर्थात् असंख्य

यती

यती भुलविले; तेव्हां त्या मोहिनी पेक्षां ही कथा भुवनमोहिनी खरी असा एथील भावार्थ. कदाचित् आणखी आपण ह्मणाल कि त्या मोहिनीनें सर्व योगिजनांत श्रेष्ठ जो महादेव त्यासहि मोहिलें, त्यास' **जरि दक्षहा विमोहिला असो, नव्हे न ह्मणवे;—** जरि- यद्यपि, दक्षहा- दक्षाचा नाश करणारा-महादेव-अर्थात् महायोगिराज, **विमोहिला-** या मोहिनीनें भुलविला- फार गुंग केला, **असो-** ही गोष्ट असो- तिणें भुलविला तर भुलवो, **नव्हे न ह्मणवे-** नाहीं भुलविला असें ह्मणवत नाहीं; परंतु' **शिरीं प्रिया बसविली,— शिरीं-** आपल्या माथ्या वर- अर्थात् आपल्या जटाजूटांत, **प्रिया-** वल्लभा- अर्थसंदर्भेंकरून गंगा, **बसविली-** अर्थात् दडविली; **हा मुनिपथीं कसा दक्ष,— हा-**असा हा महादेव योगिराज, **मुनिपथीं-**मुनीच्या मार्गीत- अर्थात् मुनीच्या धर्मांत, **कसा दक्ष-** कसा चतुर ह्मणावा; सारांश ज्याणें स्वस्त्रीमत्सरभया स्तव दुसरी प्रिया आपल्या जटाजूटांत दडविली त्या महादेवास महायोगी कसें ह्मणावें; असें ह्मणतांनां विचार केला पाहिजे; ह्मणून मोहिनीनें महादेवास भुलविलें यांत तिच्या मोहक गुणाचें मोठेंसें वर्णन होत नाहीं; अतएव भगवत्कथाच विश्वमोहिनी खरी असा एथील भावार्थ जाणावा. यांत उपमेय जी भगवत्कथा तिचें, उपमान जी मोहिनी तिज पेक्षां मोहकत्वरूप गुणाचें आधिक्य वर्णिलें आहे ह्मणून हा व्यतिरेक अलंकार होय.

सुरासुरनरोरगांभुलवुनीकथानत्यजी ॥
नभेदकरिपंक्तिचाअमृतपाजितीसत्यजी ॥
तिणेंजरिसुधारसस्वरतमानसापाजिला ॥
वधीअमृतघोटितांद्रवनयेचिबापाजिला ॥१०४॥

पुनरपि भगवत्कथा आणि मोहिनी यांची तुलना करित होत्साते कवि भगवत्कथेची प्रशंसा वर्णितात.

**पदान्वय-** कथा सुरासुरनरोरगां भुलवुनी न त्यजी, पंक्तिचा भेद न करि, जो सत्य अमृत पाजिती; जरि तिणें स्वरतमानसा सुधारस पाजिला, अमृत घोटितां वधी, बापा जिला द्रव न येचि.

**कथा सुरासुरनरोरगां भुलवुनी न त्यजी,—कथा-** अर्थात् भगवत्कथा, **सुरासुरनरोरगां,-सुर-**देव, **असुर-**दैत्य, **नर-** मनुष्य, आणि उरग- सर्प, यांस, **भुलवुनि-** मोहित करून, **न त्यजी-** त्याग करित नाहीं- अर्थात् त्या सुरादि-कांचा त्याग करित नाहीं; सारांश जसा मोहिनीनें आपलें कार्य साधून त्यांचा त्याग केला तसा ही तुझी कथा भगवद्भक्तांचा त्याग करित नाहीं; **पंक्तिचा भेद न करि—** तिच्या प्रमाणें देवांस अमृत पाजावें आणि दैत्यांस मद्य पाजावें असा ही भगवत्कथा पंक्तिभेद करित नाहीं; परंतु उलटी **जी सत्य अमृत पाजिती,— जी-** भगवत्कथा, **सत्य-** निःसंशयेंकरून, अमृतच पाजिती; त्यां मोहिनीनें जसें दैत्यांस अमृत दाखवून मद्य पाजिलें तसें

ही

ही करित नाहीं, सर्वांस अमृतच पाजित्ये असा अर्थ; अथवा, 'सत्य' हें क्रियाविशेषण नकरितां पुढल्या 'अमृत' या शब्दाचें विशेषण करावें;-सत्य जें अमृत-खरें जें अमृत-ह्मणजे मोक्ष-कैवल्यसुख, तें देत्ये; देवांचें जें पानीय अमृत त्याच्या ठायीं कैवल्यसुखदातृत्व धर्म नाहीं, तें प्राशन करणाऱ्या देवांचाहि महाप्रलयीं नाश सांगितला आहे;[१] परंतु सायुज्यतामुक्ति ज्यांस प्राप्त झाली त्यांचा नाश कोठेंहि सांगितला नाहीं, ह्मणून ही भगवत्कथा सत्य जें अमृत- कैवल्य सुख, तें देत्ये, असा एथें ध्वनितार्थ होतो. कदाचित् एथें कोणी आशंका घेईल कि मोहिनीनेंहि आपल्या वर ज्यांनीं विश्वास ठेविला अशांस अमृत पाजिलें, त्यास- जरि तिणें स्वरतमानसां सुधारस पाजिला,— जरी त्या मोहिनीनें, स्वरतमानसां,- आपल्या ठायीं रत- आसक्त आहे मानस-मन- अंतःकरण, ज्यांचें- अर्थात् आपल्यास ही अमृत पाजील असा ज्यांस भरवसा होता असे जे राहु आणि केतु त्यांस, सुधारस- पाजिला - अमृतरस पाजिला, तरी- अमृत घोटितां वधी,—अमृत घोटितां-अमृताचा घोट घेत असतांना, वधी-वध करिती झाली; आणि इतकें करूनहि- बापा जिला द्रव नयेचि,-बापा-हे तात-

---

१ सौंदर्यलहरींत आचार्यांनीं देवीच्या वर्णनांत या प्रमाणें ब्रह्मादि देवांचा महाप्रलयीं नाश वर्णिला आहे;—

विरिंचिःपंचत्वंव्रजतिहरिराप्नोतिविरतिं ।
विनाशंकीनाशोभजतिधनदोयातिनिधनं ॥
वितंद्रामाहेंद्रीविततिरपिसंमीलतिदृशां ।
महासंहारेऽस्मिन्विहरतिसतिन्वत्पतिरसौ ॥ २६ ॥

तात- हे दयानिधे. जिला- ज्या मोहिनीला, द्रव -ओलावा- अर्थात् जिच्या हृदयास दयेचा ओलावा, नयेचि- आला नाहींच; सारांश इतकें विश्वासघातकाचें कर्म केलें असतांहि जिला दयेचा लेशहि आला नाहीं; तेव्हां अशा गुणांनीं विशिष्ट जी मोहिनी तिची तद्विपरीतगुणांनीं विशिष्ट अशा कथेशीं तुलना करणें अनुचित असा एथील भावार्थ जाणावा.

अभीष्टवरितातजेतवकथेसिविश्वासती ॥
भलीअसुरवंचनींश्रुतअसेचिविश्वासती ॥
कथाकशिसखीतिचीठकवुनीहरीसंचितें ॥
तरींअमृतदेअसेंसदयदाखवीवंचितें ॥ १०५ ॥

मोहिनी प्रमाणें भगवत्कथाहि ठकवित्ये, परंतु तिच्या आणि इच्या ठकविण्यांत महदंतर आहे, तो भेदप्रकार एथें कवि वर्णितात.

**पदान्वय**— जे तव कथेसि विश्वासती, अभीष्ट व-रितात; ती असुरवंचनीं भली विश्वास श्रुत असेचि; कथा तिची सखी कशि, ठकवुनी संचितें हरी, तरीं अमृत दे, सद-य वंचितें असें दाखवी.

**जे तव कथेसि विश्वासती,**— कवि भगवंतास ह्म-णतात- जे तुझ्या कथेला विश्वासतात- अर्थात् जे तुझ्या कथे वर विश्वास ठेवितात- तुझी कथा पापापासून मुक्त करून आमचा उद्धार करील अशी ज्यांची श्रद्धा आहे; ते **अभीष्ट वरितात;**— अभीष्ट- इच्छित मनोरथ- मनकामना- स्वकल्याणरूप अर्थ, वरितात- प्राप्त करून घेतात- अर्थात् ते आपलें कल्याण करून घेतात; **ती अ-सुरवंचनीं भली विश्वास श्रुत असेचि;**— ती- ती मोहिनी, तर असुरवंचनीं- दैत्यांस ठकविण्यांत, भली- पक्की- चतुर- कुशल, अशी विश्वास- सर्व जगास, श्रुत असेचि- माहित आहेच; मग **कथा तिची सखी**

कशि

**कशि,— कथा-** भगवद्गुणवर्णनरूप कथा, **तिची-** त्या मोहिनीची, **सखी कशि-** मैत्रीण कशी ह्मणावी ? अर्थात् ह्मणतां येत नाहीं; सारांश त्या दोघींची सारिखी तुलना होत नाहीं; कारण **ठकवुनी संचितें हरी,—** ही भगवत्कथा **ठकवुनी-**ठकवून- अर्थात् जे तिज वर विश्वास ठेवितात त्यांस ठकवून, **संचितें-** पूर्वजन्मार्जित संसृतिहेतुक कर्मफळें,- अर्थात् जन्मांतर देणारीं त्यांचीं कर्में, **हरी-** हरण करित्ये- अर्थात् त्या कर्मांचा नाश करित्ये- सारांश त्यांस संसारदुःखापासून सोडवित्ये; **तरीं अमृत दे,— तरीं** या प्रमाणें ठकवूनहि, **अमृत दे** - मोक्ष देत्ये; अर्थात् त्या मो-हिनीनें ठकवून मद्य अथवा विष दिलें, परंतु ही तुझी कथा ठक-वून अमृत देत्ये,[1] एथें अमृत शब्दा वर कवीचा कटाक्ष आहे. याच अर्थाचें समर्थन करित होत्साते कवि ह्मणतात **सदय वंचितें असें दाखवी,— सदय-** दयावंत- जो दयाळू पुरुष आहे तो, **वंचितें-** ठकविण्यानेंहि, **असें-** याच प्रका-रचें कल्याण, दाखवितो; सारांश जशी दयालु आई ठकवून-हि मुलांस खाऊंत औषध देऊन त्यांचें कल्याण करित्ये, तद्वत् तुझी कथा श्रद्धालु जनास ठकवून त्यांचीं संचितें हरण करूनहि अमृत पाजित्ये. एथें मोहिनीनें ठकवून दैत्यांस विषपाजिलें, आणि कथेनें ठकवून भक्तजनांचीं संचितें दूर करून त्यांस अमृत पाजिलें, ह्मणून उपमाना पेक्षां उपमेयाचें आधिक्य

---

1 तुकोबाहि असेंच ह्मणतात कीं वेदांनाहि जें गम्य नाहीं तें मोक्षदा

 -यक

आधिक्य वर्णित होतें यास्तव हा व्यतिरेक अलंकार होय. तात्पर्य हेंच कि मोहिनी पेक्षां भगवत्कथा अधिक दयालु होय.

---

-एक आत्मज्ञान भगवद्गुणाच्या गायनानें प्राप्त होतें.

सुरवरांचितनीं मुनीवरांध्यानीं ।
आकारनिर्गुणीं तोचीअसे ॥
तुकाह्मणेंनाहीं श्रुतींआंतुडलें,
आह्मांसांपडलें गीतगातां ॥

**कराश्रवणएवढेंअपटुलोकहांसोमला ॥**
**अहोजरिगिळावयाप्रियकुमारघेसोमला ॥**
**तयासिठकवूनिदेबहुतशर्करामायजी ॥**
**तिलास्वशिशुवंचनेंअदयताशिवेकायजी ॥ १०६ ॥**

मागील केकेंत वंचकास कवीनें सदय ह्मटलें, त्यास वंचक सदय कसा या आशंकेचें एथें दृष्टांतेंकरून ते समाधान करितात.

**पदान्वय—** अपटु लोक मला हांसो, एवढें श्रवण करा, अहो प्रिय कुमार गिळावया जरि सोमला घे, जी माय तयासि ठकवूनि बहुत शर्करा दे, तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे कायजी.

**अपटु लोक मला हांसो,—** मागल्या केकेंत वंचकास दयालु असें जें त्यां ह्मटलें त्यावरून अपटु लोक, **अपटु-** अकुशल- चातुर्यहीन- अर्थात् जडबुद्धीचा, **लोक-** जन, **मला हांसो-** कवि ह्मणतात मला हांसला तर हांसो; परंतु **एवढें श्रवण करा,—** कवि भगवंतास ह्मणतात तुह्मीं एवढें श्रवण करा- मीं पुढें ह्मणतों इतकें तर ऐका; **अहो प्रिय कुमार गिळावया जरि सोमला घे,—** अहो एका लाडक्या लहान मुलानें नकळत गिळण्याकरितां खाऊ ह्मणून जर सोमल हातांत घेतला; आणि असें पाहून **जी माय तयासि ठकवूनि बहुत शर्करा दे,—** जी आई त्या मुलाला, ठकवूनि- मुला तों खाऊ नाहीं, हा माझ्या हातांत खाऊ आहे ह्मणून ठकवून, बहु-

-त- पुष्कळ- त्याला पाहिजे तितकी, शर्करा- साखर, दे- देत्ये- देऊं लागली; तर तिला **स्वशिशुवंचनें अदयता शिवे कायजी,**— तिला-. अशा ठकविणारे आईला, स्वशिशुवंचनें,- स्वशिशु- आपला मुलगा, त्यास वंचनें- ठकविण्यानें, अदयता- निर्दयपणा, **शिवे कायजी,**- शिवतो कायहो- अर्थात् तिला निर्दयपणाचा दोष लागत नाहीं- अशा आईला कोणी निर्दय ह्मणणार नाहीं- सदयच ह्मणेल; ह्मणून भगवत्कथेनें जरि ठकवून भक्तजनाचीं संचितें हरण केलीं, आणि ठकवून जरी अमृत दिलें, तरी तो तिचा महदुपकारच असा पूर्व केकेशीं अर्थाचा संबंध जाणावा. हा दृष्टांत अलंकार होय.

ह्मणोनिबहुमोहिनीहुनिभलीकथाहेतुजी ॥
अभीष्टफलद्यावयानतमनोरथाहेतुजी ॥
ह्मणालजरिमीचत्यांविषमकायदोघांतरे ॥
जसाजनसितासिताभिधनदीसदोघांतरे ॥ १०७ ॥

वरल्या केकांत मोहिनी आणि भगवत्कथा यांच्या पृथग्वर्णनेंकरून भगवत्स्वरूपाहून या दोघींची स्वरूपभिन्नता इंगित होत्ये, त्या भिन्नतारोप दोषाचा परिहार करण्या करितां एथें कवि ह्मणतात.

**पदान्वय**— ह्मणोनि, मोहिनीहुनि हे तुजी कथा बहु भली, जी नतमनोरथा अभीष्ट फल द्यावया हेतु, जरि ह्मणाल मीच त्या दोघींत कायरे विषम; सितासिताभिधनदी-सदोघीं जसा जन तरे.

**ह्मणोनि मोहिनीहुनि हे तुजी[1] कथा बहु भली,**— **ह्मणोनि**- मागील केकांत सांगितल्या कारणा वरून, मोहिनी पेक्षां हीतुझी, कथा, **बहु भली**- फार चांगली-अत्यंत दयालु होय; कांकि' **जी नतमनोरथा अभीष्ट फल द्यावया हेतु,— जी**- तुझी कथा, **नतमनोरथा,**- **नत**-नम्र- अर्थात् तुझ्या पदाच्या ठायीं जे नम्र-ह्मणजे भक्त, त्यांचे' **मनोरथ**- इच्छा, तीस, **अभीष्ट**-इच्छिलेलें- वांच्छित, **फल**-अर्थ, **द्यावया**-

1 एथें प्रासा करितां कवीनीं झ्र्ज्यास्थानीं एकांशीं सवर्ण जो ज त्याचा आदेश करून तुजी असें रूप योजिलें आहे, यांत कवींच्या निरंकुशत्वा मुळें फारसा दोष येत नाहीं.

वया- द्याया कारणें, हेतु- कारणभूत, आहे; अर्थात् तुझ्या भक्तांस वांच्छितार्थ देऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करण्यास कारणभूत होय. कवि एथें आक्षेप घेऊन भगवंतास ह्मणतात.

**जरि ह्मणाल मीच त्या दोघींत कायरे विषम,—** जर कदाचित् तुह्मी एथें ह्मणाल किं, **मीच त्या,**- मीच, **त्या—** मोहिनी आणि मत्कथा- अर्थात् मोहिनी तरीं मीच, आणि मत्कथा तरीं मीच, **दोघींत**- मोहिनी आणि मत्कथा या दोघींत, कायरे, विषम- भिन्न, तें काय- अर्थात् काहीं भिन्न नाहीं; अथवा, **मीच त्या दोघींत,**- त्या दोघींत अर्थात् यमुनेंत आणि मत्कथेंत मीच नांदतों; सारांश त्वां मत्कथा आणि मोहिनी यांची तुलना करण्या क- -रितां वर जें इतकें त्यांचें पृथग्वर्णन केलें तें व्यर्थ, त्या दोघी एकच, कारण त्या माझें स्वरूपच होत, ह्मणून त्यांचें वर्णन मद्वर्णनाहून भिन्न आहे असें त्वां कदापि समजूं नये; यास दृष्टांत- **सितासिताभिधनदीसदोघीं जसा जन तरे,—** सितासिताभिधनदीसदोघीं,- सित- शुभ्र, असित- कृष्ण,- श्वेत आणि कृष्ण आहे- **अभिधा**- नाम, ज्या नदीसदोघाचें त्यांत,- अर्थात् गंगा आणि यमुना[१] यांचा सदोघ- चांगला ओघ- अर्थात् पुण्य ओघ, त्यांत, **जसा**- ज्या प्रकारें, **जन**- लोक, **तरे**- तरतो; गंगेंत स्नान केलें तरीं तरतो, आणि यमुनेंत केलें तरीं तरतो; अथवा, एथें त्यांचा

पृथक्

---

१ गंगेच्या उदकाचा वर्ण शुभ्र, आणि यमुनेच्या उदकाचा वर्ण कृष्ण, ह्मणून सर्वत्र प्रसिद्ध आहे. ' सिताऽसितेसरितेयत्रसंगते ' अशी कोठे श्रुतिहि आढळत्ये.

पृथक् पृथक् ओघ नमानितां त्या दोघींचा एकतारूप जो त्रिवेण्यात्मक ओघ त्यांत तरतो; अर्थात् गंगा आणि यमुना या वर्णकरून जरी भिन्न नद्या दिसतात, तथापि मत्स्वरूपदृष्ट्या त्या एकच होत, असा एथें मला कवीचा आशय दिसतो.

अहावहुविशुद्धहेंप्रभुतवस्वरूपाहुनी ॥
नभिन्नतनुत्याभलेभजातिएकतापाहुनी ॥
परंतुवदतोंजनानुभवनातळोपापगा ॥
तशीनयमुनागमेजशिगमेनिर्लिपापगा ॥ १०८ ॥

मागल्या केकेंत यमुनोपमा मोहिनी, आणि गंगोपमा भगवत्कथा, असा आपला भाव दाखवून त्या दोन्ही उमोपमेयांच्या युग्माची त्रिवेण्योपम भगवत्स्वरूपीं संगम करून एकताहि दर्शविली, परंतु एथें त्या विषयीं आशंका घेत होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— अहा प्रभु, तव स्वरूपाहुनी त्या भिन्नतनु न, भले एकता पाहुनी भजति, हें बहु विशुद्ध; परंतु जनानुभव वदतों, पाप नातळो गा; जशि निर्लिपापगा गमे तशी यमुना नगमे.

**अहा प्रभु,— अहा**- मोठें आश्चर्य!, **प्रभु**- हे प्रभो, **तव स्वरूपाहुनी त्या भिन्नतनु न,**—तुझ्या स्वरूपाहून, **त्या**- गंगा आणि यमुना, **भिन्नतनु**- भिन्नशरीरिणी, **न**- नाहींत; अर्थात् तुशीं एकरूपच आहेत; ह्मणून **भले एकता पाहुनी भजति,— भले**- विवेकी-ज्ञानी असे पुरुष, **एकता**— ही त्यांची तुजशीं एकस्वरूपता, **पाहुनि**-पाहून-मनांत विवेक करून, **भजति**— भजतात; अर्थात् तुझेंच स्वरूप त्या आहेत असें जाणून त्यांस भजतात; **हें बहु विशुद्ध,- हें**- हें त्याचें भजणें- ही त्यांची भक्ति, **बहु विशुद्ध**- फार शुद्ध - फार निर्मळ - सरळभावाची; यांत

संशय

संशय नाहीं' **परंतु जनानुभव वदतों,**- परंतु- तथापि, मीं उगीच' **जनानुभव**- जन- असा विवेक ज्यांस नाहीं असे इतर जन, त्यांचा' **अनुभव**- ज्ञान- समजूत, वदतों- सांगतो; यांत-[1] **पाप नातळो गा,**- पाप- भेदप्रदर्शक त्या लोकांचा अनुभव सांगण्याचा दोष, **नातळो गा**-नलागो हो- नप्राप्त होऊ; कवि ह्मणतात मला मात्र असा भेदवर्णनाचा दोष नलागो; तो जनानुभव कोणता ह्मणून पुसाल तर ऐका' **जशि निर्लिपापगा गमे तशी यमुना न गमे,**— ज्या प्रमाणें, **निर्लिपापगा,**[2]- निर्लिप- देव- तत्संबंधिनी' **आपगा**- नदी, अर्थात् स्वर्धुनी- भागीरथी- **गमे**- लोकांस आवडत्ये- अथवा पुण्यनदी ह्मणून लोक समजतात, **तशी**- त्या प्रमाणें, **यमुना न गमे**- यमुना आवडत नाहीं, अथवा पुण्यनदी ह्मणून लोक समजत नाहींत. **सारांश** असा जो लोकांचा यमुनेहून भागीरथीस अधिक पुण्यदी ह्मणून समजण्याचा ओघ त्यास अनुसरून मीं वरल्या केकेंत बोललों ह्मणून मला दोष नलागो; वरकड गंगा आणि यमुना हीं दोन्हीं तुझींच स्वरूपें हें खरें; असा या केकेचा भावार्थ दिसतो.

---

१ हे भयप्रदर्शक अव्यय.

२ निर्लिपाः देवाः असें त्रिकांडशेष कोशांत प्रमाण आढळतें. 'नौर्लिपेः संज्ञायाम्' असें सूत्र आहे.

**जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरींजिचेंनांदणें ॥**
**जिच्याजळमळेंतुळेनशरदिंदुचेंचांदणें ॥**
**प्रजाहरिहराअशायदुदरींअनेकाकवी ॥**
**भिवोनह्मणतीलकांजशिसुधातशीकाकवी ॥ १०९ ॥**

यमुनेहून भागीरथी अधिक पुण्यदायक नदी ह्मणून लोक समजतात असें जें मागल्या केकेंत कवीनें विधान केलें त्याचें-च ते एथें समर्थन करितात.

**पदान्वय —** जिचें नांदणें जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं, जिच्या जळमळें शरदिंदुचें चांदणें न तुळे, यदुदरीं हरिहरा अशा प्रजा अनेका; जशि सुधा तशी काकवी कवी कां भिवोन ह्मणतील.

**जिचें नांदणें जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं,— जिचें-** ज्या भागीरथीचें, **नांदणें-** राहणें- वास- नांदणूक, **जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं, — जगद्गुरु —** सर्व जगाचा गुरु, असा जो **महेश्वरप्रभू-** शिवप्रभु- अर्थात् शिव, त्याच्या **शिरीं-** मस्तकाच्या ठायीं; आणि **जिच्या जळमळें शरदिंदुचें चांदणें न तुळे,— जिच्या-** ज्या भागीरथीच्या, **जळमळें,-**जळमळ-जळसंबंधी मळ, त्याशीं, **शरदिंदुचें चांदणें,- शरदिंदुचें,-** शरत्काळाच्या, **इंदूचें-** चंद्राचें, **चांदणें, न तुळे-** तुळत नाहीं; एथें शरत्कालाचें ग्रहण चांदण्याच्या स्वच्छते करितां, अर्थात् शरत्काळाचें स्वच्छ चांदणेंहि ज्या गंगेच्या उदकाच्या मळाची बरो-बरी करायास समर्थ नाहीं, मग साक्षात् उदकाची

कोठून,

कोठून, इतकें स्वच्छ आणि शुभ्र जिचें उदक; हा काव्या-र्थापत्ति अलंकार दिसतो. आणि **यदुदरीं हरिहरा अशा प्रजा अनेका,—यदुदरीं**- जिच्या उदराच्या ठायीं-जिच्या पोटांत, **हरिहरा अशा**- हरिहरा सारिख्या-अर्थात् शिवविष्णू सारिख्या महाप्रतापी, प्रजा, **अनेका**- एक नाहीं- बहुत; मग अशा भागीरथीची यमुनेशीं तुलना कशी करावी असा शेषार्थ एथें ध्वनित होतो. यास दृष्टांत **जशि सुधा तशी काकवी कवी कां भिवोन ह्मण-तील,**— जशी, सुधा- अमृत, तशीच काकवी, असें **कवी**- ज्ञाते पुरुष, कां भिऊन ह्मणतील- अर्थात् भ्याले तरी सुधा आणि काकवी सारिखी असें ज्ञाते पुरुष कदापि ह्मणणार नाहींत; ह्मणून - 'ह्मणालजरिमीचत्याविषमकायद्दो-घींतरे'यांत तुमच्या आशंकेनें जरीं यमुना तुमचें स्वरूप आहे ह्मणून मागल्या कंकेंत भ्यां भिऊन ह्मटलें, तथापि मज पेक्षां धैर्यवान ज्ञाते पुरुष आहेत ते असें ह्मणणार नाहींत; असा एथें ' भिवोनि' या पदा वरून कवीचा बोलण्याचा कटाक्ष दिसतो.

---

१ अशाच अर्थानें जगन्नाथ रायजीनें गंगेचा महिमा वर्णिला आहे; त्यांत सकल लोका सहित हें ब्रह्मांड जिच्या एका एका लहरींत लहानशा धलपी प्रमाणें लोटत चाललें आहे असा आपला आशय दाखविला आहे;- त्याच श्लोकाच्या भाषांतरांत वामन ह्मणतात;-

अहोहेब्रह्मांडाकृतिसकललोकांसहवरी ॥
रुळेजेथेंऊर्मीभ्रमणविवशींतिदुकपरी ॥
असातोहामृत्युंजयपृथुकपर्दीजडिनला ॥
तुझाश्रीतोयौघप्रशमनकरूपापवहिला ॥ २७ ॥

**तुलास्वयमुनेसर्वेकुवलयद्युतिश्यामला ॥**
**ह्मणालजरिमोहिनीनिजतनूअवश्यामला ॥**
**तुलीनअमृतोदधिप्रभवपुंडरीकामला ॥**
**कथासुरधुनीसर्वेसुजनजीतविश्रामली ॥ ११० ॥**

मोहिनीची यमुनेशीं तुलना, आणि कथेची भागीरथीशीं तुलना दाखवून त्यांत भागीरथीच्या श्रेष्ठत्वानें कथेचें श्रेष्ठत्व आपल्यास इष्ट होय असा स्वाभिप्राय कवि प्रकट करितात.

**पदान्वय—** कुवलयद्युतिश्यामला मोहिनी निजतनु मला अवश्या जरि ह्मणाल, स्वयमुने सर्वे तुला, अमृतोद-धिप्रभवपुंडरीकामला कथा सुजन जीत विश्रामला सुरधुनी सर्वे तुलीन.

**कुवलयद्युतिश्यामला मोहिनी निजतनु मला अवश्या जरि ह्मणाल,—** कुवलयद्युतिश्यामला,- कुवलय- काळ्या कमळांचा समुदाय, त्यांची द्युति- कांति, तिज सारिखी‸ श्यामला— कृष्णवर्णा, अथवा, कु-पृथ्वी, तिचें‸ वलय- वेढा- अर्थात् समुद्ररूप अथवा मेघरूप वेढा, त्याची‸ द्युति- कांति, तद्वत्‸ श्यामला- कृष्णवर्णा- अर्थात् मेघश्यामा, अशी‸ मोहिनी, निजतनु- आपली तनु- शरीर, मला, अवश्या- अपरिहार्य, होय, असें‸ जरीं ह्मणा-ल- जरीं तुह्मीं ह्मटलें, तरीं ह्मणा; आणि असें ह्मणून जरीं‸ **स्वयमुने सर्वे तुला,—** आपल्या यमुने बरावर, तुला- तु-लत असला तरीं तुला; अर्थात् मीहि कुवलयद्युतिश्यामल आहें

आहे- ह्मणजे मेघश्याम आहे, आणि मोहिनीहि कुवलयद्युति-श्यामला आहे, ह्मणजे मेघश्यामा आहे, तशी यमुनाहि मेघ-श्यामा आहे, ह्मणून ती यमुना आणि मोहिनी माझ्याच तनु असें ह्मणून तुलत असलां तर तुला; असें तुमच्या करण्यांत मीं आडवा येत नाहीं; परंतु कवि ह्मणतात माझा अभिप्रेतार्थ जर पुसाल तर मीं ' **अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला कथा सुजन जींत विश्रामला सुरधुनी सवें तुली-न,—** अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला,- अमृतोदधि - अमृताचा उदधि- समुद्र- अर्थात् क्षीरसागर, त्यांत आहे' प्रभव- उत्पत्ति, ज्याची अशा ' पुंडरीकामला,- पुंडरीक- शुभ्र कमल, त्या सारिखी' अमला- निर्मला- शुभ्रा, अशी' कथा- अर्थात् त्वद्गुणानुवादरूप कथा, आणखी' सुजन जींत विश्रामला,- साधुजन, जींत- ज्या कथेंत, विश्रांति पावला, अशी तुझी कथा' सुरधुनी- भागीरथी, सवें- बराबर, तुलीन- तुलना करीन. कारण, तुझ्या कथे प्रमाणें सुरधुनीहि **अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला** आहे, अमृतोदधि- क्षीरसमुद्र, त्यांत आहे' प्रभव- उत्पत्ति-स्थान, ज्याचें अशा' पुंडरीकामला,- पुंडरीक- शुभ्र कमल, त्या सारिखी' अमला- निर्मला- शुभ्रा, अशी आहे; आणि साधुजनाचें विश्रांतिस्थानहि आहे. सारांश कवि भगवंतास ह्मणतात,- वर्णैक्या वरून तुह्मांस इष्ट असल्यास मोहिनीची यमुनेशीं तुलना करा, परंतु मीं तर त्वद्यशवर्ण-नरूप जी कथा तिची भागीरथीशीं तुलना करीन. आणखी या तुलनेंतहि पुनः वर्णैक्य सुटत नाहीं; कारण जसें भागीर-थीचें उदक शुभ्र, तसेंच यशहि शुभ्रवर्ण असतें. असा एथील ध्वनितार्थ जाणावा.

शुकोदितपुराणज्याश्रवणसन्मुखेंसाग्रही ॥
ह्मणेलअतुलाकथाझणिह्मणालतोआग्रही ॥
नकेवळमलाचिहेंनिरुपमायशोमंडिता ॥
गुरूसहिगमेपुसास्ववरदामहापंडिता ॥ १११ ॥

मागील केकेंत कथेची तुलना भागीरथीशीं करून पुनः कवि एथें त्याच कथेची प्रशंसा करितात.

**पदान्वय**— ज्या साग्र ही शुकोदित पुराण सन्मुखें श्रवण, कथा अतुला ह्मणेल, झणि तो आग्रही ह्मणाल, केवळ मलाचि हे निरुपमा यशोमंडिता न, गुरूस हि गमे, स्ववरदा महा पंडिता पुसा.

**शुकोदित पुराण ज्या साग्र ही सन्मुखें श्रवण,** —**शुकोदित**- शुक मुनीनें सांगितलेलें, असें **पुराण**- अर्थात् भागवत, **ज्या**- अर्थात् ज्या परीक्षित राजाला, **साग्र**- शेवट पर्यंत- संपूर्ण, ही, **सन्मुखें**- मुखा समोर- प्रत्यक्ष, असें **श्रवण**-श्रुतें- ऐकलें- अवगत; अर्थात् आपल्या समोर शुकमुनीनें स्वतःसंपूर्ण सांगितलें असें भागवत ज्या परीक्षितानें ऐकलें; अथवा, एथें **ज्या शुकोदित पुराण सन्मुखें साग्र ही श्रवण,**— ज्या परीक्षिताला, शुकोदित पुराण- भागवत, सन्मुखें आणि साग्र असेंहि श्रुत होतें; असा

---

१ जरीं **'श्रवण'** या शब्दाचा संस्कृतांत कप्रत्ययांत कृदंता प्रमाणें प्रयोग होत नाहीं, तथापि तसा प्रयोग प्राकृतांत कोठे कोठे आढळतो; जसें 'मला तें आख्यान श्रवण आहे' 'मला ती गोष्ट स्मरण आहे', अशा आधारा वरून कवीनें तसा प्रयोग केला आहे असें मला वाटतें.

असा पदान्वय करून, 'सन्मुखें' आणि 'साग्र' हीं दोन पदें क्रियाविशेषणें करावीं; **कथा अतुला ह्मणेल,— कथा**- तुझी कथा, **अतुला**- निरुपमा, अशी' ह्मणेल;- अर्थात् तो परीक्षितही तुझ्या कथेला तुलना नाहीं असें ह्मणेल[1]- **ह्मणि तो आग्रही ह्मणाल,**- ह्मणि- पुनः कवि आपल्या मनांत भिऊन ह्मणतात' कदाचित्- न जाणों, तो- परीक्षित, **आग्रही**- आग्रहवान- अर्थात् शुकाचा तसा आग्रह पडला ह्मणून तोहि तसा आग्रही झाला, असें' ह्मणाल, तर' **केवळ मलाचि[2] हे निरुपमा यशोमंडिता न,**- कवि ह्मणतात' **मलाचि**-मलाच, **हे**-ही तुझी कथा, **निरुपमा**-जिला उपमा नाहीं अशी, आणि' **यशोमंडिता**- यशानें **मंडित**- भूषित- अर्थात् तुझ्या यशवर्णनेंकरून भूषित, अशी' **न**- नाहीं; अर्थात् **नगमे**- गमत नाहीं- वाटत नाहीं ( एथें पुढील **गमे** या पदाची अनुवृत्ति करावी ); परंतु' **गुरूस हि गमे,— गुरूस**- नारदादि ज्ञाते यांस, हि, **गमे**- तशी निरुपमा- वाटती; इष्ट असल्यास हें माझें ह्मणणें साक्षी करितां' **स्वव- रदा महापंडिता पुसा,-स्ववरदा**-तुह्मां वर देणारे ज्याचे, अथवा

---

१ या भविष्यकालप्रयोगा वरून कवीचें प्रतिज्ञापूर्वक कथन ध्वनित होतें; ह्मणजे कवि एथें प्रतिज्ञा करून ह्मणतात कीं तो परीक्षितीह तुझी कथा अतुला आहे असें ह्मणेल.

२ मला या पाठा विषयीं संशय दिसतो. एथें मला या ठिकाणीं **तया** ह्मणजे त्या परीक्षिताला, असें पद असावें; अथवा, दुसऱ्या चरणांत' ह्मणि ह्मणालि तो आग्रही' हें वाक्य 'ह्मणि ह्मणाल मीं आग्रही' असें असावें असें माझ्या अटकळीस येतें.

अथवा, तुमचा वर ज्यास आहे ( बहुव्रीहि ) अशा महा पं-डिता-मोठ्या पंडिताला-अर्थात् त्याच नारदाला, अथवा ज्या-णें पुराणांत अशा कथा सांगितल्या आहेत त्या व्यासाला, पुसा- विचारून पहा; सारांश तुझी कथा परीक्षिताला आणि नारदालाहि निरुपमा अशी वाटली, मग मला तशी वाटेल यांत आश्चर्य नाहीं; असा एथील कविन्दद्गतार्थ जाणावा.

प्रभोतुजनमोहिनीभुलविमोहिलातोहिती ॥
त्यजीजननव्हेतशीतुजतुझीकथामोहिती ॥
निजानुभवतूंपहाजशिमहौषधीपारदा ॥
तुलास्थिरबळेंकरीकळविलेंतुवांनारदा ॥ ११२ ॥

पुनः आणखी कथाप्रशंसा कथित होत्साते कवि ह्मणतात.

**पदान्वय**— प्रभो तुज मोहिनी न भुलवि, मोहिला तो हि जन ती त्यजी, तशी नव्हे तुझी कथा तुज मोहिती; तूं निजानुभव पहा, जशि महौषधी पारदा तुला बळें स्थिर करी, तुवां नारदा कळविलें.

**प्रभो तुज मोहिनी न भुलवि,**— पुनः कवि भगवंतास ह्मणतात-हे प्रभो तुला मोहिनीनें कांहीं भुलविलें नाहीं; अर्थात् जरीं तिणें भुलविलें तरीं इतर दैत्यादिकांनां भुलविलें; आणखी दुसरें-**मोहिला तो हि जन ती त्यजी,**—एकदां ज्याला तिणें-**मोहिला**- मोहून घेतला, **तो हि जन ती त्यजी**- त्याहि जनाला ती टाकित्ये-अशा मोहिलेल्या जनाचाहि तिणें त्याग केला, अर्थात् सोडून त्या दीनाचा तिणें अंगीकार केला असेंहि नाहीं; (एथें कवीनें तिचें वंचकत्व सांगून निष्ठुरताहि सुचविली) परंतु-**तशी नव्हे, तुझी कथा तुज मोहिती,**—तशी नव्हे-अर्थात् तुझी कथा-तशी नाहीं, तर- तुझी **कथा तुज मोहिती**- तुझी कथा उलटी तुलाच **मोहिती**- मोहून घेत्ये- वश्य करित्ये; ह्मणून मोहिनी पेक्षां हा या कथेचा विशेष मोहक गुण, मोहिनी पेक्षांहि अधिक

मोहिनी

मोहिनी होय, असा एथें कवीचा हृद्गतार्थ दिसतो; **तूं निजानुभव पहा,**— तूं, निजानुभव- या गोष्टी विषयीं स्वताचाच अनुभव, पहा- आपल्या मनांत विचारून पहा; अर्थात् मोहिनीनें तुला कधींहि भुलविलें नाहीं, आणि तुझी कथा तुला नित्यशः भुलवित्ये, याचा तूंच आपला अनुभव पहा; **जशी महौषधी पारदा तुला बळें स्थिर करी,**— जशि-ज्या प्रकारें, महौषधी-रसायन क्रियेंत अत्यंत उपयोगी अशी वनस्पती, पारदा- पाऱ्याला, तशी[1] **तुला बळें स्थिर करी,**- ती कथा बळेंच तुला स्थिर करित्ये; अर्थात् पारा इतका चंचल असतां महौषधी जशी त्याला स्थिर करित्ये, तद्वत् ही तुझी कथा तुला स्थिर करित्ये; मनाच्या वेगा पेक्षांहि तुझा वेग अधिक; इतका चंचल तूं असतांहि ही तुझी कथा तुला स्थिर करित्ये; तेव्हां इचें सामर्थ्य अवर्णनीय होय असा एथें ध्वनितार्थ जाणावा. पुनः कवि ह्मणतात मीच हें सांगतों असें नाहीं तर **तुवां नारदा कळविलें,**— त्वांच, या प्रमाणें नारदाला सांगितलें[2]. मागील केकेंत कवीनें कथेस मोहिनीची उपमा देऊन तिशीं तुलना करून दाखविली, परंतु ईत कथेचें अधिक मोहकत्व वर्णून तिज पेक्षां इचें गुणाधिक्य दर्शवलें ह्मणून एथें हा व्यतिरेक अलंकार जाणावा.

---

१ तोडर आणि दत्तात्रयकल्प या रसायन विषयक ग्रंथांत नागदमनी, रुद्रवती, आणि प्रफुल्लिका, या वनस्पतींच्या योगानें पारा कसा मारावा या विषयीं साविस्तर प्रयोगक्रिया सांगितली आहे असें कळतें.

२ नाहंवसामिवैकुंठे योगिनांह्रदयेरवौ ।
मद्भक्तांयत्रगायंति तत्रतिष्ठामिनारद ॥

सुर्षिजवळींस्वयेंह्मणसितत्रातिष्ठामिया ॥
तुझ्याचिवचनेंह्मणेंतुजकथावशस्वामिया ॥
जसास्थिरकथेंततूंस्थिरकरींतसेंयामना ॥
स्वभक्तसुरपादपासफलहेअसोकामना ॥ ११२ ॥

मागल्या केकेच्या शेवटीं माझी कथा मलाच आक-र्षक होऊन स्थिर करित्ये असें भगवंतानें नारदास कळविलें ह्मणून कवीनें जें सूचनार्थ सांगितलें तेंच एथें ते स्पष्ट कथित होत्साते ह्मणतात.

**पदान्वय**— स्वयें सुर्षि जवळीं ह्मणसि तत्र तिष्ठामि, या तुझ्याचि वचनें स्वामिया तुज कथावश ह्मणें, जसा तूं कथेंत स्थिर तसें, या मना स्थिर करीं, स्वभक्तसुरपादपा, हे कामना सफल असो.

कवि भगवंतास ह्मणतात[1] **स्वयें सुर्षि जवळीं ह्मणसि तत्र तिष्ठामि,**— स्वयें- तूं स्वतः, सुर्षी जवळीं- नारदा जवळ, ह्मणसि- ह्मणतोस, कीं[1]तत्र तिष्ठामि- तेथें मीं उभा असतों- अर्थसंदर्भानें जेथें माझे भक्त मला सप्रेमांतःकरणानें गातात तेथें मीं असतों; या

तुझ्याचि

---

१ भगवंतानें नारदास ह्मटलें कीं- 'नाहंवसामिवैकुंठेयोगिनांहृदयेरवौ मद्भक्तायत्रगायंतितत्रतिष्ठामिनारद' यांतील हें प्रतीक एथें घेऊन कवि ह्मणतात; यांचा अर्थ- मीं वैकुंठांत राहत नाहीं, योग्यांच्या हृदयांत राहत नाहीं, सूर्यांत राहत नाहीं, परंतु जेथें माझे भक्त मला गातात तेथें मीं उभा असतों.

**तुझ्याचि वचनें स्वामिया तुज कथावश ह्मणें,—या** तुझ्याचि वचनें,- 'मद्भक्तायत्रगायंतितत्रतिष्ठामिनारद-' माझे भक्त जेथें गातात तेथें नारदा मीं उभा असतों, असें जें हें तुझें वचन त्या वचना वरून, **स्वामिया तुज कथा-वश ह्मणें,- स्वामिया-** हे स्वामि, तुला, **कथावश-** कथेनें वश केलेला असा, **ह्मणें-** मीं ह्मणतों; अर्थात् तुझ्याच वचनाच्या आधारा वरून मीं तुला कथावश ह्मणतों; ह्मणून महाराज **जसा तूं कथेंत स्थिर तसें या मना स्थिर करीं,—** ज्या प्रमाणें तूं कथेंत, **स्थिर-** निश्चल, असतोस तसें या माझ्या मनाला तूं निश्चल कर[1]; स्वभावतः हें जें माझें केवळ चंचल मन त्यास निश्चल कर; आणखी याच प्रार्थ-नेच्या दृढीकरणार्थ कवि संबोधन देऊन ह्मणतात **स्वभ-क्तसुरपादपा,-** हे स्वभक्तसुरपादपा,-, स्वभक्त- आपले भक्त- आपल्या ठायीं कायावाचामनेंकरून जे अनुरक्त, त्यां विषयीं, **सुरपादप,-** सुर- देव, त्यांचा **पादप-** वृक्ष- ह्मणजे कल्पवृक्ष,- अर्थात् स्वभक्तांचे मनोरथ पूर्ण करण्या विषयीं तूं कल्पवृक्ष आहेस; ह्मणून **हे कामना सफल असो,—** ही, माझी **कामना** - इच्छा, अर्थात् चंचल मन निश्चल करून घेण्याची जी माझी इच्छा, ती सफल असो.

मनाचा

---

1 बाह्यात्कारें हें मागणें सुलभ असें दिसतें, परंतु विचारानें पाहिलें असतां मनास निश्चल करणें हें फारच दुःसाध्य कर्म होय, या विषयीं भगवद्गीतेंत अर्जुनानें ह्मटलें आहे;—

चंचलंहिमनःकृष्णप्रमाथिबलवद्दृढं ।
तस्याहंनिग्रहंमन्येवायोरिवसुदुष्करं ॥

मनाचा स्थिरीभाव, कैवल्यसुखा पर्यंत सर्व सुखास कारण-
-भूत आहे, ह्मणून कवीनें एथें माझ्या मनास स्थिर कर
असें मागितलें. बाह्यात्कारें लहानसें मागणें असून त्या-
च्या पोटांत, सर्व अर्थांची सिद्धि असावी, असें हें मागणें
एथ समजलें पाहिजे.

सुरर्षिह्मणतोतुझेंयशचिधन्यघेगायना ॥
मलाकविह्मणोततेंसुखदअन्ययोगायना ॥
विमुक्तिबहुसाधनतेंदितरेंगणीनाचतो ॥
सजूनिवरवल्लकीतवसभांगणींनाचतो ॥ ११४ ॥

असा तुझ्या कथेचा महिमा पाहून नारद तींतच निमग्न असतो, असें एथें कवि सांगतात.

**पदान्वय,**— सुरर्षि ह्मणतो तुझें यशचि धन्य, मला गायना यो, ते कवि अन्ययोगायना सुखद ह्मणोत, तदितरें विमुक्तिबहुसाधनें तो गणीनाच, वरवल्लकी सजूनि तव सभांगणीं नाचतो.

**सुरर्षि ह्मणतो तुझें यशचि धन्य,**—सुरर्षि- नारद, ह्मणतो, किं, तुझें, यशचि- गुणकीर्तनच, धन्य- अत्यंत कल्याणकारक; ह्मणून तें तुझें यशच **मला गायना यो,**— मला, गायना- गायाला, यो[1]- येवो; **ते कवि** अन्य-

1 'यो' हें महाराष्ट्र भाषेंत ये या धातूचें केवळ ग्राम्य रूप जाणावें. बहुधा असें ये धातूचें विध्यर्थी रूप प्रौढ नागरिक भाषणांत आढळत नाहीं; तथापि देशस्थां मध्यें 'तो यो आला तर', 'मला शास्त्र नआलें तर नयो', असा बोलण्याचा परिपाठ आढळतो. वामनानेंहि असाच प्रयोग केला आहे;—

म्लानताकधिनयोसुमनातें केशक्लेशनकरूतमनातें ।
गंधआर्द्रचिअसोअनसूया देअसावरननीसअसूया ॥

लोपामुद्रासंवाद

तसेंच तुकोबानेंहि एका अभंगांत या धातूचा असाच प्रयोग केला आहे;

एकातुजवीणनयोंआह्मांकामा कळोंकृष्णारामाआलेंआजी

**अन्ययोगायना सुखद ह्मणोत,**— **ते**- जे ह्मणणारे असतील ते, **कवि**- ज्ञानी- ज्ञाते पुरुष, **अन्ययोगायना,**- अन्य- दुसरे, **योगायना**- योग- मनाचें एकाग्रीकरणरूप- व्यापारविशेष, त्याचें अयन- स्थान- साधन, त्यातें, अर्थात् राजयोगादि जें कैवल्यप्राप्तिसाधन त्यातें, **सुखद**- सुख देणारें- कल्याण करणारें, असें ह्मणोत- ह्मणत असल्यास ह्मणोत; परंतु **तदितरें विमुक्तिसाधनें तो गणीनाच,**— **तदितरें**- तद्व्यतिरिक्त- त्याहून दुसरीं- अर्थात् भगवद्गुणगायना शिवाय इतर, **विमुक्तिसाधनें,**-**विमुक्ति**- मोक्ष- कैवल्य, त्याचीं **साधनें**- अर्थात् कैवल्यप्राप्तिविषयक योगादि उपाय, **तो**- अर्थात् तो नारद, **गणीनाच**- गणत नाहींच- मानित नाहींच; ह्मणून **वरवल्लकी सुजूनि तव सभांगणीं नाचतो,**—**वरवल्लकी**- त्या नारदाचा श्रेष्ठ वीणा, **सजूनि**- सजवून- अर्थात् भगवद्गुणगायना करितां वीण्याच्या तारी यथास्थित लावून, **तव**- तुझ्या- अर्थात् कवि भगवंतास ह्मणतात तुझ्या, **सभांगणीं**- सभांगणाच्या ठायीं, **नाचतो**- अर्थात् भगवद्गुणवर्णनाच्या प्रेमांत नृत्य करितो. एथें हा उत्प्रेक्षा अलंकार जाणावा.

---

१ **सजणें** हा धातु बहुधा अकर्मक होय; परंतु केव्हां केव्हां याचा सकर्मका प्रमाणेंहि प्रयोग करितात; तसा एथें हा सकर्मक प्रयोग जाणावा.

**तुझेंचरितसन्मुखेंश्रवणजाहलेंयास्तव ॥**
**प्रजापतिसुतत्वयेकरितिसाधुजाचास्तव ॥**
**स्वनीचपणमागिलेंबहुदयाअशीनारदा ॥**
**स्मरेघडिघडिप्रभोभवपयोधिच्यापारदा ॥ ११५ ॥**

त्याच नारदाचें वर्णन चालवित असतां कवि सांगतात.

**पदान्वय** —तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें यास्तव प्रजापतिसुतत्व ये, ज्याचा स्तव साधु करिति, भवपयोधिच्या पारदा प्रभो मागिलें स्वनीचपण बहु दया अशी नारदा घडि घडि स्मरे.

कवि भगवंतास ह्मणतात– **तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें यास्तव प्रजापतिसुतत्व ये,**—तुझें, चरित– चरित्र–भक्तांस सुखी करण्या करितां दयापूर्वक आचरण, सन्मुखें– साधूच्या मुखानें, श्रवण जाहलें– श्रुत झालें, ह्मणून,– त्या नारदाला प्रजापतिसुतत्व ये,– प्रजापति–ब्रह्मा, त्याचें सुतत्व– पुत्रपणा, ये– आला; साधूच्या मुखानें तुझें चरित्र नारदानें ऐकिलें ह्मणूनच तो ब्रह्मदेवाचा पुत्र झाला; अथवा, प्रजापति– कश्यप– त्याचें सुतत्व — पुत्रपणा, अर्थात् कश्यपाचा पुत्र, असाहि अर्थ संभवतो*; **ज्याचा स्तव साधु करिति,**— ज्याचा– ज्या प्रजापतिसुतत्वाचा, स्तव–स्तुति– वर्णन, साधु– सत्पुरुष, करितात. अर्थात् इतकें सारें तुझ्या गुणानुवादश्रवणाचें फल; ह्मणून संबोधन देऊन कवि भगवंतास ह्मणतात– **भवपयोधिच्या पारदा प्रभो**

मागिल

* पहा पुढील टीप.

**मागिलें स्वनीचपण बहु दया अशी नारदा घडि घडि स्मरे,— हे भवपयोधिच्या-** भवसमुद्राच्या, **पारदा-** पार देणाऱ्या- पैलीकड दाखविणाऱ्या-अर्थात् भवसमुद्रांतून पार उतरणाऱ्या, **प्रभो-** स्वामी, **मागिलें स्वनीचपण** - आपलें मागिलें- पूर्वजन्माचें, नीचपण, आणि **बहु दया** अत्यंत कृपालुत्व- अर्थात् भगवंताचें, **अशी-** अशी भगवद्दया, नारदाला वारंवार स्मरत असे; अर्थात् मीं पूर्वी शूद्र असतां आतां प्रजापतीचा पुत्र झालों[1], हें सारें भगवच्चरिताचें माहात्म्य,

---

१ या विषयीं पुरातन इतिहास पुराणांत असा सांगितला आहे कीं,-पूर्वी पंचजन* नामा प्रजापतीची कन्या असिक्नी दक्षप्रजापतीस दिली होती; तिच्या ठायीं या प्रजापतीपासून हर्यश्व या अभिधानेंकरून प्रसिद्ध असे एक अयुत ह्मणजे दहा हजार पुत्र झाले. त्यांस दक्षानें प्रजोत्पादना विषयीं आज्ञा दिल्या वरून ते सारे पश्चिम दिशेस नारायण सरोवर आहे तेथे गेले. त्या सरोवरांत स्नान केल्या वर त्यांचें अंतःकरण शुद्ध होऊन त्यांची परमहंसधर्मग्रहणा विषयीं बुद्धि झाली; मग तेथेंच त्यांनीं परम उग्र तपश्चर्या केल्या वर त्यांस नारदाचें दर्शन झालें. नारदानें त्यांस सांगितलें कि तुह्मीं अज्ञान मुलां प्रमाणें अहां; अद्यापि तुह्मीं जगाचा अंत पाहिला नाहीं; तुह्मीं प्रजा कशी उत्पन्न कराल; अशा प्रश्नानें त्यांस ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून प्रजोत्पादनात्मक इष्ट कार्यापासून पराङ्मुख केलें. त्या वरून हें सर्व वर्तमान दक्षप्रजापतीस विदित झाल्या वर तो फार खिन्न झाला. नंतर पुनः त्याणें त्या पांचजन्येच्या ठायीं दुसरे सहस्रसंख्यावधि सबलाश्व या अभिधानेंकरून प्रसिद्ध असे पुत्र उत्पन्न केले; तेहि तसेच

---

* या नावाचा प्रजापति बहुधा आढळण्यांत येत नाहीं; परंतु श्रीधरानें आपल्या टीकेंत -'**पंचजनाख्यस्य प्रजापतेः**' असें लिहिलें आहे. पहा- भागवत, स्कं० ६, अ० ४, श्लो० ५१. विष्णु पुराणांत हीं असिक्नी वीरण ऋषीची कन्या ह्मणून सांगितलें आहे.

माहात्म्य, असें वारंवार नारदाच्या मनांत येऊन तो तुझ्या सभांगणीं तुझें गुणकीर्तन करित होत्साता नाचतो, असा एथें पूर्वसंदर्भ जाणावा.

तसेच प्रजोत्पादना विषयीं बापाची आज्ञा मानून नारायण सरोवरास गेले, आणि त्यांणीं आपल्या बंधू प्रमाणें देवताराधन केलें. त्यांसहि नारदानें तसाच ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून दक्षाच्या इष्ट कार्यापासून निवर्तविलें. हें दक्षास समजल्या वर त्यास फार क्रोध येऊन त्याणें नारदास शाप दिला, किं बाळकांचा बुद्धिभ्रंश करणारा जो तूं त्या तुला या जगांत भ्रमणच प्राप्त होईल, एकस्थान स्थिर मिळणार नाहीं: ' तंतुकृंतनयन्नस्त्वमभद्रमचरःपुनः तस्माल्लोकेषुतेमूढनभवेद्भ्रमतःपदं ' (पहा- भागव०, स्कं०६, अ०५, श्लो०४३.) परंतु वायुपुराणांत, आणि हरिवंशांत हाच शाप अन्य-प्रकारें सांगितला आहे;- ' नारदनाशमेहीति गर्भवासंवसेति ' अर्थ- नारदा तुझा नाश होईल, तुला 'गर्भवास प्राप्त होईल. हा गर्भवास अमुक प्रकारचा होईल ह्या विषयींचें स्पष्टीकरण कोठें आढळत नाहीं. परंतु भागवतांत प्रथम स्कंधांत पांचव्या अध्यायांत जेथें स्वतः नारदानेंच व्यासास आपला पूर्वजन्मवृत्तांत सांगितला आहे, तेथें मी पूर्वी दासी-पुत्र होतों, आणि सत्समागमानें मला ईश्वरज्ञान प्राप्त झालें, ह्मणून कथन केलें आहे,- 'अहंपुराऽतीतभवेभवंमुनेदास्यास्तुकस्याश्चन-वेदवादिनाम् निरूपितोबालकएवयोगिनांशुश्रूषणेप्रावृषिनिर्वि-विक्षताम्' (श्लो० २३). या वरून दिसतें किं पूर्वी नारद दासीपुत्र असतां पुढें ईश्वरज्ञानेंकरून प्रजापति ह्मणजे ब्रह्मा त्याचा पुत्र झाला. या प्रमाणें मत्स्य पुराणांत आणि मनुसंहितेंत नारदाची ब्रह्मर्षी मध्यें गणना केली आहे.—'मरीचिमत्र्यंगिरसौ पुलस्त्यंपुलहंक्रतुम्प्रचे-तसंवसिष्टंच भृगुन्नारदमेवच' (मनु१, अ०१,श्लो०३५).

• वायुपुराणांत नारद हा कश्यपाचा कृत्रिम पुत्र ह्मणजे दत्तपुत्र ह्मणून सांगितला आहे;- 'सविमःकश्यपस्येतिकृत्रिमः' तसेंच हरिवंशांत आणखी भागवता विरुद्ध नारद हा कश्यपापासून असिक्नीच्या ठायीं पुत्र उत्पन्न झाला ह्मणून कथा आहे.' 'असिकन्यामथवैरिण्यां भू-योदेवर्षिसत्तमः ' तंभूयोजनयामासपितेवमुनिपुंगवं', एथें टीका-कारनिं देवर्षिसत्तमः याचा अर्थ कश्यप असा केला आहे.

**तुझेंयशचितारितेंपरिनकेवळातारवे ॥**
**सहायअसिलांअसेतरिचशत्रुलामारवे ॥**
**नभागवतभेटतांनघडतांहिसत्संगती ॥**
**नअज्ञहृदयेंतशींतवयशोरसींरंगती ॥ ११६ ॥**

मागल्या केकांत भगवद्गुणकथामाहात्म्य वर्णून आ-तां शेवटीं पुढल्या दोन केकांनीं कवि सत्संगतिमाहात्म्य वर्णितात.

**पदान्वय—** तुझें यशचि तारितें, परि केवळा न तार-वे, असिला सहाय असे तरिच शत्रुला मारवे, भागवत न भेटतां सत्संगती हि न घडतां तव यशोरसीं अज्ञ हृदयें तशीं न रंगती.

कवि भगवंतास ह्मणतात्— **तुझें यशचि तारितें,—** तुझें गुणानुवादकीर्तनच, तारितें- संसारतापत्रयापासून रक्षितें; **परि केवळा न तारवे,—** परि- तथापि- यद्यपि तुझें यशच तारतें खरें तथापि, **केवळा-** त्या नुसत्या य-शाच्यानेंच, **न तारवे-** तारववत नाहीं; अर्थात् त्या नुस-त्या तुझ्या यशाच्यानेंच जड जीवांचें संसारतापत्रयापासून रक्षण करवत नाहीं; यास दृष्टांत— **असिला सहाय असे तरिच शत्रुला मारवे,— असिला-** तलवारीला, **सहाय-** पाठबळ, अर्थात् त्या तलवारीस मूठ, किंवा धरणा-रा कुशल शूरादि, सहाय, **असे-** असेल, तरच शत्रुला, त्या तलवारीनें— **मारवे-** मारवतें; सारांश तुझें यश पापनाशना-विषयीं खड्गरूप आहे यांत किमपि संशय नाहीं; तथा-

-पि त्या विषयीं कोणी तरीं सद्गुपदेशक पाहिजे असा आ-पला अभिप्राय कथित होत्साते कवि ह्मणतात— **भागवत न भेटतां सत्संगती हि न घडतां अज्ञन्हृदयें तव यशोरसीं तशीं न रंगती,—** भागवत- भगवद्भक्ति-रसज्ञ पुरुष, **न** भेटतां - भेटले नसतां- अशा पुरुषांची गांठ जर न पडली, आणि सत्संगती- साधुसमागम— अ-शा भगवद्भक्तिरसज्ञ पुरुषां बराबर सहवासहि जर न घड-ला तर— **अज्ञन्हृदयें**- अज्ञान पुरुषाचीं ह्रदयें-जड मानवांचीं ह्रदयें, **तव**- तुझ्या, **यशोरसीं**— यशरूप रसांत— अर्थात् तुझे अपारगुणवर्णनरूपरसांत— तदोत्पन्न आनंदांत, **त**-शीं- त्या प्रकारचीं— अर्थात् सत्समागम प्राप्त होऊन जशीं रंगती तशीं, **न रंगती**- रंगत नाहींत-अर्थात् निमग्न होणार नाहींत; सारांश अज्ञन्हृदयांस अशा रसांत रंगविणाऱ्या सत्संगतीची अपेक्षा आहे. आणि अशी यशोरसीं निमग्न झाल्यां वांचून मोक्षप्राप्तिहि असंभवनी-य अतएव सत्संगतीचें साहाय्य अवश्य पाहिजे; असा एथें ध्वनितार्थ जाणावा.

**बुडेबुडविसागरींतरिसुकर्णधाराविना ॥**
**सहायनसतांस्वयेंपरतटासितीदाविना ॥**
**सहायभगवज्जनातवसुकीर्तिजेव्हांकरी ॥**
**तईंचउतरीभवोदधितटींजनालोकरी ॥ ११७ ॥**

मागल्या केकेवरून सत्संगतिमाहात्म्य चालू.

**पदान्वय—.** सुकर्ण धारा विना तरि सागरीं बुडे बुडवि, सहाय नसतां ती स्वयें परतटासि दाविना, तव सुकीर्ति जेव्हां भगवज्जना सहाय करी, तईंच भवोदधितटीं जना लोकरी उतरी.

**सुकर्णधारा विना तरि सागरीं बुडे बुडवि,—** सु-कर्णधारा विना - सुकाण्या वांचून, **तरि**- तर- नाव, **सा-गरीं बुडे—** सागरांत बुडत्ये- आणि बुडवि- बुडवित्ये; अर्थात् सुकाण्या नसला तर नाव समुद्रांत आपण बुडत्ये, आणखी तींत बसणारे जे उतारू लोक त्यांसहि बुडवित्ये; **सहाय नसतां ती स्वयें परतटासि दाविना,— सहाय नसतां**- त्या तरींत सुकाण्या जर सहाय नसला तर, **ती स्वयें**- ती स्वतः, **परतटासि दाविना**- पलिकडल्या तटास दाखवित नाहीं; असा नियम आहे ह्मणून **तव सुकीर्ति जेव्हां भगवज्जना सहाय करी,—** तव सुकीर्ति- तुझी, **सुकीर्ति** - सत्कीर्ति- अर्थात् कल्याणकारक कीर्ति, जेव्हां, **भगवज्जना**- साधुजनांस- भगवद्भक्तांनां, **सहाय**[1] **करी**-सा-हाय्य-

---

१. हा एथें भावार्थीं **साहाय्य** याच्या ठिकाणीं शुद्ध मराठींत आर्ष प्रयोग केला आहे.

-हाय्य करिल्ये; **लईच भवोदधितटीं जना लौकरी उत-री**,-लईच-तेव्हांच, ती सुकीर्ति 'भवोदधितटीं,-भव-संसार, हाच कोणी' उदधि- समुद्र, त्याचे' तटीं- तीरास, जनाला, लौकर, उतरी— उतरिल्ये; अर्थात् तुझी सुकीर्ति सांसारिक मूढ जनास भवसागराच्या पार उतरिल्ये खरी, परंतु भगवद्भ-क्तांच्या साहाय्या वांचून लौकर उतरित नाहीं. तात्पर्य, मुमुक्षु जनास अविद्याजनितसंसृतिसागर पार उतरून ब्रह्मज्ञानावाप्ति करून देण्यास सद्गुरुकृपेची आवश्यकता आहे, असा अभिप्राय दाखवून पूर्वी वर्णिलेल्या भगवद्गुणकीर्तनास वैयर्थ्य नयावें ह्मणून 'लौकर' हें एथें श्लिष्ट पद ठेविलें आहे असें मला वाटतें; भगवद्गुणकीर्तनाच्या अंगींहि सांसारिक मूढ जनास ब्रह्मज्ञानावाप्ति करून देण्याचें सामर्थ्य आहे यांत संशय नाहीं, तथापि जर तें ज्ञान त्वरित पाहिजे तर सत्स-मागमाची आवश्यकता समजावी, असा एथें 'लौकर' या श्लिष्ट पदा वरून ध्वनितार्थ होतो[1].

---

१ ज्यांहीं भगवच्चरणाचा आश्रय केला त्यांस हा येवढा मोठा दुस्तर भवसागर असतां, वांसराचा खूर मृदु भूमी वर उमटून जो खळगा पडतो त्यांत जितकें पाणी साठवेल तितक्या जलाशया इतक्या अल्प परि-माणाचा तो सागर होतो; अर्थात् त्यांस भवसागरच राहत नाहीं ह्मणून भा-गवतांत सांगितलें आहे;—

समाश्रितायेपदपल्लवप्लवं महत्पदंपुण्ययशोमुरारेः ।
भवांबुधिर्वत्सपदंपरंपदं पदंपदंयद्विपदांनतेषां ॥

स्कं० १०, अ० १४, श्लो० ५८

**सुसंगतिसदाघडोसुजनवाक्यकानींपडो ॥**
**कलंकमतिचाझडोविषयसर्वथानावडो ॥**
**सदंघ्रिकमळींदडोमुरडितांहटानेंअडो ॥**
**वियोगघडतांरडोमनभवच्चरित्रींजडो ॥ ११८ ॥**

ग्रंथपरिसमाप्तिसमयीं कवि मनःशुद्ध्यर्थ सकललोकहितार्थ प्रार्थना करितात.

**पदान्वय** — सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो, मतिचा कलंक झडो, विषय सर्वथा नावडो, मन सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो, वियोग घडतां रडो, भवच्चरित्रीं जडो.

**सुसंगति सदा घडो,**— सुसंगति - सत्संगति अर्थात् भगवद्भक्तजनाचा संग, सदा घडो -निरंतर प्राप्त होऊ; आणखी **सुजनवाक्य कानीं पडो,** — सुजनवाक्य - साधु जनांचें वाक्य अर्थात् त्यांनीं सांगितलेला सदुपदेश, कानीं पडो; आणखी **मतिचा कलंक झडो,** — मतिचा - अर्थात् कवि ह्मणतात या आमच्या बुद्धीचा, कलंक-कालिमा-डाग- अर्थात् पापरूपी वासना- अथवा अज्ञानरूप पटल, झडो- झडून जाऊ- अर्थात् हळुहळु नाहींसा होऊ; आणखी **विषय सर्वथा नावडो,** — विषय - ऐहिक भोग्यपदार्थ, सर्वथा - कदापि, नावडो - न आवडो - अर्थात् ते अनश्वर जाणून त्यां विषयीं मन लंपट नहोऊ; आणखी **मन सदंघ्रिकमळीं दडो,** मन - कवि ह्मणतात हें आमचें मन,( एथें **मन** शब्दाचा चौथ्याचरणांत दूरान्वय असा दिसतो, तथापि अर्थसंबंधानें तो दुरान्वय नाहीं.) सदंघ्रिकमळीं

घ्रिकमळीं,— सत्- साधु, त्यांचा जो- अंघ्रि- चरण, तेंच कोणी कमळ, त्याच्या ठायीं, अर्थात् भवसागर पार उतरण्यास समर्थ जे भगवद्भक्त त्यांच्या चरणकमलाच्या ठायीं, दडो- दडून राहो; अर्थात् संसारदुःखभयापासून निर्भय होण्यास तेथें आश्रय करून असो; असा एथें ' दडो ' या शब्दा वरून ध्वन्यर्थ होतो; अथवा, संसारत्रासापासून विश्रांत होण्यास आश्रय करून असो असाहि ध्वन्यर्थ संभवतो; आणखी मुरडितां हटानें अडो,— मुरडितां- मुरडून टाकिलें असतां- अर्थात् सदंघ्रिकमळीं दडून राहिल्या मनास पुनः विषयवासनेनें तेथून मुरडून बाहेर काढायास बल केलें असतां, हटानें- आग्रहानें- नेटानें, अडो तेथेंच अडून राहो- म्हणजे तो आश्रय नसोडो; आणखी वियोग घडतां रडो,— कदाचित् त्या विषयवासनेचा अतिबलात्कार होऊन सदंघ्रिकमळापासून तिणें जर त्या मनास ओढून काढिलेंच, आणि तेथून त्या मनाचा वियोग घडतां-वियोग घडलाच, तर तें मन त्या वियोगदुःखानें रडो; आणखी तें मन भवच्चरित्रीं जडो, कवि भगवंतास ह्मणतात तुमच्या चरित्रांत, जडो- पुनः सल्लग्न होऊ- पुनः तेथें निमग्न होऊ; अर्थात् विषयवासनेनें सदंघ्रिकमळापासून ओढून काढलेलें आमचें मन पुनः भगवंताच्या सदयतादि गुणवर्णनांत निमग्न होऊ. एथें ' मुरडितां ' आणि ' हटानें ' या शब्दांच्या प्रयोगानें विषयवासनेचें प्राबल्य ध्वनित होतें.

ननिश्चयकधींढळोकुजनाविघ्नबाधाटळो ॥
नचित्तभजनींचळोमतिसदुक्तमार्गींवळो ॥
स्वतत्त्वहृदयाकळोदुरभिमानसारागळो ॥
पुन्हानमनहेंमळोदुरितआत्मबोधेंजळो ॥ ११९ ॥

मागील प्रार्थना चालू.

**पदान्वय—** निश्चय कधीं न ढळो, कुजनविघ्नबाधा टळो, भजनीं चित्त न चळो, मति सदुक्तमार्गीं वळो, स्वतत्त्व हृदया कळो, सारा दुरभिमान गळो, हें मन पुन्हा न मळो, दुरित आत्मबोधें जळो.

**निश्चय कधीं न ढळो,**- कवि आणखी वर मागतात- निश्चय- अर्थात् भगवद्भक्ती विषयीं श्रद्धापूर्वक निश्चयात्मिका बुद्धि, कधीं- कदापि- कितीहि ती बुद्धि ढळण्याचा प्रसंग आला तथापि, न ढळो- भ्रष्ट नहोऊ- अर्थात् अशीच सुदृढ राहो; आणखी **कुजनविघ्नबाधा टळो,**— कुजनविघ्नबाधा,- कुजन- दुर्जन, त्यांनीं केलें जें विघ्न - पीडा- अर्थात् निंदादि, तेणेंकरून प्राप्त जी बाधा- संकट तें, टळो- दूर

---

१ या निश्चयात्मिका बुद्धीचें लक्षण आणि तिचें फल कृष्णानें गीतेच्या दुसऱ्या अध्यायाच्या उत्तर भागांत अर्जुनास विशद करून सांगितलें आहे तें, व त्याज वर ज्ञानेश्वराची टीका पहावी.

तुकोबानींहि थोडक्यांत सरस ह्मटलें आहे;—

निश्चयाचेंबळ तुकाह्मणेतेंचिफळ ॥

२ कुजनाचा स्वभावच असतो कीं कोणी सत्कार्यास प्रवृत्त झाला असतां त्याची निंदा करून त्यास विघ्न करावें; परंतु जे दृढ निश्चयाचे पुरुष असतात ते त्या निंदेच्या भयानें मागें हटत नाहींत; सत्कर्म धरून करितच असतात. तुकोबा ह्मणतात;—

कोणी

दूर जाऊ- अर्थात् नष्ट होऊ; अथवा, **कुजन**-दुष्टजन-असाधु-पापी, त्यांस जें **विघ्न**- अर्थात् **विघ्नरूप** अथवा विघ्नकारक जे कामक्रोधादि षड्रिपु, त्यांनीं केली जी **बाधा**-पीडा, ती **टळो**- दूर होऊ- नष्ट होऊं; अथवा, **कुजन**- पिशाचादि भूतसृष्टि, त्यांनीं कर्तव्य जें सत्कर्मास **विघ्न**- प्रतिबंध, तदुत्पन्न जी बाधा-पीडा- संकट, तें **टळो**- नष्ट होऊं[२]; आणखी **भजनीं चित्त न चळो,**— भजनीं- अर्थात् भगवद्भजनीं, चित्त- हें माझें मन, न चळो- चंचल नहोऊ- अर्थात् स्थिर राहो; आणखी **मति सदुक्तमार्गीं वळो,**— **मति**- अर्थात् ही माझी बुद्धि, **सदुक्तमार्गी**,- **सदुक्त**,- **सत्**- साधु

---

कोणिनिंदाकोणीवंदा आह्मास्वहिताचाधंदा. ॥

आणखी एका ठिकाणीं तेच.ह्मणतात;—

कायमाझेंनेतीवाईटह्मणोन करूंसमाधानकशासाठीं ॥
कायमजलोकनेतीपरलोका जातांकोणीनरकानीवारील ॥
नह्मणेकोणासीउत्तमवाईट सुखेंमाझीकूटखावोमार्गे ॥
सर्वमाझाभारअसेपांडुरंगा कायमाझेंजगासवेंकाज ॥

तुकोबानेंहि असेंच प्रार्थिलें आहे;-

आशाभयलाज । चिंताकाम क्रोध ।
तोडावा संबंध । यांचा माझा ॥

आणखी एके ठिकाणीं ह्मटलें आहे;-

कामक्रोधवैरी । घालूनिबाहेरी ।
राहेंतूंअंतरीं । पांडूरंगा. ॥

२ संध्या कर्माच्या आरंभींहि अशीच प्रार्थना करण्यांत येत्ये;-

अपक्रामंतुभूतानि पिशाचाःसर्वतोदिशं ॥
सर्वेषामविरोधेन संध्याकर्मसमारभेतू ॥

साधु- अर्थात् सन्मार्ग दाखविणारे जे तत्ववेत्ते भगवद्भक्त, त्यांनीं' उक्त- सांगितला- अर्थात् शिष्यपरंपरेनें अथवा स्वनिर्मित ग्रंथांत सांगितला, जो' मार्ग- पंथ- ईश्वरप्राप्त्युपाय, त्याच्या ठायीं, वळो- ऐहिकविषयासक्तीपासून परांङ्मुख होऊन तन्मार्गप्रवण होऊ; आणखी' स्वतत्त्व त्वद्या कळो,— स्वतत्त्व- आपलें तत्त्व- अर्थात् आपलें वास्तव स्वरूप- मीं कोण किमर्थ एथें जन्मलों, आणि पुढें माझी गति काय होणार, हा जो तत्त्वविचार तो[1], त्वद्या- या माझ्या त्वद्यास, कळो-कळून येऊ-प्रकाशित होऊ; आणखी ' सारा दुरभिमान गळो,— सारा- यच्चयावत् जो दुरभिमान- दुष्ट अभिमान- अर्थात् द्रव्याभिमान, ज्ञानाभिमान, जात्यभिमान, कुलाभिमान, इत्यादि सर्व प्रकारचा दुष्ट अभिमान, गळो- गळून पडो- अर्थात् नष्ट होऊ; शरीरा--च्या सौंदर्यास जसें अगंतुक जीर्ण मलिन प्रावरण उगीच चिकटून त्याचें आच्छादक होतें, तसा हा दुरभिमान सत्ज्ञानास आच्छादक होतो, ह्मणून तो गळून पडो, आणि सज्ज्ञान प्रस्फुट होऊ; असा एथें 'गळो' आणि पुढील 'मळो' या शब्दयोजनेनें ध्वनितार्थ होतो; अथवा, दुरभिमान

1 या स्वस्वरूपज्ञाना विषयीं देहानिरसनप्रकरणीं मुकुंद राजानें विवेकसिंधूंत थोडक्यांत असें ह्मटलें आहे;—

देहादिप्रपंचाचेनीसाक्षित्वें।सांडुनिदेहसंबंधिकसकळतत्वें।
सुखियाहोईस्वप्रकाशत्वें। स्वस्वरूपीं ॥
तुझेंस्वरूपनिर्विकार। एथनाहींदेहाचेषड्विकार।
आणिवर्णाश्रमकुळाचार। तोकेवींकल्पावा ॥
उत्तरार्ध, प्र० १, श्लो० ६८, ६९.

-न- दुरहंकृति- अर्थात् अहंकारजन्य जें अज्ञान तें, गळो- नष्ट होऊ- ह्मणजे ज्ञानावाप्ति होऊं; अथवा, एथें 'सारा' हें दुरभिमानाचें विशेषण नकरितां गळो याशीं त्याचा संबंध करून तें क्रियाविशेषण करावें, ह्मणजे दुरभिमान 'सारा गळो'- ह्मणजे अगदीं नष्ट होऊ, त्याचें बीज देखील न राहो असा अर्थ; आणखी **हें मन पुन्हा न मळो,— हें मन**-कवि ह्मणतात हें माझें मन, **पुनः न मळो**- पुनरपि त्या दुरभिमानानें न मळो- अथवा तज्जनित पापमालिन्येंकरून पुनरपि मलिन न होऊ; अणखी **दुरित आत्मबोधें जळो,**— दुरित- दुराचार- पापाचरण- अर्थात् तर्णेकरून निष्पन्न जें दुःखभोक्तृत्व तें, **आत्मबोधें**- आत्मज्ञानेंकरून, **जळो**- जळून जाऊ- अर्थात् दुरिताची स्वकार्यजनत्वशक्ति न राहू; या शेवटील प्रार्थनेनें तर कवीनें आपलें पातित्य सुचवून त्यापासून आपली मुक्तता कर ह्मणून ईश्वरास सर्व प्रार्थनेचें रहस्य निवेदन केलें असें एथें समजलें पाहिजे. या आणि मागल्या केकेंत अन्त्यानुप्रास शब्दालंकार जाणावा.

---

कलुषंवृजिनैनोघमंहोदुरितदुष्कृतम्. अमर.

या प्रमाणें दुरितांचें दहन आचार्यांनींहि प्रार्थिलें आहे;-

क्षिप्तोहस्तावलग्नःप्रसभमभिहतोप्याददानोंशुकांतं ।
गृण्हन्केशेष्ववपास्तश्चरणनिपतितोनेक्षितःसंभ्रमेण
आलिंगन्योऽवधूतस्त्रिपुरयुवतिभिःसाश्रुनेत्रोत्पलाभिः ।
कामीवार्द्रापराधःसदहतुदुरितंशांभवोवःशराग्निः ॥ २ ॥

अमरुशतक.

मुखींहरिवसोतुझीकुशलधामनामावली ॥
क्षणांतपुरवीलजीसकलकामनामावली ॥
कृपाकरिशितूंजगत्र्यनिवासदासांवरी ॥
तशीप्रकटहेनिजाश्रितजनासदासांवरी ॥ १२० ॥

इतकी प्रार्थना करून शेवटीं कवि भगवन्नाममाहात्म्य वर्णितात.

**पदान्वय—** हरि तुझी कुशलधाम नामावली मुखीं वसो, जी मावली सकल कामना क्षणांत पुरवील, तूं जग-त्र्यनिवास दासां वरी कृपा करिशि, तशी हे निजाश्रित जना सदा प्रकट सांवरी.

**हरि तुझी कुशलधाम नामावली मुखीं वसो,—** हरि- हे हरि- हे तापत्रयहारका, तुझी, कुशलधाम,- कुशल - कल्याण- सर्व ऐहिक आमुष्मिक कैवल्यप्राप्ती पर्यंत सुख, त्याचें धाम- निवासस्थान-अर्थात् सर्व सुखाचें आद्यपीठ, अशी जी नामावली- नामपंक्ति- अर्थात् तुझी पवित्रनामश्रेणि, मुखीं वसो- अर्थात् माझ्या मुखीं राहो; सारांश तुझ्या पवित्र नामांच्या अर्थाच्या ठायीं माझी अंतःकरणवृत्ति सप्रेम निमग्न असो; तीं नामावली कशी आहे ह्मणून पुसशील तर **जी मावली सकल कामना क्षणांत पुरवील,— जी मावली-** जी आई - अर्थात् भक्तांस माते प्रमाणें परम दयालु अशी जी तुझी नामावली ती, सकल कामना- सर्व मनोरथ, क्षणांत- एका क्षणा-मध्यें- अर्थात् विलंब नलावितां तत्क्षणीं, पुरवील- पूर्ण क-रील; सारांश प्राकृत माते पेक्षां ही कारुण्या विषयीं अत्यंत

• श्रेष्ठ

श्रेष्ठ होय, कारण सर्व मनोरथ पूर्ण करण्या विषयीं कोणती-हि प्राकृत माता समर्थ नाहीं, परंतु ही ते सर्व एका क्षणांत पूर्ण करण्या विषयीं समर्थ होय; यहा तूं जगत्त्रयनिवा-**स दासां वरी कृपा करिशि,**— तूं या सर्व त्रिभुवनाचें आदिकारण असून आपल्या भक्तां वर जशी कृपा करितोस; **तशी हे निजाश्रित जना सदा सांवरी,**— तशी, हे-ही तुझी नामावली, निजाश्रित जना- तिचा आश्रय ज्यांनीं केला त्या भक्तांस, सदा- निरंतर, सांवरी- सांवरित्ये- र-क्षित्ये- अर्थात् उन्मार्गवर्ती होऊं देत नाहीं; सन्माताहि आपल्या मुलांस तीं इकडे तिकडे आड मार्गास जाऊं लागलीं असतां सांवरून सन्मार्गास लावित्ये. अर्थात् प्रथम ही तुझी पवित्र नामावली मुमुक्षु जनांस भक्तिपंथास लावि-त्ये, मग तूं त्यांज वर कृपा करितोस; असा एथें ध्वन्यर्थ दिसतो.

---

देवहूतीनें भागवतांत शेवटीं नाममाहात्म्य वर्णिलें आहे;-

यन्नामधेयश्रवणानुकीर्तना-द्यत्प्रह्वणाद्यत्स्मरणादपिक्वचित् ॥
श्वादोऽपिसद्यःसवनायकल्पते कुतःपुनस्तेभगवन्नुदर्शनात्॥६॥
अहोबतश्वपचोऽतोगरीयान् यज्जिह्वाग्रेवर्ततेनामतुभ्यं ॥
तेपुस्तपस्तेजुहुवुःसस्नुरार्या ब्रह्मानूचुर्नामगृणंतियेते ॥ ७॥
स्कं० ३, अ० ३३

**दयामृतघनाअहोहरिवळामयूराकडे ॥**
**रडेशिशुतयासिघेकंळवळोनिमाताकडे ॥**
**असाअतिथिधार्मिकस्तुतपदाकदासांपडे ॥**
**तुह्मांजडभवार्णवींउतरितांनदासांपडे ॥ १२१ ॥**

या भवसमुद्रांतून पार उतरण्या विषयीं कवि स्वनामपूर्वक करुणास्वरानें भगवंता पाशीं शेवटची याचना करितात.

**पदान्वय—** अहो दयामृत घना हरि मयूरा कडे व-ळा, शिशु रडे तयासि माता कळवळोनि कडे घे, धार्मिक-स्तुतपदा असा अतिथि कदा सांपडे, दासां भवार्णवीं उतरितां तुह्मां जड न पडे.

**अहो दयामृतघना हरि मयूरा कडे वळा,—अ-हो दयामृतघना,-दया-** अर्थात् तुमची दया, हेंच कोणी अमृत, तेणेंकरून भरलेला घन- मेघ- ढग, अशा **हरि-** त्रिविधताप हारका, अथवा, एथें ' **दयामृतघना**' हें ' हरि ' पदाचें विशेषण नकरितां स्वतंत्र संबोधन केलें असतांहि चालेल, **मयूरा कडे वळा-** या मोरा कडे वळा; अर्थात् मज मयूरा वर आपल्या दयामृताचें वर्षण करा. यांत कवीनीं स्वाभाविक जें मयूरपक्षास अभीप्सित मेघदर्शन अथवा मेघवर्षण तें वर्णून चातुर्यानें या शेवटील केकेंत कविसां-प्रदायानुरूप आपलें नामहि सूचविलें; आपल्या कडेस वळण्या विषयीं दृष्टांतरानें कारण दर्शवित होत्साते कवि ह्मणतात **शिशु रडे तयासि माता कळवळोनि कडे घे,—** जेव्हां **शिशु रडे-** मूल रडतें, तेव्हां **तयासि माता कंळवळोनि कडे घे-** त्या मुलाला आई कळवळून कडे-वर

घेत्ये

घेत्ये; अर्थात् मातेला त्याचा कळवळा येऊन त्यास तसें रडूं न देतां त्याची समजूत करून आपलें कडे वर घेत्ये; तद्वत् माझी प्रार्थना ऐकून माझा अंगीकार करा असा एथील भावार्थ. पुनः आपलें याचकत्व दर्शवून भगवदौदार्य कथित होत्साते कवि ह्मणतात– **धार्मिकस्तुतपदा असा अ-तिथि कदा सांपडे,**— तुह्मां सारिख्या– धार्मिकस्तुतप-दा,— धार्मिक- दानशील- उदार, अशा सर्वांनीं– स्तुत- स्तविलें आहे- प्रार्थिलें आहे, पद- चरण, ज्याचे त्या तु-ह्मांला,- अर्थात् अत्यंत दयालु आणि उदार अशा तुला, **असा**- मज सारिखा- अर्थात् अत्यंत दयापात्र, **अतिथि**- याचक- भिकारी, **कदा सांपडे**- कधीं मिळेल- अर्थात् कदा-पि मिळणार नाहीं; एथें कवीनीं कृपादानाची आवश्यकता दर्शवून आपली कृपापात्रताहि इंगित केली; अथवा, एथें '**धार्मिकस्तुतपदा**' हें संबोधन करावें, हे धार्मिकस्तुतपदा- हे अत्यंत दयाळो भगवन्, मज सारिखा दयापात्र याचक तुला कदापि मिळायाचा नाहीं; त्यांत आणखी– **दासां भवार्णवीं उतरितां तुह्मां जड न पडे,**—दासां- आह्मां सारिख्या सेवकांनां, भवार्णवीं- या भवसागरांतून, उतरितां- पार उतरण्याचें असतां, तुह्मां जड न पडे- तुह्मां सारिख्या समर्थांना अवघड पडणार नाहीं; सारांश तुह्माला अवघड नसतां माझें महत्कार्य होतें, यास्तव मला या भवसागरांतून पार उतरून आपल्या जवळ न्यावें असा एथील कविहृ-द्गतार्थ समजला पाहिजे.

**कारुण्यांभोद राम प्रियसख गुरुही जो मयूरा नटाचा॥**
**होतां तापत्रयार्तें त्वरित भववनीं रक्षिता रानटाचा॥**
**त्याचें साचें स्वभद्रस्मरण मग न तें त्यां करों ये कवीस॥**
**केका एकासख्यातें स्मरुनि करि अशा ये कसें ये कवीस॥**

एथें स्वेष्टदेवतास्मरणपूर्वक कवि उपसंहार करितात.

**पदान्वय-** प्रियसख मयूरा नटाचा गुरुही जो कारुण्यांभोद रांम, भववनीं तापत्रयार्त होतां रानटाचा त्वरित रक्षिता; मग तें त्याचें साचें स्वभद्रस्मरण त्या कवीस करों नये, एका सख्यातें स्मरुनि अशा येकसेंयेकवीस केका करि.

**प्रियसख मयूरा नटाचा गुरुही जो कारुण्यांभोद राम,—** प्रियसख,-[1] प्रिय- आपले भक्त त्यांचा सखा अर्थात् भक्ताचा कनवाळू- भक्तवत्सल, आणि मयूरा मोररूप जो त्या, नटाचा- नाचणाराचा, गुरु-आचार्य- सूत्रधार, हि, जो, **कारुण्यांभोद-** दयाघन, **राम-** दाशरथी रामचंद्र; **भववनीं तापत्रयार्त होतां रानटाचा त्वरित रक्षिता,—** भववनीं- या संसाररूप अरण्यांत, तापत्रयार्त- त्रितापानें पीडित, **होतां-** होत असतां, **रानटाचा-** अरण्यवासी जनाचा- अर्थात् अज्ञ जनाचा, त्वरित रक्षिता- लागलेंच रक्षण करणारा; अर्थात् या संसारारण्यांत त्यांस विश्रांति देणारा असा होय. **मग तें त्याचें साचें स्वभद्रस्मरण** त्या

१ एथे हें पद प्रथम काढून असाच अर्थ करणें अवश्य दिसतें- 'प्रिय असा सखा' असा अर्थ करण्यास 'राजाहस्सखिभ्यष्टच्', हें सूत्र बाधक होईल असें मला वाटतें; कारण, या सूत्राचा वार्तिककार असें ह्मणतो कीं- 'एतदंतात्तत्पुरुषाट्टच्स्यात्', या बरून एथें तत्पुरुष समासच करणें प्राप्त दिसतें, कर्मधारय केला असतां 'प्रियसखा' असें पद असलें पाहिजे.

**त्या कवीस कसें नये,— मग-** असा राम परम कारुणिक आहे ह्मणून, तें त्याचें साचें स्वभद्रस्मरण-तें त्या रामाचें, साचें -वास्तविक, स्वभद्रस्मरण,- आपल्यास, भद्र- कल्याणकार- -क, असें स्मरण- चिंतन, त्या कवीस- त्या प्रसिद्ध मयूर कवीस, कसें नये- कसें येणार नाहीं- अर्थात् येईलच येईल; सारांश अशा परम दयालु रामाचें स्मरण मयूर कवीस येईलच येईल; यास्तव **एका सख्यातें स्मरुनि अशा येकसें येकवीस केका करि,— एका स-** ख्यातें- त्या एका सख्यातें- अर्थात् त्या एका राम सख्यातें **स्मरुनि-** स्मरण करून, **अशा-** या प्रकारच्या- आतां जश्या रचिल्या तश्या प्रकारच्या, एकशें एकवीस केका करिता झाला.

ग्रंथ अथवा त्यांतील एकादें प्रकरण समाप्त होत असतां शेवटचा भाग छंदांतरानें रचण्याची बहुधा काव्यरूढि आ- -ढळत्ये; या वरून एथें आपल्या कवीनें हा शेवटचा श्लोक निराळ्या वृत्तांत लिहिला आहे. या श्लोकाचें वृत्त स्रग्धरा होय. या वरून आपल्या कवीचा ग्रंथ एथेंच संपला असें दिसतें.

पांडुरंगात्मज दादूनें रचिलेल्या यशोदापांडुरंगी या नावाच्या विस्तृत टीके सहित श्रीमद्रामनंदनमयूरेश्वरक- -विविरचित केकावलिस्तोत्र समाप्त.

---

**परिशिष्ट ग्रंथ.**

**तनूभववनींत्रितापदवपावकेंकावली ॥**
**ह्मणोनिकरुणस्वरेंकरिमयूरकेकावली ॥**
**दयाघनहरिस्वरेंकरुनिभावुकासारहा ॥**
**त्रितापहरित्यागमेस्वजनमीनकासारहा ॥**

यांत कोणी इतर कवि या ग्रंथाची फलश्रुति कथित हो-
-त्साते ह्मणतात.

**पदावन्य** — भववनीं त्रितापदवपावकें तनू कावली, ह्मणोनि मयूर करुणस्वरें केकावळी करि, दयाघन हरि स्वरें-करुनि भावुका सारहा त्रिताप हरि, त्या हा स्वजनमीनका-सार गमे.

**भववनीं त्रितापदवपावकें तनू कावली,— भ-**-ववनीं - या भववनांच्या ठायीं - या संसारारण्यांत, **त्रिता-**-**पदवपावकें,- त्रिताप**, आध्यात्मिक, आधिदैविक, आणि आधिभौक्तिक, असा जो त्रिविध ताप, हाच कोणी दवपाव-क- दावाग्नि, तेणेंकरून, **तनू**- शरीर- अर्थात् या श्लोकाचा कवि ह्मणतो हें सांसारिक जनाचें शरीर, **कावली**- अर्थात् पोळल्यानें तळमळली-कासावीस झाली; सारांश या संसारा-रण्यांत फिरतां फिरतां त्रिविध तापरूप दावाग्नीनें हें जनांचें शरीर पोळल्या सारिखें झालें; **ह्मणोनि मयूर करुणस्व-**
**रें**

१ मला या श्लोकाच्या व पुढल्या आर्येच्या पदरचने वरून आणि अर्थस्वारस्या वरून मोठा संशय येतो किं ही शेवटली कविता आपल्या कवीची नसावी; दुसऱ्या कोणी हा श्लोक आणि पुढली आर्या आपल्या कवीच्या ग्रंथास जोडली असावी. मग यांत वास्तविक गोष्ट कोणती असेल ती असो.

-रें केकावली करि,— या साठीं, मयूर- मोर- ( एथें मो-रोपंत कवीच्या नावा कडेस कटाक्ष आहे ) करुणस्वरें- करुण अशा स्वरानें-अर्थात् सर्व जन भगवंताच्या कारुण्या-स पात्र आहे असें प्रदर्शित करणाऱ्या स्वरानें, केकावली- केकांचीं पंक्ति - अर्थात् एका मागें एक टाहो', पक्षांतरीं हा केकावलिनामक ग्रंथ, करिता झाला; एथें केकावलि या श-ब्दानें श्लेषोक्ति जाणावी. अशी गोष्ट आहे ह्मणून' दया-घन हरि त्वरेंकरुनि भावुका सारहा त्रिताप ह-रि,— दयाघन हरि- दयाघन- दयारूप घन, दयारूप मेघ, तद्रूप जो' हरि-, भगवान्- अर्थात् ताप निवारण्या विषयीं समर्थ, तो' त्वरेंकरुनि- त्वरेनें- सत्वर, भावुका सारहा- भावुक- भक्त- अर्थात् अनन्यगतिक, यास,— अर्थात् एथें उपलक्षित भाविक जनास, सारहा,-सार-तत्व- अर्थात् सर्व तत्वांत श्रेष्ठ जें आत्मज्ञानरूपतत्व, अथवा, भगव-द्विषयक जो प्रेमरस त्यास, नाश करणारा- विघ्न करणारा- असा' त्रिताप- पूर्वोक्त त्रिविध ताप- अर्थात् आत्मज्ञानास विघ्न करणारा असा हा त्रिताप, हरि- हरण करितो- शमवितो; मयूरपक्षीं' दयाघन हरि- दयाघनरूप- करू-णामेघरूप, जो' हरि- भगवान, त्वरेंकरुनि- त्वरेनें- लौकर- भावुकासारहा, - भावुक - कल्याणरूप[2], जो' आसार- पर्जन्यवृष्टि, त्याचा नाश करणारा, असा जो हा

१, ' सारं हंतीति सारहा' असा एथें हा शब्द साधिला पाहिजे,- वृत्रहन्, मित्रहन्, तसा सारहन्, याची प्रथमा.

२ भावुकंभविकंभव्यंकल्याणंमंगलंशुभम्.

अमर.

हा' त्रिताप- तीन प्रकारचा ताप- त्रिभुवनसंबंधी ताप, त्यातें, हरी- दूर करितो,- घालवितो, **त्या हा स्वजनमीनकासार गमे,**— त्या- अर्थात् भक्तपक्षीं ज्याचा त्रिविध ताप हरण करितो त्यास, **हा**- दयाघन हरि- भगवान, **स्वजनमीनकासार,**- **स्वजन**- भगवंताचे स्वजन- अर्थात् भगवद्भक्त, हेच कोणी' **मीन**— मत्स्य- मासे, तत्संबंधी जो' **कासार**- जलाशय—तलाव, अर्थात् स्वभक्तमीनांस तलावा सारिखा, **गमे** - गमतो — प्रत्ययास येतो; सारांश स्वभक्तमीनांस त्याचा त्रिविधताप शमन करणारा जो भगवान तो जलाशया प्रमाणें सुखप्रद असा अनुभवास येतो; मयूरपक्षीं- **त्या हा स्वजन मीनकासार गमे,**- अशी वृष्टि झाल्या वर' त्या- त्या मोरास, **हा स्वजन**- हा जो स्वलोक- स्वनिवासस्थान- अर्थात् अरण्य, तें' **मीनकासार** - माशास जसा तलाव तसा अल्हादकारक, **गमे**- गमतो- अनुभवास येतो; सारांश भगवदनुग्रह झाल्या वर मग भक्तांस पूर्वी परमताप देणारा संसार होता तोच माशांस अल्हाद देणाऱ्या सरोवरा प्रमाणें अल्हाद देणारा असा होतो. असा या श्लोकाचा थोडा ओढून ताणून अर्थ केला असतां होईल असें माझ्या बुद्धीस वागतें.

**ऐकुनिविश्वसुखावे ज्याकेकांचाअपूर्वतोटाहो**
**त्यांलाईशकृपेनें आयुष्यांचाकधींनतोटाहो॥ १ ॥**

या ग्रंथास कोणी आर्याछंदानें आशीर्वाद देतात.

**पदान्वय-** ज्या केकांचा तो अपूर्व टाहो ऐकुनि विश्व सुखावे, त्यांला ईशकृपेनें आयुष्याचा तोटा कधीं नहो.

**ज्या केकांचा तो अपूर्व टाहो ऐकुनि विश्व सुखावे,** — ज्या या केकावलिरूप ग्रंथाचा कधीं पूर्वी कोणीं ऐकिला 'नाहीं असा चमत्कारिक टाहो - करुणास्वर, ऐकून, हें सारें विश्व, सुखावे-सुख पावतें- आ- -नंदी होतें; **त्यांला ईशकृपेनें आयुष्याचा तोटा कधीं नहो,** — **त्यांला**- त्या या केकांस - अर्थात् या केकावलिनामक ग्रंथास, आयुष्याचा तोटा कधीं नहो; अर्थात् हा ग्रंथ चिरकाल या भूमंडलीं नांदो; सारांश सर्व जन या केका निरंतर गाऊत; असा या ग्रंथा विषयीं कोणी भक्तजन भगवत्प्रसाद मागतात.

समाप्त.

# सूचीपत्र.



कोणतीहि केका लौकर सांपडावी म्हणून प्रत्येक श्लोकाच्या पहिल्या चरणाच्या प्रथम अक्षराचा वर्णानुक्रम धरून खालीं मागील ग्रंथाचें सूचीपत्र करून दाखविलें आहे.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| [illegible] | [illegible] | उरत नाहीं. | उरत नाहीं. अथात् अग्नीशीं गांठ पडली असतां जसें तृण उरत नाहीं, तसें तुझी कृपा झाली असतां ताप अगदीं राहत नाहीं, असा अर्थ. |
| [illegible] | [illegible] | घरायास अत्यंत कठीण | घरायास अत्यंत कठीण- ह्मणजे उद्धरायास कठीण- |
| [illegible] | [illegible] | अथात् | अर्थात् |
| [illegible] | [illegible] | अनर्घ राघव | प्रसन्न राघव. |
| [illegible] | [illegible] | जे | जो |
| [illegible] | [illegible] | सखिन् | सखि |
| [illegible] | [illegible] | अधिक्रयाचकां | अखिलयाचकां |
| [illegible] | [illegible] | याज वरच | यांज वरच |
| [illegible] | [illegible] | स्वधीन | स्वाधीन |
| [illegible] | [illegible] | तात्पर्य | तात्पर्य, |
| [illegible] | [illegible] | असल्याम | असलें तर |
| [illegible] | [illegible] | वप्रचेनमि | वःप्रचेनमि |
| ११३ | [illegible] | श्रीमनहि | श्रीमन्नाहि |
| [illegible] | १ | सुर्पीय | सुर्पीय |
| १३२ | ७ | त्वां | तूं |
| १४० | ४ | उपमायांचा | उपमा यांचा |
| १४८ | २८ | 'उज्वल' | 'उज्ज्वल' |
| १५५ | २२ | ऋजु | ऋंजु |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १५८ | २० | मग | तर मग |
| १६७ | १५ | घडली नाहींच; | अथवा, ती स्थिति, सत्य- खरी घडली नाहीं,- अर्थात् ती स्थिति मला प्राप्त होऊन तशी अनुभवास आली नाहीं; |
| १७८ | ५ | गोवर्द्धनोद्धारणादि | गोवर्द्धनोद्धरणादि |
| १८७ | २५ | या सर्व नामाचा | या सर्वनामाचा |
| २१[illegible] | ८ | तमस्वी | तपस्वी |
| २[illegible] | २१ | अहीर | अभीर |
| २[illegible] | १६ | कश्या | कशा |
| २८[illegible] | २ | एतद्गुण | एतद्गुण.- |
| २५५ | १ | | या श्लोकांत अर्थदोष राहिले आहेत, ते पुढे नीट होतील. |
| २५३ | १२ | निधिर्य्यादः | निधिर्यादः |
| २७४ | २१ | भागीरथीचेंत्र | भागीरथीच्या त्रि |
| २३० | १२ | भक्तजनाचा | भक्तजनाच्या |
| ३१५ | | निर्लिप- | निर्लिप्त- |
| ३२७ | १२ | श्रम्रण | भ्रमण |
| ३५७ | [illegible] | एथ | एथें |
| ३५८ | २ | साधनंत | साधनेंत |
| [illegible] | १३ | मागिल | मागिलें |
| [illegible] | ५ | देव तारधन | देवतारा धन |
| ३[illegible] | १२ | अर्थस्वारस्या | अर्थस्वारस्या |
| ३८[illegible] | ६ | कटक्ष | कटाक्ष |
| ३८[illegible] | १८ | -करू | -करु |